गृहं तु गृहिणीहीनं कांताराद‌तिरिच्यते ।

**मनोरंजक ग्रंथप्रसारक मंडळीची पुस्तकमाला.**

पुस्तक ८ वें,

संगीत

# सुंदरमाधव.

[ एक पंचांकी सामाजिक नाटक. ]

"*Satire* is my weapon.
O Sacred weapon, left for virtue's defence,
Sole dread of folly, vice and insolence,
Reverent, I touch thee with honest zeal
To rouse the watchmen of the public weal.

—POPE

लेखक—' किरात. '

[ प्रथमावृत्ति ]




मुंबई,

मनोरंजक ग्रंथप्रसारक मंडळी,

सप्टेंबर १९०४.

## स्त्रियापयोगी उत्कृष्ट पुस्तकें.

| | | |
|---|---|---|
| १ | धाकट्या सूनबाई (कापडी). ०-१२-०(साधी). | ०-८-० |
| २ | संसारांतल्या गोष्टी. | ०-६-० |
| ३ | गुणसुंदरी ( कापडी ). १-०-० ( साधी ). | ०-१२-० |
| ४ | नवयुग ( कापडी ). १-०-० ( साधी ). | ०-१२-० |
| ५ | सरस्वती ( कापडी ). ०-१४-० (साधी). | ०-१०-० |
| ६ | द्रोणसंकोप. | ०-६-० |
| ७ | विलक्षण भोळेपणा. | ०-८-० |
| ८ | सुंदरमाधव (कापडी). ०-१४-० (साधी). | ०-१०-० |
| ९ | रावबहादूर पर्वत्या (कापडी). ०-८-० (साधी). | ०-६-० |
| १० | कुसुमगुच्छ (कापडी). ०-६-० (साधी). | ०-४-० |
| ११ | रमामाधव. | ०-४-० |
| १२ | मुरारराव. | ०-४-० |
| १३ | हंसदूत. | ०-२-० |
| १४ | मोहनतारा. | ०-२-० |
| १५ | स्त्रियांचीं कर्तव्यें ( कापडी). | १-०-० |

सर्व पुस्तकांस टपालहंशील निराळें पडेल.

**मनोरंजक ग्रंथप्रसारक मंडळी, गिरगांव-मुंबई.**

"*Satire* is a sort of glass where-in beholders do generally discover every-body's face but their own!"

—SWIFT.

## मनोरंजक ग्रंथप्रसारक मंडळीचीं लेखकवर्गास बक्षिसें.

| | | |
|---|---|---|
| बक्षिस १ लें, | रोख रुपये | १५० |
| बक्षिस २ रें, | रोख रुपये | १०० |
| बक्षिस ३ रें, | रोख रुपये | ७५ |
| बक्षिस ४ थें, | रोख रुपये | ५० |

एखादी चटकदार आणि उपदेशपूर्ण कादंबरी, नाटक, प्रहसन अगर फार्स लिहिणारास पुस्तकाच्या योग्यतेप्रमाणें आणि आकाराप्रमाणें वरील बक्षिसांपैकीं एक देण्यांत येईल.

**अटी**—( १ ) पुस्तक या पुस्तकाच्या आकाराच्या १०० पृष्ठांहून कमी आणि ३०० पृष्ठांहून मोठें नसावें. ( २ ) मजकूर अतिशय स्वच्छ आणि मार्जिन सोडून कागदाच्या एकाच बाजूवर लिहिलेला असावा. ( ३ ) मंडळीमार्फत प्रसिद्ध होणाऱ्या पुस्तकांवर मंडळीचीच सर्वस्वी मालकी राहील. ( ४ ) पुस्तक प्रसिद्ध झाल्यावर एक महिन्यानें बक्षिसाची रक्कम देण्यांत येईल. दुसरी आवृत्ति प्रसिद्ध करण्याचा सुदैवानें प्रसंग आल्यास लेखकास बक्षिसाची निमे रक्कम आणखी देण्यांत येईल.

संगीत

# सुंदरमाधव नाटक.

## नांदी.

[ नटी व पारिपार्श्विका प्रवेश करितात. ]

वंदन आर्धीं नंद-नंदना। कुंद-रदन-धर कंस-कंदना. । ध्रु०।
गोपीवदन विलोकित माधव। व्रजवधुवसनविहारी माधव।
कंदुकक्रीडापटु श्रीमाधव। राधाधरआसक्त रमाधव।
रसिकवरां या कविला तैसें रमवुनि मंगल करु तो, रमाधव!
माधव यादवबांधव. ॥ १ ॥ वंदन आर्धीं० ॥

**नटी** व पारिपार्श्विका—

[ चाल—अवन करो तुमचें. ]

वंदुनियां रसिकांनां
कवि हा अर्पितसे नवकुसुमांजलिला. । ध्रु०।
अभिनव कृति जरि लोकप्रिय ही
होउनि रंजवि जनमन पाहीं,
तोष कवीला त्यांहीं;
विरची जो ही सुहास्यमाला. ॥ १ ॥ वंदुनियां० ॥

**नटी**—सखे, तिकडून सांगितल्याप्रमाणं श्रीहरिस्मरण आणि रसिकार्चन करून तर मी बसलेंच. पण अजून कां नाहीं बाई यायचं कोण जाणे! 'मी हा आलोंच, तूं आरंभ कर' ह्मणून सांगून जायचं झालं.

**सखी**—सखे, पण नेहमींपेक्षां आज हा विचित्र प्रकार कां बरं? नेहमीं पात्रं सजविण्याचं काम तुझ्यावर टाकून खुद्द आपण ईशस्तवन आणि रसिकार्चन करतात, आणि आजच कां बरं हें असं?

**नटी**—गडे, योग्य प्रश्न केलास. या अभिनव प्रकाराचं तुला कौतुक वाटून जसा तूं प्रश्न विचारलास तसेच हे रसिक सभाजनहि विचारतील कदाचित्. तर ऐक सांगतें असं करण्याचं कारणः—

[ चाल—लग्नाला जातों मी. ]

**नूतन कृति, सभय कवी, नविन ही कथा;**
**नाथ सभय, केंवि मिळे हीस मान्यता;**
**नट-वर्गहि कुशल नसुनि सेवि भीरुता;**

आणि इकडे तर—

**सरस रसिक-वृंद परी जमत तत्वतां!** ॥ १ ॥

तसंच—

**नृपति, सचिव, गुरु, मंत्री, चेट, भाट ते,**
**कुपित देवि, कंचुकि, ऋषि, विदुषकादि ते,**
**प्रकृत नाट्यकृतिंत नसत; तशिच सरसता;**
**प्रेक्षक परि रसिक जमत, दिसत हास्यता!** ॥ २ ॥

**सखी**—आणि एवढ्याचकरितां पात्रं सजवायला आज खुद्द स्वत: गेले वाटतं?

**नटी**—कसं अगदीं बरोबर ताडलंस!

**सखी**—तर मग आजपर्यंत पात्रं वगैरे सजिवण्यांत तूं जें आपलं सगळं चातुर्य खर्च केलंस, तें आज व्यर्थ झालंतर? पुरुषतरी मोठे धूर्त हो एकून! तरी ह्मटलं, आज ही छपवाछपवी अन् चुकवाचुकवी कां अशी? अस्सं काय! आतां आलं माझ्या ध्यानांत. फजिती झाली तर आपली परभारं दुसऱ्याची. तुला तोंडघशीं देऊन आपण आपले नामानिराळे!

**नटी**—वाः ग वाः! तूंतरी दुसरी मंथराच आहेस एकून! चल, चालती हो इथून! आह्मां दोघांत कलागत लावून पुनः आपली गंमत बघायला मोकळी ती मोकळीच! (स्वगत) पण अजून कां नाहीं बाई यायचं होत!

**सखी**—येताहेत घे! पुरुष ह्मणजे बायकांनांच नेहमीं तोंडघशीं पाडायचे! अन् उलट दोषाचं सगळं खापर बायकांच्याच माथ्यावर फुटायचं. हें बघ आपल्या यजमानांचं शिंग आलं पुढं! खरंच गडे, अलीकडे फारा दिवसांत नव्हतं पाह्यलं असलं सोंग! मघाशीं तूं ह्मणालीस त्या नव्या नाटकांत आहे वाटतं हें! तर मग हें नाटक खूपच होईल!

( इतक्यांत सूत्रधार भिल्लाचें वेषांत येतो. )

**नटी**—एकून सखे, प्रियाला तूं ओळखलं नाहींस तर!

**सखी**—( ओळखून तोंडावर दोन्ही हात धरून हंसतहंसत त्याचेकडे पहात पडद्यांत जावयास लागते.) थांब, मी सगळ्याजणींनां बोलावून आणतें हो ही गंमत पाह्यला! हें एवढंच नाटक बस्स होईल आज लोकांनां हंसवायला! हः हः हः हः! ( हंसतहंसत जाते. )

**नटी**—प्रिया—

[ चाल—चंद्रकांत राजाची कन्या. ]

**'किरात'-विरचित 'सुंदरमाधव' नामक कृति नव ती**
**रसिकवरां या दावुनि तोषवुं हेंचि धरुनि चित्तीं**
**गेलां असतां, चित्रवेष हा धरुनि काय आलां?**
**न कळे मजला काय करितसां! चित्तीं भ्रम पडला!**

**सूत्रधार**—

**मत्सम घेशिल चित्रवेष जरि नवकृति तरि दावूं,**
**नातरि रोषा या रसिकांच्या पात्र खचित होऊं.**

**नटी**—

**न कळे मजला काय मांडिलें! हंसतिल अपुल्याला—**

**सूत्रधार**—( तिच्याकरितां आणलेलीं भिल्लिणीचीं वस्त्रें तिला देऊं लागतो. )

**अग, घे या वेषाला,**
**नाहिं नको ह्मणुं लोकवृंद हा तिष्ठत कीं बसला!**

**नटी**—

**हंसेल अपुल्याला—**

**सूत्रधार**—

**छेः, प्रसन्न अपुल्याला!**

कां मग घेतेस कीं नाहींस हा वेष?

**नटी**—छेः बाई, हें असं भलतंच काय सांगायचं तें!

**सूत्रधार**—भलतेंच! वेडच लागलेंय आह्मांला जसें कांहीं भलतेंच सांगायला!

**सखी**—( दोघीतिघी मैत्रिणींसह प्रवेश करून बोटें दाखवून हंसते. ) सखे, घे घे, घे तो भिल्लिणीचा वेष!

**"ह्याच वनामधिं भिल्ल नांदतो, काम नाम त्याला,"**
**हाच जनांमधिं भिल्ल नांदतो—भिल्लिण तूं ह्याला!**

**सूत्रधार**—कोणतरी वात्रट आहे ही तुझी सखी!

**नटी**—एकून आपलं अन् माझं दोघांचंहि असं हंसंच करून घ्यायचं कीं नाहीं जगामधें! मी जातें बाई आपली इथून—( जाऊं लागते. )

**सूत्रधार**—जातेस? ठीक आहे. माझा आणि या साऱ्या सभाजनांचा आज तूं रसभंग करित आहेस, याबद्दल—

**नटी**—(पुनः किंचित् परतून) हें काय बाई असं! रागवायाचं काय म्हणून असं?

**सखी**—( तिला मागें ओढून ) चलग, काय लागते आहेस त्या भिल्लाच्या नादाला? ( ओढून नेते. )

**नटी**—( पडद्यांत ) काय बाई करूं तरी आतां? गडे हें बघ, मला किनई कांहीं सुचेनासं झालं आहे.

**सूत्रधार**—जा जा, गेलीस? सुटलीस! ठीक आहे! ( पडद्याकडे पाहून )— हें कोण आलें? हा माझा कलिजा मुकुंद इकडेच येत आहे! आणि नाटकाच्या सुरुवातीची घंटाहि पण झाली! मात्र—

[ साकी. ]

**माझा तैसा या रसिकांचा त्वां रसभंगचि केला,**
**विचित्र वृत्ती धरुनि तुला तरि करितों बघ शिक्षेला;**
**जाशि कुठें पळुनी । अवमानुनि मज अशि त्यजुनी?**

[ जातो.

---

# अंक १ ला.

## प्रवेश १ ला.

[ **स्थल**—बुधवारबाग. मुकुंदराव बांकावर बसला आहे असा प्रवेश.]

**मुकुंदराव**—( बर्डस आयची विडी करतो. ) मॅचबॉक्स विसरलों कीं काय? ( खिसे चाचपतो. ) आहे, तरी ह्मटलें विसरेन कसा! (विडी ओढून धूर काढतो.) बस्स! पैसा पैसा पैसा! पैसा आहे तर सर्व कांहीं आहे. ईश्वरानें मनुष्याला जो जन्म दिला आहे तो त्यानें दुःखक्लेशांत दिवस काढून खितपत मरण्याकरितां मुळींच नव्हे. तर इहलोकचीं सुखें, वैभवें, चैन भोगण्यासाठींच मनुष्याचा जन्म आहे. आणि हीं सुखें ज्याच्यापाशीं विपुल पैसा आहे त्यालाच वश होतात. तेव्हां प्रत्येकानें पैसा मिळविणें हेंच त्याचें मुख्य कर्तव्य समजलें पाहिजे. आतां कोणी पापपुण्य, देवधर्म, न्यायनीति यांनां भिऊन वागेन ह्मणेल तर साऱ्या जन्मांत त्याला या पैशाचें आणि अर्थात् सुखाचें दर्शनहि व्हावयाचें नाहीं. पैसा मिळवितांना भाऊ ह्मणतां नये, बाप ह्मणतां नये, पापपुण्याच्या नसत्या भीतीला अंतःकरणांत थाराहि देतां कामा नये! गोड बोलून, थापा देऊन, भीति दाखवून, प्रसंगीं गळेहि कापून पैसा संपादन केला पाहिजे. निदान मीतरी आजपर्यंत याच तत्वावर वागत आलों आणि अशा वागण्यांत हा वेळपर्यंततरी नाहीं आपल्याला ठोकर लागली. उलट सदा यशच येत गेलें. माझी सख्खी बहीण दुर्गाताई—तिचा नवरा विसाजीपंत आजारी पडला तेव्हां रात्रंदिवस त्याच्या उशाशीं बसलों आणि त्याची आणि त्या विषाजीपंताची दोस्ती करून देऊन त्याला वैकुंठपुरीं कृष्णाजीपंताकडे दिला पाठवून! त्याच्यामागें त्याच्या मृत्युपत्राची एक भानगड राहिली होती; तीहि त्या मामा लिखत्यांच्या सल्ल्यानें टाकली एकदा उरकून. दुसऱ्यांच्या हुबेहुब सह्या करण्यांत ती स्वारी मोठी पटाईत आहे. तेव्हां त्यासंबंधानें भ्यायचें कांहीं कारणच नाहीं. तिकडे अण्णासाहेब रजिष्टरांच्याकडेहि संधान जुगिवलेंच आहे. फार झालें तर पांचपन्नास रुपये लागतील त्याच्या तोंडावर टाकायला. पण तेवढ्यानें पांचसात हजार तरी हातांत येतील कीं नाहीं आज नक्की! हें एक झालें. तिकडे त्या आंधळ्या प्रेमाबाईची कारकुनी आहेच आपल्या हातांत. आणि आतांतर या माधवरावांच्यासारखें पात्र हातीं आलें आहे. एकंदरींत कोणचाहि धंदा करा, डोकें हें पाहिजेच! डोक्याशिवाय सारें व्यर्थ!

(समोरून कोणी येत असलेलें पाहून) ही पहा आली खुळोबांची स्वारी! ह्या असल्या मंडळीवरतर आमचें सारें जीवन! गुंगत येते आहे स्वारी गुंगत! हरिपूर सोडून स्वारी इथें आली, आणि कुठें पांचसात संगीत नाटकें पाहिलीं मात्र, तोंच अगदीं दंग होऊन जाऊन स्वारीच्या सगळ्या क्रिया संगीतांत सुरू झाल्या! बस्स, उठतां बसतां निजतां हंसतां बोलतां आपलें सारें संगीतच संगीत! तेव्हां ह्मटलें, हें पात्र आपल्याला छान उपयोगीं पडेल! पहिल्यांदा एक नुसती चुणूक टाकून पाहिली. ह्मटलें 'माधवराव, काय हा तुमचा पोषाख!' त्याबरोबर स्वारीच्या डोक्यांत काय चमत्कारिक वेड भरलें पण! मला सांगितलें कीं, 'माझ्याकरितां दुष्यंताच्या पोषाखासारखा एक सुंदर पोषाख आणि तसाच घरांतल्या मंडळींकरितां एक सेट तयार करीव!' अरे, पण हा आलाच कीं इकडे! आतां याला चुकवून नाहीं जातां यायचें.

(इतक्यांत माधवराव गात गात येतो.)

**माधवराव—**

**मन्मथ-तरु-मंजिरी, सुंदरी!**
**कुवलयनयना गानाभिनयें रंजवि मज अंतरीं, सुंदरी!**
**भृकुटिधनू ओढुनी, कामिनी**
**विव्हल करिते कोमलगात्रा, अभेद्य शर सोडुनी, सुंदरी!**

**मुकुंदराव**—तरी बरें आहे, स्वारी गाण्याच्या लकेऱ्या ओढित येत आहे. तेव्हां या वेळीं याला पोषाखाची बहुधा आठवणच व्हायची नाहीं! झालीच यदाकदाचित् तर दिली एखादी थाप ठोकून म्हणजे झालें. (तो जवळ येतांच) ओहो, कोण? रावसाहेब! तुम्ही कुणीकडे इकडे? आणखी तोंडानें हें वर्णन कुणाचें चाललेंय! वहिनींचें कीं काय? कारण 'सुंदरी' ह्मणून आपण त्यांचें नांवहि घेतलेंत, तेव्हां ह्मटलें हें आहे काय आज!

**माधवराव**—छेः रे, वेड्या! हें शशिकलेंतलें त्या विक्रमाच्या तोंडांतलें पद नव्हे का? हें त्यानें काल इतक्या बहारीनें ह्मटलें कीं, ज्याचें नांव तें! अजून माझ्या कानाशीं घुमतेंय तें!

**मुकुंदराव**—अस्सें, शशिकलेंतलें तर हें? मला वाटलें आपल्याला पदें ह्मणतां येतात तशीं तीं करायलाहि येतात वाटतें!

**माधवराव**—छेः रे. तसें होतें तर काय बहार होती!

**मुकुंदराव**—तुम्ही 'सुंदरी' ह्मणून ह्मणालांत तेव्हां आपलें मला वाटलें कीं, ह्मीं आपलें वहिनींनांच अनुलक्षून रचलें आहेत हें पद.

**माधवराव**—( पद पुनः ह्मणूं लागतो. ) हो खरेंच कीं! तिलाहि हें अगदीं रोबर लागू पडतें! हें आतां तूं सुचविल्यावरून आलें माझ्या चटकन् लक्ष्यांत. त्रतांकडे हात करून) या मन्मथतरूवरची ती मंजिरी तर आहेच. तिचें या पदांत टल्याप्रमाणें 'सुंदरी' नांव असून नांवाप्रमाणें खरोखर ती सुंदरहि आहेच. वलयाप्रमाणें तिचे नयन आहेत. मात्र गानानें आणि अभिनयानें आजपर्यंत ाझें तिच्याकडून मनरंजन नाहीं झालें. पण हें करितां येईल. आणि—

**भृकुटिधनू ओढुनी**
**कामिनी विव्हल करिते अभेद्य शर सोडुनी!**

ततर शंकाच नाहीं! आतां कायतें गाण्याचें आणि अभिनयाचें तेवढें मात्र हिलें पाहिजे. बरें, पण मुकुंदराव! तुला ते कपडे करवायला सांगितले होते त्याचें ाय झालें?

**मुकुंदराव**—हा त्याच्याचकडे निघालों होतों पुन्हा. सकाळीं गेलों होतों, ा तो भेटला नाहीं. हे शिंपी ह्मणजे असेच! कपडे शिवायला दिले तर वेळेवर नाहीं यचे हे कधीं!

**माधवराव**—अरे, त्याला जरा लालूच लाव. आपल्याकडून दोन पैसे जास्त ळतील असें त्याला वाटलें ह्मणजे आपलेंच काम अगोदर करून देईल तो.

**मुकुंदराव**—हो, हें बरें सुचविलेंत. (स्वगत) आणि या रावसाहेबांच्याकडून ा उकळायलाहि ही एक चांगलीच लालूच आहे! ( उघड ) तुह्मी आतां कुठें ोंच जातां कीं नाहीं?

**माधवराव**—हो घरींच. तूं जा अन् कपड्यांचा शोध घेऊन ये तेवढा. येतों तर. ( जातां जातां ) बरें, पण तूं वाट कुणाची पहातो आहेस इथें?

**मुकुंदराव**—आमच्या यजमाननीचे जांवई-जयवंतराव-आले आहेत ाईहून. ते लायब्ररींत जाऊन येतों ह्मणाले ह्मणून त्यांची वाट पहात बसलों आहें जरा इथें.

**माधवराव**—ठीक आहे. मी जातोंच तर. आज कपड्यांचा मात्र तेवढा ध करायला विसरूं नकोस हो! (स्वगत) घरांत आपल्या बायका जर

नाटकांतल्या नायिकेसारखीं पदें ह्मणायला शिकल्या, तर काय बहार होईल!

[पूर्वोक्त पद गुंगत जातो.

**मुकुंदराव**—एक वेळ तर मारून नेली. मला वाटलें होतें, ही स्वारी लकेऱ्या झोडित येते आहे तेव्हां हा त्या कपड्यांसंबंधानें विचारायला विसरेल. पण त्या पदांतल्याच 'गानाभिनयें' या शब्दांवरून याला कपड्यांची आठवण झाली; आणि ही आठवण द्यायलाहि माझा मीच कारण झालों. पण यानें आपलें काय वाईट झालें? आपल्याला दोन पैसे जास्त ओढायला यानें होऊनच मार्ग सुचवून दिलान्. तर आतां अगोदर त्या शिंप्याला जाऊन गांठावें आणि त्यानें कायकाय कपडे केले आहेत ते पहावे. नाहींतर रावसाहेबांच्याकडून ओढलेले पैसे पचणार कसे? लागतील तसे पैसे ओढायला हें पात्र मात्र छान आलेंय आपल्या हातीं. तेव्हां आतां कमी कां करा? (जातां जातां)

**अडप झडप घालुनियां पैसे उपटतों,**
**घेरुनियां खुळसटांस नादिं लावितों,**
**बोलुनियां गोड गोड फांस टाकितों,**
**शेवटिं मी सहज पहा डाव साधितों!**

---

## प्रवेश २ रा.

[**स्थल**—माधवरावाचें घर. सुंदराबाई व रमाबाई झोंपाळ्यावर बसून गाणें ह्मणत आहेत. गाणें संपतांच रमाबाई उठते.]

**रमाबाई**—येतें बाई मी आतां. फार वेळ झाला येऊन मला. गाणीं ह्मणायच्या नादांत समजलंदिखील नाहीं किती वेळ झाला तो!

**सुंदराबाई**—थांब, कुंकूंतरी लावतें. वहिनी, तुझी बाई सदान् कदा आपली घाईच!

**रमाबाई**—दुर्गीला निजवून आलें होतें मी. ती जागी झाली असली तर तिनं सगळं घर डोक्यावर घेतलं असेल. (सुंदराबाई कुंकू लावते व रमाबाई जाऊं लागते.)

**सुंदराबाई**—उद्यां येशील ना?

**रमाबाई**—हो, वेळ मिळाला तर येईन. नाहींतर तूंच ये ह्मणजे झालं तिकडेच.

**सुंदराबाई**—तूं नाहींच आलीस तर येईन मग मी.

**रमाबाई**—येतें तर मी.

**सुंदराबाई**—ये हो. (परत येऊन झोंपाळ्यावर बसून अर्धा झालेला हार पुन्हा गुंफूं लागते.) वहिनीनं शिकविलेलं हें कृष्णावरचं गाणं किती गोड आहे बाई! दोनतीन दिवस जेव्हां याच्या मागं लागलें तेव्हां आज कुठं वाटतंय मला हें पाठ झाल्यासारखं. पाहूंतरी मला एकटीलाच आठवतं का सगळं. (गाऊं लागते.)

[ चाल—मस्तकिं जटाजुट त्रिपुंड्र भाळिं ग. ]

**नाटकि सुंदर माधव कितितरि सखि ग!**

**सुहास्य सुरुचिर कपोलिं ज्याच्या ग,**
**सुनील कमलिनि लोचनिं धरि ग,**
**वदूनि वच मधु मोहवि मज ग,**
**जयास देखुनियां भामा हो वेडि ग!**

**नाटकि सुंदर माधव कितितरि सखि ग!**

**माधवराव**—(हळूच येऊन आड उभा रहातो.) मला जें पाहिजे होतें तेंच इथें आहे. जसें हें गाणें हिच्या ठिकाणीं आहे, तसा अभिनयहि असेल तर काय बहार होईल! हें गाणें मोठें गोड दिसतेंय. तर आपण मुकाट्यानें इथें उभें रहावें आणि हें ऐकावें. (ऐकून) एकून कृष्णावरलें म्हणते आहे ही गाणें!

**सुंदराबाई**—

**सुदाम सुरुचिर गुंफित भामा ग,**
**ह्मणत हरीवरि सुंदर गाणं ग,**
**मंदिरिं एकदिनिं बैसलि होति ग!**
**नटवर माधव नाटकि किति ग!**
**जयास देखुनियां प्रिया हो वेडि ग!**

**माधव स्मितमुख चोरुन येइ ग,**
**पाउल हळुहळु टाकित सखि ग,**
**भामेस चुंबुनि लज्जित करि ग,**
**नटवर माधव नाटकि किति ग!**
**जयासि देखुनियां भामा हो वेडि ग!**

**माधवराव**—हिनें आपल्या गाण्यांत सुचिवलें आहेन त्याप्रमाणेंच करावें, ह्मणजे गंमत उडेल जरा. (मागून जाऊन चुंबन घेतो.)

**सुंदराबाई**—(चपापून उठते.) अगबाई! केव्हां यायचं झालं? कळलंदिखील नाहीं मला अगदीं कसं तें!

**माधवराव**—तूं ह्मटल्याप्रमाणेंच हा सुंदर-माधव हळूहळू पावलें टाकित जर आला, तर तुला कळणार कसें तें? आणि तूं ह्मटल्याप्रमाणें त्यानें या भामेचें असें चुंबन घेतलेंन! (पुनः चुंबन घेतो.) पण पुढें काय झालें तें ह्मण पाहूं.

**सुंदराबाई**—छेः बाई, हें काय भलतंच!

**माधवराव**—भलतेंच! भलतेंच काय झालें यांत? देवाचें गाणें ह्मणायला काय झालें? मी का तुला नाटकांतलीं पदेंबिदें ह्मण ह्मणून सांगतों आहें? किती, आहेत किती कडवीं याचीं आणखी?

**सुंदराबाई**—दोन आहेत आणखी.

**माधवराव**—हं, ह्मणतर मग पाहूं! मोठें गोड दिसतेंय हें गाणें. हं—(तिच्या हनुवटीस हात लावतो.)

**सुंदराबाई**—मी नाहीं बाई.

**माधवराव**—माझ्याजवळ लाजायचें? दोघेंचदोघें असतांना इतकी लाज, मग तिसरें कुणी जवळ असतें तर किती लाजली असतीस? बायकाचबायकां असलांत ह्मणजे हेंच तुमचें तोंड कसें हवेंतसें चालतें, नाहीं? मग लाज, भीड कांहीं उरत नाहीं. हं, चल ह्मण लौकर.

**सुंदराबाई**—इश्श, ह्मणून काय झालं! मला बाई लाज वाटते!

**माधवराव**—लाज कसली त्यांत? हं—म्हणा—चालूंद्या—

**सुंदराबाई**—ह्मणतें, पण बाई—

**माधवराव**—बाई काय?

**सुंदराबाई**—नांव ठेवायचं होईल!

**माधवराव**—वेडी आहेस! आणि नांव ठेवलेंहि कदाचित् तरी मीच ठेवणार ना? हं चल, आटप लवकर—

**सुंदराबाई**—ह्मणतें बाई-(लाजत, अर्ध चरण ह्मणत, अर्धा सोडून देत आठवूनआठवून ह्मणते.)

**पहात मुरडुनि हरीस वदनीं,**
**काजळ-कुंकुम-मुद्रित देखुनि,**
**तांबुल विलसित मुखांत बघुनी,**
**वदत नाटकी माधव किति ग!**
**जयास देखुनि भामा हो वेडि ग!**

**माधवराव**—झालें? एवढेंच?

**सुंदराबाई**—नाहीं-आणखी एक कडवं आहे.

**माधवराव**—(अधीरतेनें) हं, ह्मण तर.

**सुंदराबाई**—

**माधव धरि कर बळेंचि स्वकरीं,**
**सुदाम चुरडुनि फेंकित अंबरिं,**
**सकोप हरिकर वारित सुंदरि,**
**चुंबुनि शमवित प्रकोप-लहरी,**
**नटवर माधव नाटकि किति ग!**
**जयास देखुनि वेडि हो भामा ग!**

**माधवराव**—वा:, किती गोड आहे हें गाणें! त्यांत बायकांच्या जात्याच कोमल आणि मधुर कंठांतून आल्यावर तर त्याची गोडी जास्तच चढते!

**सुंदराबाई**—हो, गोड ह्मणून आपली थट्टा करायची झालं एखाद्याची!

**माधवराव**—थट्टा! छे:, नुसतें गोडच नाहीं, पण मिट्टास लागतें. हेंच पद पेटीवर बशिवलें तर किती बहारदार उठेल! (तिच्या हातांतून हार घेतो.) भामेनें सुदाम चुरडून टाकलीन ह्मणून तुला नाहीं मी ही चुरडूं देणार. तो कृष्ण काय सोळा सहस्र गोपींच्या इथें जाणारा; तसा जोंपर्यंत मी झालों नाहीं तोंपर्यंत भामेसारखें तुला कोपाला चढण्याचें कारणहि मी घडूं देणार नाहीं!

**सुंदराबाई**—छे: बाई, (हात व हार सोडवून घेऊं पहाते.)

**माधवराव**—हं सोडवून कां घेतेस? आण, आण तो गजरा!

**सुंदराबाई**—मग मी देत कां नाहीं ह्मणतें? पण ही एवढी गांठतरी देऊंदे मला.

**माधवराव**—देदे. (सुंदराबाई गांठ देते, माधव तिचें चुंबन घेतो.)

**सुंदराबाई**—हें काय बाई!

**माधवराव**—दुसरें काय असणार? कृष्णानें भामेचा कोप घालवण्याकरितां जें काय केलें ह्मणून तूं गाण्यांतून ह्मणालीस तेंच मीं केलं. (स्वगत) बरें पण, आतां हिला कालचें नाटक कसें काय झालें तें विचारावें. ही कार्य ह्मणते तेंतरी पाहूं. (उघड) बरें, पण कालचें नाटक कसें काय आवडलें तुला?

**सुंदराबाई**—इश्शः, हें काय बाई विचारायचं पण तें?

**माधवराव**—इश्श करायला काय झालें? चल, (हात धरून) सांग, तुला आवडलें कीं नाहीं तें?

[चाल—तुझी अन्यथा ती कराया कृती.]

**प्रिये! लाज कां ही अशी संप्रती?**
**सुखें वद सखे! जें गमे तुजप्रती. ।ध्रु०।**
**किती दिव्य वस्त्रें तशीं भूषणें**
**घालुनी नट कसे सखे! रंगती;**
**सरस मार्मिक वचें जनां मोहुनी**
**थक्क करि नटि मधुर गानामृतीं! ॥ १ ॥**
**प्रिये! लाज कां ही अशी संप्रती?**

**सुंदराबाई**—होय, मग इथं कोण नाहीं ह्मणतंय तें? पण बाई—

**माधवराव**—'पण बाई' करून मध्येंच कां थांबलीस?

[चाल—कवणें तुज गांजियलें.]

**बोल बोल येत असे हृदयिं जें प्रिये!**
**आंवरुनी धरूं नकोस-येत जें स्वयें!**
**नातरि मी अधर तुझा हळुच चुंबुनी**
**शोषुनियां हृद्गत तव मधुर चुंबनीं,**
**काढिन बाहेर सखे! धीट होउनी;**
**नातरि वद दूर करुनि विनय निर्भयें!**
**बोल बोल येत असे हृदयिं जें प्रिये!**

**सुंदराबाई**—हें काय मेलं, जसं नाटकच आरंभलं आहे! (असें ह्मणून त्याचे छातीवर डोकें टेंकून उभी रहाते.)

**माधवराव**—होहो, अगदीं खरें, नाटकच! तें होतें संगीतांत आणि हें आहे साधें-प्राकृतांत!

[चाल—सुखवि ही वदनकली.]

**सुदति! हो नटि रुचिर, नट मीही! ।ध्रु०।**

**सुदति! हो नटि रुचिर, प्रिय करुं वरतनु,**
**मनसिज रतिसम धरुनि वेष! ॥ १ ॥**
**विनय सोड, प्रणय जोड, मज दे परिरंभा,**
**विलया ने जृंभा, स्वीय दंभा**
**हरुनि सखि! लवलाहीं! ॥ २ ॥**

**सुदति! हो नटि रुचिर, नट मीही!**

बोल बोल, कसें झालें कालचें नाटक?

**सुंदराबाई**—काय बोलूं बाई? चांगलं झालं, पण हें पहा किनई–

**माधवराव**—पुनः थांबलीस?

**सुंदराबाई**—लाज वाटते बाई—मीतरी काय करूं?

**माधवराव**—कसली लाज?

**सुंदराबाई**—बघायची–अन् सांगायचीदिखील!

**माधवराव**—'बघायची अन् सांगायची'! इथेंतर आपण दोघेंच आहों. मग सांगायची कां वाटावी?

**सुंदराबाई**—कां, तें काय सांगूं बाई मी?

**माधवराव**—बरें, पण नाटक बघतांना लाज वाटली ह्मटलेंस तें केव्हां केव्हां बरें? (स्वगत) पाहूं आतां याला काय उत्तर देते ती. (उघड) हं, बोल लवकर.

**सुंदराबाई**—काय, करायचं काय पण बाई तें?

**माधवराव**—पण सांगायला काय हरकत आहे? (तिच्या हनुवटीस हात लावतो.) हं बोला, बोला एकदा.

**सुंदराबाई**—इश्श, हें काय असं? (त्याचें बोट धरते.)

**माधवराव**—इश्श काय आहे त्यांत?

**सुंदराबाई**—हें पहा किनई, दोनतीन वेळांतर माझ्याकडून वर डोळा करून बघवेनादिखील!

**माधवराव**—अस्सें! केव्हां बरें तें?

**सुंदराबाई**—पुरे बाई विचारणं!

**माधवराव**—बरें, पण कालच्या नाटकांत नायिकेचें काम कुणीं केलें, हें माहित आहे का तुला?

**सुंदराबाई**—ह्मणजे!

**माधवराव**—(स्वगत) आतां हिला फसवून हिची जरा गंमत करावी! (उघड) ह्मणजे काय–कालची शशिकला झाली होती, ती खरोखरच त्या विक्रम झालेल्या गृहस्थाची बायको आहे.

**सुंदराबाई**—अग बाई, ह्मणजे—खरंच का पण हें!

**माधवराव**—खरेंच ह्मणून काय विचारतेस?

**सुंदराबाई**—मग लाज कशी नाहीं वाटत त्या बाईला? किती धीटपणानं बोलत होती ती!

**माधवराव**—हें पहा, त्या विक्रम झालेल्या गृहस्थाचा आणि त्या मुलीचा असे दोघांचेहि बाप पूर्वीं नाटकांत होते; आणि त्यांनीं आपण होऊनच त्या दोघांचें लग्न लावलें. जन्मच गेला त्यांचा त्यांत, तेव्हां त्यांनां त्याचें कांहीं वाटतहि नाहीं झालें!

**सुंदराबाई**—अस्सं! तरी ह्मटलं हुबेहुब अगदीं बायकांच्यासारखं कसं? पण हें पहा, ती त्या सगळ्या नाटकी मंडळींत कशी रहाते बाई?

**माधवराव**—वेडी नाहीं तर! अग, बहुतेक सगळ्यांच्याच बायका जर त्यांच्या बरोबर असतात, तर मग तिलाच कसली लाज?

**सुंदराबाई**—(उत्सुकतेनें) ह्मणजे! सगळ्यांच्याच बायकादिखील अशींच का सोंगं घेतात?

**माधवराव**—छे, भलतेंच.

**सुंदराबाई**—एकून ती शशिकला झालेली खरोखरींची बायको आहे तर! अन् बाई इतक्या मंडळींच्या देखत ती अप्सरा होऊन आली–आणि त्या विक्रमानं जेव्हां–काय सांगू बाई–तेव्हांतर वर डोळा करून बघवेनादिखील माझ्यानं!

**माधवराव**—तें झालें, गेलें, सगळें आटपलें. आत्तां कां पण लाजते आहेस अशी उगीच? (तिची हनुवटी वर उचलून चुंबन घेतो; ती हात दूर करते.)

**दूर सखे! कां करिशी करा उगि दूर?**
**कोणिहि नसतां लाज काय ही, सुंदरि! करिं ही दूर!**

हें बघ माझ्या मनांतून—

[चाल—ही मम करिंचि मुद्रिका.]

**ही तव सुतनु-वल्लरी, भूषवीन अजि प्रेमभरीं. । ध्रु० ।**
**अवतंससुमें हीं डंवरुनियां,**
**दुकूलभरें परिधानुनियां,**
(तिचा हात आपले कंठभागीं नेऊन)
**ही कर-मंजिरि निजकंठावरि देइन चढवुनि स्वांतरीं ! ॥ १ ॥**
**परि तुजला हें रुचत असे कीं**
**नाहीं? सखे! वद, मूढ विपाकीं**
**हाय! पडत मन, तूंच करिं अवन, हीच आस मम सुंदरी ! ॥ २ ॥**
**ही तव सुतनु-वल्लरी, भूषवीन अजि प्रेमभरीं !**

माझ्या मनांतून तुला त्या अप्सरा झालेल्या शशिकलेसारखी सजवून पाह्यची आहे एकदा!

**सुंदराबाई**—इश्श, कांहींतरीच बोलायचं झालं! थट्टा चालविली आहे वाटतं माझी?

**माधवराव**—थट्टा? वेडी नाहींतर! थट्टा कसली यांत?

**सुंदराबाई**—थट्टा नाहीं तर काय! बरं, पण मी ह्मणतें—त्या विक्रम राजाचा जसा पोषाख होता तसा घालवेल का इकडून?

**माधवराव**—हो, न घालायला काय झालें? त्याची कसली आली आहे लाज? (स्वगत) तो मुकुंदराव माझ्याकरितां दुष्यंतासारखा आणि इच्याकरितां शकुंतलेसारखा पोषाख करवितों ह्मणून सांगून दोनशें रुपयांच्या नोटी घेऊन गेल्याला आज महिना होत आला, अजून कशाला कांहीं ठिकाण नाहीं. हें असें कसें बरें? (उघड) बरें, मीं घातल्यावर तर तूं घालशील?

**सुंदराबाई**—जसं कांहीं खरंच चाललंय अगदीं!

**माधवराव**—खरें ह्मणजे! मीं घातला ह्मणजे मगतर घालशील ना तूं?

**सुंदराबाई**—आधीं इकडून घालायचा होऊं दे, मग पाहीन मी.

**माधवराव**—मग काय पाह्यचें? घालीन म्हणून स्पष्ट सांगायला इतके आढेवेढे कशाला?

**सुंदराबाई**—आपल्याला कांहीं नाहीं ह्मणा बरं दिसायचं तें! पण किनई, किशाला जर त्या विक्रमाच्या मुलासारखा पोषाक करविला तर मात्र छान दिसेल!

**माधवराव**—हो हो. हें बरीक तो प्रवेश चालला असतांनाच माझ्या लक्ष्यांत येऊन चुकलें. मी अगदीं आठवणीनें तुला सांगणार होतों, पण मध्येंच विसरलों. पण आज किशा अगदीं कुठें दिसलाच नाहीं तो!

**सुंदराबाई**—निजलाय तो. गुलाम काल रात्रीं अगदीं एकसारखा टक लावून बघत होता. त्याला तिथं झोंपदिखील नाहीं आली कशी ती!

**माधवराव**—आणि तुला?

**सुंदराबाई**—हें काय बाई विचारायचं? मग किशाला करवायचाना तसला पोषाक?

**माधवराव**—हो हो, अलबत! इकडून हुकूम सुटल्यावर नाहीं कोण ह्मणणार?

**वदुं तुला काय न कळे!**
**कमलिनि फुलतां, शशि तो कांति धरी कैशी,**
**वर तेजें सुखवाया दयितेला! । ध्रु० ।**
**रुचिर मधुर मधु देतां निज अधरें प्रिय कांता,**
**कैसा । माधव हा । वरिल पहा ।**
**अदयपणा । चालला । दयितेच्छा । पुरवाया! ॥ १ ॥**

**सुंदराबाई**—हें काय बाई उरफाटं ह्मणायचं! चंद्रोदय झाला ह्मणजे कमलिनी विकासतात ना? आणि मग हें असं कसं ह्मणायचं?

**माधवराव**—

**मज गमे विश्व फसतें! । ध्रु० ।**
**'कमलिनि फुलती अवघ्या चंद्रकला येऽतां नभभागीं,'**
**जनिं ऐसें वदतांना. ॥ १ ॥ मज गमे० ॥**
**रुचिर मधुर मधु हास्या कमलिनिच्या देखुनियां**
**येई शशि उदया! हेंचि खरें ।**
**तशिच कृती । संप्रती । वरिताती । युव युवतीं. ॥२॥ मज० ॥**

(कांहीं गलबला ऐकल्यासारखें करून) थांब, बाहेर हा गलबला कसला आहे बरें?

**सुंदराबाई**—असेल बाई कसला तरी.

**माधवराव**—नाहीं. पण हा मुकुंदरावाचाच शब्द दिसतोय, थांब आलोंच हा—

[जातो.

---

## प्रवेश ३ रा.

[ स्थल—माधवरावाचें घर. मुकुंदराव व एक शिंपी प्रवेश करितात. ]

**मुकुंदराव**—( शिंप्यास ) गधडा नाहींतर!—लाज नाहीं वाटत तुला? कपडे शिवायला देऊन आज बरोब्बर महिना झाला, कापड तिकडे, कपडे तिकडे आणि तूंहि तिकडेच! तुझ्या इथें खेपा घालून जोडे फाडायला वेळ कुणाला आहे? बऱ्या बोलानें हे कपडे इथें ठेव, आपले दाम घे, अन् घरची वाट धर–

**शिंपी**—( कात्री व गज पुढें करून ) म्हाराज, ऐकूणतर घ्याल—

**मुकुंदराव**—यापुढें एक चकार शब्द काढशील तर लाथ बसेल आणि मुकाट्यानें चालतें व्हावें लागेल! (त्यास धक्का देऊन) चल, हो चालता—गधडा, चोर, हरामखोर, बेवकूफ नाहीं तर—

(गडबड ऐकून आंतून माधवराव येतात.)

**माधवराव**—मुकुंदराव, कोण आहे? गलबला कसला माजिवला आहे इतका?

**मुकुंदराव**—( शिंप्यास ) बघतोस काय? गध्धा, हरामखोर! अजून नाहीं चालता होत!

**शिंपी**—( कांपत ) म्हाराज, मी काय म्हनतों तें ऐका तर खर–

**माधवराव**—काय? आहे काय भानगड मुकुंदराव? त्याच्यावर कां इतके कातावलां आहांत? काय केलेंन त्यानें? कापडबिपड खाल्लेंन कीं काय?

**मुकुंदराव**—रावसाहेब, काय सांगूं? ते सोनारडे, हे शिंपडे, आणि ते सुतारडे, यांच्यासारखी निम्मकहराम जात नाहीं जगांत! बाप मेला तरी खरें म्हणून बोलायचे नाहींत—

**माधवराव**—काय, म्हणतो काय तो?

( इतक्यांत सुंदराबाई, किशा, निरी, मंगळ व भिकंभट येतात ).

**मुकुंदराव**—अहो म्हणायचें काय? कपडे शिवायला देऊन आज महिना झाला—कापड तिकडेच, कपडे तिकडेच आणि हाहि तिकडेच! मग याला का साव म्हणावें का चोर म्हणावें? हरामखोर नाहींतर—हें पहा, बऱ्या बोलानें ते कपडे ठेव आणि चालता हो. तुला साफ मिळणार नाहींत ते—

**माधवराव**—कसले कपडे?

**मुकुंदराव**—आपण जे मला करायला सांगितले होते ते.

**शिंपी**—म्हाराज, ते किर्लोस्कर मंडळीचे आहेत. त्यांणीं हे मुद्दाम णवे करिवले आहेत!

**माधवराव**—पाहूं, कपडे तर पाहूं.

(मुकुंदराव कपड्यांचें गांठोडें सोडूं लागतो.)

**शिंपी**—म्हाराज, ते फुटकल देतां येत नाहींत. उद्यां दोनपारपर्यंत तुमी सांगाल तसले करूण देतों पाहिजे तर.

**मुकुंदराव**—पुनः लागलास चुरचुर बोलायला! आटप, जीभ आटप, 'फुटकल देतां येत नाहींत!' चोर—हरामखोर—

**शिंपी**—(मुकुंदरावास) म्हाराज, कपडे नीट वापरा—तसा णका हात लाऊं, घान होतील कपडे—

**मुकुंदराव**—चोरा! सगळें कळतेंय मला. तूं नको कांहीं शिकवायला! चोर नाहींतर—

**शिंपी**—मंडळीला दिले पाहिजेत, त्यांचा तगादा येऊण बसला आहे अगदी.

**मुकुंदराव**—साफ मिळत नाहींत! 'फुटकल देतां येत नाहींत!' तूं काय समजला आहेस? सगळे ठेवून घेऊं. जा, तूं चालता हो अगोदर इथून. (माधवरावांस) रावसाहेब, घालून पहा हा अंगरखा.

**माधवराव**—अरे पण—

**मुकुंदराव**—त्याच्या बापाची काय भीति आहे? दोनशें सुर्ती आगाऊ त्याच्या नाकावर टिचले आहेत. (शिंप्यास) 'फुटकल देतां येत नाहींत!' तूं काय समजला आहेस? सगळे घेऊं. (माधवरावांस) तो काय समजला आहे? बघतोय पहा कसा चोरासारखा! चोर हरामखोर नाहींतर! (गज व कात्री हिसकून घेऊन शिंप्यास) खरा आहे हा गज? का नेऊं गेटावर? या कात्रीनें आजपर्यंततर तूं किती जणांचे खिसे, हात आणि गळे कापले आहेस!

**भिकंभट**—कापलेन, आणि शिवलेनहि पण आहेत त्यानें मातक्यान! माझ्या या बाराबंदीचे खिसे त्यानेंच लावलेन सगळे. पण—

**मुकुंदराव**—भटजी—चप्प रहाल का जरा? आपलें नको शहाणपण वहायला मध्यें. (माधवरावांस) रावसाहेब, बेलाशक घाला तुम्ही. पाहिजे तर खोलींतल्या त्या आरशांत पाहून घाला.

**शिंपी**—णऊशें साठ रुपयांचा आकार झालाय. त्यांत दोणशें गेले. आतां आठशें आन् साठ यायचे—

**मुकुंदराव**—गद्धा नाहींतर! बरोबर हजार म्हणायचे होतेस! जा–जा मुकाट्यानें–आणि उद्यां सकाळीं आपलें बिल करून घेऊन ये, मग पाहूं तुझा काय हिशोब होतो तें! हं:, नऊशें साठ आकार झाला, अन् त्यांत अगाऊ दिलेले दोनशें जाऊन आठशें साठ उरतात काय? काय चोराचा हिशोब!

**भिकंभट**—अरे ए शिंपड्या! उभा रहा, जाऊं नकोस.

**शिंपी**—(आपल्याशीं) काय मगरूर आहे हा भटुरगा!

**भिकंभट**—हें पहा रावसाहेब, हे शिंपी लोक फार फसवे असतात. (शिंप्यास) कायरे, हे कपडे तूं हातानें शिवलेस कीं यंत्रावर?

**शिंपी**—यंत्रावर—

**भिकंभट**—(वेडावून) 'यंत्रावर!' तर मग इथें बैस, अन् इथें बसून हे सगळे तूं उशीव अगोदर, अन् मातक्यान हातांनीं शीव सगळे. पैसे घ्यायचे घेऊन काय हरामखोरी पहा हो! हें पाहिलेंत रावसाहेब, एक टाका उसवला कीं सगळी शिवण उसवली जाते! ही मातक्यान् नवी शिलाई पटकवायची विद्या! चोर हो चोर, हरामखोर जात! म्हणच आहे कीं, 'शिंपी, सोनार, कुळकर्णीअप्पा, यांची संगत नकोरे बाप्पा!' म्हणून म्हणतों, हा पक्का चोर आणि हरामखोर आहे.

**शिंपी**—भटजीबोआ–वाइच तोंड संभाळूनशेनी बोला! कुनाला देता शिई?

**भिकंभट**—(वेडावून) 'कुनाला देता शिई? शिई!' (डोळे वटारून शिंप्याकडे बघत उभा रहातो.)

**माधवराव**—(हंसून) अरे जा, तूं त्यांचें काय ऐकतोस? उद्यां बिल घेऊन ये आपलें.

**मुकुंदराव**—मग भिकंभट खोटें म्हणतात कीं काय? या शिंपड्यांची जातच ही अशी रगेल. (शिंपी जातो. माधवराव मंगळाकडून पोषाख घेववून आंत जातो व पोषाख करितो.) या केशवराव, तुम्हांला त्या शकुंतलेच्या मुलासारखा पोषाख पाहिजेना? (मुकुंदराव त्यास पोषाख घालूं लागतो व मधून सुंदराबाईकडे चोरून पाहून स्वगत) दुसऱ्यांच्या बायकांनां प्रसन्न करून घ्यायची सोपी युक्ति म्हटली म्हणजे त्यांच्या मुलांनां जरा आंजारलेंगोंजारलें कीं झालें! (त्याचे कोटाच्या गुंड्या व विजार घालून) किच्छोपंत, वा:! किती सुंदर दिसतां म्हणून सांगूं!

**सुंदराबाई**—(आपल्याशीं) भावजींचं कितीतरी प्रेम आहे किशावर!

**निरी**—अशा राजबिंड्या मुलाली कोन न्है उचलनार!

**मुकुंदराव**—कशी राजबिंडी दिसते आहे स्वारी वहिनी! याची आज दृष्ट टाका काढून—(किशाला) थांब नीट घालतों टोपी—(टोपी घालून गालावरून हात फिरवून त्याचें चुंबन घेतो.)

**किशा**—

**हां हां दूल शला, तुमि दूल शला, तुमि दूल शला!**
**लाउं नका कल, लाउं नका कल, लाउं मला!**
**तुमि दूल शला!**

(सर्व हंसतात.)

**सुंदराबाई**—गुलामा, पर्वांच्यांतले कांहीं शव्द लक्ष्यांत धरलेस वाटतं?

**निरी**—दिरीष्ट काढूनशेनी टाकली पायिजे यांची (इतक्यांत माधवराव पोषाख करून येतो त्यास अनुलक्षून)—आन् यांचीबी!

**माधवराव**—कसें काय दिसतें मुकुंदराव?

**मुकुंदराव**—एः हे! मोरोबा वाघूलीकरदेखील झक होऊन जाईल याच्यापुढें! कां भिकंभटजी?

**भिकंभट**—अहो, विचारतां काय! एखाद्या कुंभाराच्या कवळ्याश्या शामकर्णावर जरी असा सुरेख पोषाख चढिवला, तरी तोदेखील खुपसुरत दिसेल! कां, खरें आहे कीं नाहीं मी ह्मणतों तें?

**मुकुंदराव**—विद्वान् आहांत झालें आपण! तुह्मांला नाहींच पसंत पडायचें हें! (माधवरावास) आतां भावड्यासारखें एखादें गोड गळ्याचें पात्र मिळालें कीं झालें——

**भिकंभट**—ह्मणजे? एखादी नाटककंपनी काढायचा बेत आहे कीं काय?

**माधवराव**—हो, पण तुह्मी याल का आमच्या नाटकांत?

**भिकंभट**—हो, येऊं की! न यायला काय झालें? तुह्मीं सोंग घेतल्यावर आह्मांला कसली आली आहे लाज?

**मुकुंदराव**—भिकंभट, संभाळा हां. इथें नथनी लागेल चढवायला, तेव्हां समजेल नाटकाचें सौख्य!

**भिकंभट**—(मान डोलवितो) हं हं, घालूं घालूं बरें, नथनीदेखील घालूं! मात्र तुमच्यासारख्यांनीं आलें पाहिजे मग खिसे भरून—

**माधवराव**—अरे, पण ही निरी कां इतकी हंसते आहे!

**निरी**—(दोन्ही हात तोंडावर धरून तोंड झांकून हंसते) हः हः हः ह! सकुंतलाबाई, दुःसंतम्हाराजांचीच जनु सवारी आलीया अक्शी!

**माधवराव**—काय, काय म्हणते आहे ती?

**निरी**—काई बी न्है! ह्मंगाले–सकुंतलाबाईसाब दुःसंतह्माराजांची वाट पगत्याती.

**माधवराव**—अस्सें! आणि ही प्रियंवदा का तर अशी इथें एकटी आपल्या सखीला टाकून? निरे! तूं फार फाजीलपणा चालिवला आहेस! (तिला विनोदानें मारूं पहातो तों पगडी पडते ती उचलतो.)

**निरी**—हः हः हः हः! राजा दुःसंता! हा चांगला न्है झाला सकुन तुमास्नी!

**माधवराव**—मुकुंदराव, ही आमच्या बाबांच्या वेळेपासून आमच्या इथें वाढली आहे. ती जरा विनोदी आणि गमती आहे. तिच्या बोलण्याकडे लक्ष्य देऊन नाहीं उपयोग. निरे, इकडे ये. मुकुंदराव, तो प्रियंवदेचा पोषाख आहे तो, तो द्या पाहूं तिला. निरे घे ते कपडे, आणि प्रियंवदा होऊन ये पाहूं.

**निरी**—हः हः हः ह! पिरंवदा! पिरंवदा!

**मंगळ**—अग अशी पघतीयास काय हरनावानी? काळी चंदुरकला मिलते हाय फुकटशेनी. त्यामंदी तुज काय जात? (निरी हलकेच पण एकदम येऊन लुगडें घेऊन जाते.) आपनूबी आतां अदुगर या पिरंवदेला नट्नशेनी आल्याबरोबर गाटली पाहिजे! [जातो.

**माधवराव**—(किशास घेऊं लागतो) किशा, ये ये.

[चाल—असुनि तुझें मुख फार मनोहर.]

**धावुनि चुंबन देईं किशोरा!**
**चल ये, हरिं श्रम सारा, कुमारा! । ध्रु० ।**
**नव वसनांहीं नोळखशी मज,**
**तातचि हा तव खास किशोरा! ॥ धावुनि० ॥**

**किशा**—आई! हा कोनग मला असा धलतोय? (माधवराव त्यास पुनः घेऊं लागतो.)

**हां हां दूल शला, तुमि दूल शला, तुमि दूल शला!**
**चला–लाउं नका कल, लाउं नका कल, लाउं मला!**

**माधवराव**—अरे—

मदीय प्राणचि मूर्त रूप हें
धरुनी प्रकटत तनयीं पाहे,
किति कितिदा तव चुंबन करुं रे!

**किशा**—

हांहां दूल शला, तुमि दूल शला, तुमि दूल शला!
पहा माजा ओट दुकुला! खलाच नसतो धील मला!
मुक दूल कला, कल दूल कला, तुमि दूल शला!

आई, हा कालचा तो विक्लम लाजा का ग! हा आपल्या इतं कछाला आला बलं ?

**माधवराव**—ह्या सवाई विक्रमाचें चुंबन घ्यायला! (पुन्हा चुंबन घेतो.)

**किशा**—मी लावथाहेबांनां थांगेन हां!

**सुंदराबाई**—अगबाई, त्यानं खरंच ओळखलं नाहीं इकडे!

**माधवराव**—(मुलास) मग सांग कीं मला, मी इथंच आहें ना? (पुन्हा चुंबन घेतो.)

**किशा**—आई आई! (तिला बिलगतो.)

**सुंदराबाई**—(एकीकडे) काय बाई तरी प्रेम आलंय पण आज!

**किशा**—आई, मी आज मामाच्या घलीं जानाल माजा पोछाक दाकूवायला!

माजी विजाल, अंगलका टोपी,
मन्याबापूला दाकूवायला जातो!
दुल्गी चिमी विटी मनी बलोबल् खेलायूला जातो,
मामी दील दुधावल्ची थाय ती खायाला जातो,
मामाकले थूलतची पेलेबल्फी खायाला जातो!

**सुंदराबाई**—अग निरे, निरे, निरे!—कुठें गेली मेली ही इतक्यांत! (इतक्यांत निरी नटून येते तिच्याकडे पाहून साश्चर्य) निरे! हें काय? आचरट मेली नाहींतर!

**माधवराव**—या या प्रियंवदाबाई—

**सुंदराबाई**—इश्श, काय मेली दिसते आहे पण! (हंसून) निरे, इतकी उचकळ्यांत कसल्या पडली आहेस? हें बघ, किशाला त्याच्या आजोळीं घेऊन जा.

**निरी**—आन् अशी पिरंवदा हूनशानीच जाऊं?

**माधवराव**—होहो, अशीच जा.

**सुंदराबाई**—कायबाई तरी–तिथं काय म्हणतील तिला!

**निरी**—चला, माजा हात धरूनशेनी चला. का कडेवरत घेऊ किशाबापूंना?

**मुकुंदराव**—चला भिकंभटजी, यांनां पोंचवून देऊं आपण जातां जातां.

[ जातात.

**माधवराव**—प्रिये, आतां उशीर कां? हीं पाहिलींस का शकुंतलेचीं वस्त्रें मुद्दाम तुझ्याकरितांच करिवलीं आहेत हीं. तर

[चाल—काय मला भूल.]

**सोडिं सोडिं लाज सखे! सर्व आपुली,**
**कोणि नसे, वेळ आज गोड लाभली! । ध्रु० ।**
**कां परि अशि चकित तुझी दृष्टि जाहली?**
**हरिणीसम चंचलता नयनिं पसरिली?**
**सांग सखे! भीति तुला काय वाटली?**
**उशिर काय करिशि उगी? वेळ चालली! ॥ सोडिं० ॥**

**सुंदराबाई**—म्हणजे, काय बाई आहे तरी मनांत?

**माधवराव**—मनांत! दुसरें काय असणार मनांत? हा असा पोषाख मीं केल्यावर तूंहि पाहीन ह्मणून सांगितलें होतेंसना! मग उशीर कां तर आतां? (कपडे देऊं लागतो.)

[चाल—ज्या सदा वसति.]

**सुंदरी! धरुनि करीं रुचिर वसन**
**सालंकृत करिं वर तनुला या! । ध्रु० ।**
**आलिंगनिं मज दंगवुनीयां**
**पाजविं मधुर मधु इंदुवदन. ॥ हे सुंदरी! ॥**

काय? मी ह्मणतों हें ऐकायचें कीं नाहीं? जा, जा हीं वस्त्रें घेऊन आणि घालून ये पाहूं.

**सुंदराबाई**—काय बाई तरी!

**माधवराव**—कां, इतकें अवघड काय वाटतें तुला यांत?

**सुंदराबाई**—अवघड काय ह्मणजे!

**माधवराव**—घालतेस कीं नाहीं? मला हें तें कांहीं समजत नाहीं!

**सुंदराबाई**—(वस्त्रें घेऊन) घालतें; पण पुन्हा नाहीं हां–एकदाच.

**माधवराव**—होहो, एकदाच. एकदा तर घाल अगोदर. मग पुढचें पुढें न्हातां येईल. (तिच्या हनुवटीस हात लावतो व ती वस्त्रें घेऊन जाते.)

खरेंच जगामध्यें:—

[चाल—तौरे समज नहि कहनारे.]

**असे सुख तरि महिवरती,**
**नरनारी सुविचारी जरि क्रमति दिनरजनि हंसत! । ध्रु० ।**
**सुंदर रमणी परि नच करि जरि प्रियमनधरणी, जरि हरिणी**
**हितकर कांता होइल कैशी, गुणखनि सति जरि,**
**अप्रिय होइल ती सुदती. ॥ १ ॥ असे सुख तरि महिवरती. ॥**

(इतक्यांत किशा निरीसह येतो; व भिकंभटहि येतात.)

**किशा**—
**अग छोल्, मला छोल्, मला छोल्?**
**काय कल्तेस, काय कल्तेस, धलून अशी मला बोल?**
**अग नको लाऊं काला काला कुत्त तुधा हा हात!**

**भिकंभट**—निरे—

**माधवराव**—अरे, काय आहे काय किशा दंगा?

**किशा**—बाबा, ही पहा मला धलते आहे कशी आपल्या काल्या काल्या कुत्त हातानं!—

**इनं माजा कोत, माजी इजाल, मलीवलिन् लस्त्यांत,**
**केलिन् घान लस्त्यांत,**
**कलेवलुन् मला पालवुन् लोलिवलन् लस्त्यांत!**

**निरी**—(डोळे वटारून) चोरा,
**कदिं मीं, कदिं मीं, कदिं मीं?**

**भिकंभट**—(तिला वेडावून)
**कदिं मीं! कदिं मीं!! कदिं मीं!!!**

**किशा**—हं हं हं!
**मला पालवुन् अशि खोतं कां थांगतेस?**
**नाहिं भीत, नाहिं भीत अथे डोले कां कलतेस?**

**भिकंभट**—निरे, मीं पाहिलें आहे सारें. त्याला पाडवूनसवरून त्याच्यावर मातक्यान् डोळे नकोस वटारूं असे!

**माधवराव**—वाः निरे, त्याला रस्त्यांत पाडवूनसवरून वर त्यालाच दटावतेस आणखी?

(इतक्यांत सुंदराबाई नव्या पोषाखांत येते.)

**भिकंभट**—ओ हो हो! हें कोण? वहिनी कां या? मीं म्हटलें—

**माधवराव**—काय, तुह्मीं काय ह्मटलेंत?

**भिकंभट**—कांहीं नाहीं. ह्मटलें आज कां ज्येष्ठी पूर्णिमा आहे कीं काय?

**सुंदराबाई**—(आंत जाऊं लागते; माधवराव तिचा हात धरतो.) छे बाई, हें काय? मी नाहीं. (ती आंत जाते.)

**माधवराव**—हो पौर्णिमाच आहे आज. तुह्मी पुढें जाऊन वडाच्या पारावर पूजा सांगायला तयार व्हा. मागून मंडळी येतील पूजेला—

**निरी**—आतां मात्र ह्या दुःसंताचा आन् सकुंतलाबाईचा जोडा कसा छान सोबतुया अक्शी!

**भिकंभट**—चल निरे. आह्मांला लाजून वहिनी जातात. त्यापेक्षां आपणच इथून गेलेलें काय वाईट. येतोंतर रावसाहेब.

**निरी**—चला किशाभाऊ. मी तुमास्नी तुमच्या छोट्या गाडीमंदी बसवतें.

[ किशा, निरी व भिकंभट जातात.

**माधवराव**—(दरवाजापाशीं जाऊन हात धरून) हें काय! किती लाज ही? कुणी परकें का होतें इथें? वेडी नाहींतर!

**सुंदराबाई**—परकं नसलं ह्मणून काय झालं बाई! जनाची नसली तरी मनाची तरी लाज आहे ना?

**माधवराव**—लाज, लाज, लाज!

**सुंदराबाई**—पण आतांतर झालं ना मनासारखं?

**माधवराव**—आतां काय विचारतेस?

**ब्राह्मणकन्या नव्हे क्षत्रिया खरी योग्य कामिनी!**

**सुंदराबाई**—छे बाई, हें काय ह्मणायचं!

**माधवराव**—खरेंच

**किति सुंदर तरि रूप दिसे हें,**
**न्यून जयामधिं किमपि नसे!**

छे:, असें नव्हे. तर या वेळीं मला वाटतें कीं:—

चंचल चपला अंबर सोडुनि अवनीवर जणुं पातली,
अथवा मूर्ती पूर्णेंदूच्या कौमुदिची कीं ओतिली,
किंवा त्रिभुवनसौंदर्याची सुंदर पुतळी निर्मिली,
लज्जित रतिही पाहुनि तुजला होइल; मज परि लाभली!
चल, ये तरि, मज धरिं तव करपाशीं,
पुलकित करिं तनु, विसरुनि विनयाशीं!
वरतनु, शशिमुखि! दे–ही अधरसुधा
सुंदरि! लाजुं नको मुळिंही—
अशि या समयाशीं!
चल ये धरिं मज दृढ तव करपाशीं. ॥ १ ॥

(उभयतां भेटतात.)

सगळें ठीक झालें; पण हें पहा किनई, हा बुचडा नाहीं बरोबर झाला! हा आहे याहूनहि जरा मोठा असायला पाहिजे होता! मला वाटतें थोडें गंगावन कमी झालें. आणखी याच्यावर तो मोगऱ्यांच्या कळ्यांचा फुललेला गजरा–थांब आणतोंच मी तो–(खुंटीवरील गजरा व हार आणून) एवढा लटकावून देऊन, नागचांफ्याच्या फुलांचा हा सदा सुवासिक हार गळ्यांत घालतीस म्हणजे फार बहार होती!

(माधवराव तिच्या डोकींत गजरा व गळ्यांत हार घालूं लागतो
व ती लज्जेनें काढून टाकूं लागते.)

**सुंदराबाई**—हें काय बाई—

**माधवराव**—

[चाल—सार खरें.]

चारुमुखी! विनय काय उगि धरिशि संप्रति?
उचित न हे तव रीती. । ध्रु० ।
स्वकीय मंदिरिं लज्जित सुंदरि होतिल तरि नच सुख तत्कांता,
धरिं तरि कबरिभागिं ही सुममाल नव
ग्रथित यांत सुंदरी! मदीय प्रीती! ॥ चारुमुखी! ॥

(माधवराव माळ व गजरा घालतो, सुंदराबाई लाजते, इतक्यांत यादवराव व रमाबाई येतात त्यांस पाहून सुंदराबाई ओशाळते.)

**सुंदराबाई**—अग बाई! दादा अन् वहिनी–आली कीं! जातें बाई मी आतां इथून–काय ह्मणतील तीं!

**यादवराव**—(पुढें येऊन) माधवराव! हा काय विचित्र प्रकार आज? ताई हें काय? तुला मी मोठी विचारी अन् समजूतदार समजत होतों; पण तुलाहि वेड लागल्यासारखें दिसतें. (ती लाजून हार काढून रमाबाईसह आंत जाते.) माधवराव, काय हें? खरोखर एक तुम्हांला वेडतरी लागलें असलें पाहिजे अथवा सगळी लाजलज्जातरी तुह्मीं गुंडाळून ठेविली असली पाहिजे! त्या महामूर्ख मुकुंदराव टांकसाळ्यांच्या नादीं लागून तुह्मीं काय आरंभिला आहेत प्रकार हा! मला वाटतें, त्यानें तुमच्यावर आपली टांकसाळ सुरू केली आहेन.

**माधवराव**—(रागावून) काय? मुकुंदराव महामूर्ख! आणि आह्मी निर्लज्ज–गद्धे–असेंच कीं नाहीं आपलें ह्मणणें? आमच्या स्नेह्यांनां असें ह्मटलेलें मला साफ पुरवायचें नाहीं. तुह्मांला माझें वैभव पहावत नाहीं आणि दुसरें काय?

[चाल—घोर थोर कर्मे घातपात.]

**दुष्टबुद्धी सारे खल कृतांत**
**स्वजनसुखहि त्यां असुख नितांत! ।ध्रु०।**
**सुहृद्–विभावें शठ रचिति कपटकट,**
**विभवहरणिं चिर मति धरितात! ॥ १ ॥**
**मदिय विभव जरि सहवत नच तरि**
**नयन मिटुन धरिं सुचिर करांत. ॥ २ ॥**
**कुटिल–मतिउमज पडत मज सहज**
**नयन तव वमत गर कृतांत. ॥ ३ ॥**

**यादवराव**—माधवराव–मी तुमच्या हिताची—

**माधवराव**—

**मलिन वदन कर मजपुढुन सुदुर**
**अवरुनि जिभ धर निज रदनांत! ॥ ४ ॥**
**क्षुभित मम हृदय बघुनि तुज अदय**
**कृष्णवदन करिं चल निमिषांत! ॥ ५ ॥**

**यादवराव**—हा चाललों–यापुढें पुनः तुमच्या इथें पाऊल ठेवणार नाहीं– (रागारागानें निघून जाऊं लागतो.)

**सुंदराबाई**—दादा दादा! माझ्याकडे पाहून तरी—

**यादवराव**—छत्, होणें नाहीं आतां ही गोष्ट. आजपासून हा उंबरठा नाहीं चढणार !

[त्वेषानें निघून जातो व रमाबाईहि त्याचे मागून जाते.

**माधवराव**—नाहीं आलांत तर माझें काय अडणार आहे? हंः—

[चाल—निग्रहानुग्रही.]

**दुष्ट लोकां कधीं सुख न तें वाटतें**
**भोगिती वैभवा आप्त जरि तें ! । ध्रु० ।**
**मित्र माझे मला असति प्राणापरी,**
**आप्तगण निंदिती दुर्वचें त्यां जरी,**
**सह्य व्हावे कसे शर विखारी तरी,**
**कटुवचें हृदय हें क्षुब्ध होतें. ॥ १ ॥ दुष्ट लोकां० ॥**

[जातो.

**[पडदा पडतो.]**

# अंक २ रा.

## प्रवेश १ ला.

[ स्थल—गोविंदरावाचें बिऱ्हाड. गोविंदराव व सत्यभामा प्रवेश करितात. ]

**सत्यभामा**—यादवरावांची बहीण सुंदराबाई नाहींका, तिला तिच्या इथली मंडळी ह्मणे आग्रह करतात नाटकांतल्या प्रमाणं शालू नेसायचा अन् तसंच हारगजरे घालायचा. पण ती कांहीं त्यांच्या मनाप्रमाणं वागत नाहीं.

**गोविंदराव**—

[ चाल—अनिवार मनुज करी. ]

**जगतांत युवति जरी नायकती कांतवचा जरि त्या,**
**संसारांतिल लवसुख आशा नेति सखे! विलया!**
**दोष तयां परि द्याया मनिं शंका वाटतसे,**
**पति नच करि जरि संस्कृत मन तरि दोष असे आर्या.** ॥ १ ॥

**सत्यभामा**—मीं तिला किती सांगितलं कीं:—

[ चाल—फुलें सुवासिक हीं. ]

**करीं पतिप्रिय तें, सखे ग!**
**सत्कांत त्यांहिं निभ्रांत होति अनुरक्त युवतिवरि ते!**
**तो मधुकर येतां जरि ती कमलिनि मिटते**
**हास्य तें झांकुनी वदन स्वकीयें हस्तें,**
**सांग तूं कसें गे! होइल मग सुख त्यातें?**
**निज कांतवचा मानीं तरि तूं.** ॥ १ ॥ **करीं पतिप्रिय०** ॥

**गोविंदराव**—तूं असें सांगितल्यावर ती काय ह्मणाली?

**सत्यभामा**—ती ह्मणाली:—

[ चाल—मी तप्त जरी. ]

**मज मान्य जरी कांतवचन विनय सोडुं का?**
**ती लोकरीति नयनीति सकल सोडुं का?**
**आप्त इष्ट बंधुहृदय तेंहि भंगुनी**
**युवतीस युक्त लाज तीहि सर्व सोडुं का?** ॥ १ ॥

**गोविंदराव**—खुद्द तिचे शब्द हे?

**सत्यभामा**—छेः अशा अर्थाचं ती ह्मणाली.

**गोविंदराव**—आणि आपण तें पदांत गोंवून सांगितलेंत वाटतें!

**सत्यभामा**—छेः, यांत बाई पदांत तें काय गोवायचं? शकुंतलेच्या तोंडांतलंच थोडं फिरवून तिच्या तोंडांत घातलं.

**गोविंदराव**—आणि तें या प्रियंवदेनें! (तिच्या हनुवटीस हात लावतो.)

**सत्यभामा**—हें काय बाई पण!

**गोविंदराव**—बरें तें जाऊंदे. तिनें असें ह्मटल्यावर मग तूं तिला असें कां नाहीं ह्मटलेंस, कीं—

[चाल—शारदे दास.]

**मंदिरीं। जरी सुंदरी। लाज धरि तरी। काय कांतातें।**
**अल्प तरि तयानें सांग सौख्य कधि होतें? ॥ १ ॥**

**सत्यभामा**—मीं तिला पुष्कळ परोपरीनं सांगितलं, परंतु तिला कांहींच रुचत नाहीं माझं बोलणं. तिचं म्हणणं कीं:—

[चाल—प्राणसख्या धीर आतां.]

**एक दिनीं आदरूनी पतिवच मी वागलें,**
**परि त्यानें हास्य माझें व्यर्थ गडे! जाहलें;**
**मम बंधुस तें मुळिं नच रुचतां**
**मग तिकडे तो तैसें वदतां**
**रोषें त्यातें उगि अवगणितां**
**तो झाला खिन्न गे!**
**मग त्याशीं भाषणातें जाण सखे! सोडिलें. ॥ १ ॥**

**गोविंदराव**—काय ह्मटलेंस? माधवरावांनीं यादवरावांशीं भाषण करायचें सोडलें?

**सत्यभामा**—नुसतं भाषणच काय? पण आपल्या घरींदिखील यायचं कारण नाहीं असं सांगितलं ह्मणे त्यांनीं त्या यादवरावांला, अन् यादवरावांनींहि त्यांचा उंबरठा चढणार नाहीं ह्मणून प्रतिज्ञा केली आहे, ह्मणून सांगत होती ती!

**गोविंदराव**—तर मग हें प्रकरण फारच विकोपाला गेलें ह्मणायचें तर! पण मी ह्मणतों, यादवरावांनींतरी इतका दुराग्रह धरण्याचें कारण? मांधवरावांची जर ती बायको आहे तर तिला त्याच्या इच्छेप्रमाणें वागायला नको का?

**सत्यभामा**—तें सगळं खरं. पण सध्यातरी अशा थराला येऊन पोहंचल्याहेत गोष्टी.

**गोविंदराव**—आहे तें ठीकच आहे ह्मणायचें. यादवराव मला भेटले ह्मणजे मी सांगेन त्यांनां मला काय सांगायचें तें. तूंहि पण त्यांच्या बहिणीची—त्या सुंदराबाईची समजूत कर.

**सत्यभामा**—पण माणसं हट्टवादी असलीं म्हणजे त्यांच्यापुढं काय चालणार कुणाचं? इतकं लांब कशाला? आपल्या घरांत काय चाललंय? मला लिहायवाचायला शिकवायचं हें सासूबाईनां कुठं आवडतंय? त्यांत मीं घटकाभर त्या मोहनाबाईच्या इथं चार गाणीं अथवा पदं शिकायला गेलें ह्मणजे तर त्यांच्या अंगाची जशी लाही होते अगदीं!

**गोविंदराव**—पण माझा मी जर खंबीर आहें, तर दुसऱ्यातिसऱ्याकडे लक्ष्य देऊन उपयोग काय? या गोष्टीसंबंधानेंतरी मी कुणाला भीक घालणार नाहीं! आई ह्मणणार नाहीं कीं बाप ह्मणणार नाहीं! मग दुसऱ्या जगाकडे कोण लक्ष्य देतो!

**सत्यभामा**—आणि ह्मणूनच तर मीं आज हे दिवस पाहिले. नाहींतर कद्धींच माझे धिंडवडे झाले असते!

**गोविंदराव**—बरें, मी जातों आतां यादवरावांच्या इथें, अन् तूं जा त्या मोहनाबाईच्या इथें. आज दोनतरी नवीन पदें शिकून आलीं पाहिजेत.

**सत्यभामा**—चला तर जाऊंच गडे!

**गोविंदराव**—बरें, पण मीं तुला काल करून दिलेलें पद ह्मण पाहूं.

**सत्यभामा**—हो बाई, विसरलेंच होतें अगदीं ह्मणून दाखवायचं—ऐकायचं तर

[चाल—हा अदय मदन.]

**जरि शिक्षण देति न अबलांनां,**
**ते नर मज पशुपरि। दिसत अवनिवरि**
**सुगति न त्यांविण दिसत जगतिं मुळिं।**
**अंधपणा नयनांनां, हा येइ जनां! ॥ १ ॥**

**गोविंदराव**—(स्वगत) हीं असलीं गाणीं सगळ्या बायकांच्या तोंडीं गेलीं पाहिजेत. (उघड) चल जाऊं आपण.

[जातात.

---

## प्रवेश २ रा.

[स्थल—मोहनाबाईचें घर; मोहनाबाई व सत्यभामाबाई दिवाणखान्यांत बोलत बसल्या आहेत असा प्रवेश.]

**मोहना**—सत्यभामाबाई, एकूण सुंदराबाई दुर्दैवी नव्हे का हो ? अहो—

[चाल—दासि ऐसें मानुनियां.]

दैवबळें कांत असा रसिक गुणी लाभुनियां
काय उगी टाकितसे वचन तदिय भंगुनियां !
कनककुंभ दैव देत, मनुज परी लाथुनियां
टाकि बळें अंधपणें ! काय ह्मणूं या विनया !

**सत्यभामा**—मोहनाबाई, तुह्मी ह्मणतां तस्सं होतंय अगदीं !

[चाल—वरि नाहिं दिसे गति आजि खरी.]

जगिं नाहिं सुखी जन एकहि तो । पूर्ण सुखाप्रति जो वरितो. । ध्रु० ।
अरसिक भार्या रसिक पतींनां,
रसिक युवति त्या मूढ नरांनां,
हाच प्रकार जगीं दिसतो. ॥ १ ॥ जगिं नाहिं सुखी० ॥
रसिकहि दोघें एक विचारीं
नांदति प्रेमें या संसारीं,
भाग कुठें न असा दिसतो. ॥ २ ॥ जगिं नाहिं सुखी० ॥

**मोहना**—माझ्यादिखील पुरं अनुभवाला येऊन चुकलं आहे हें अगदीं. जिथं बघतें तिथं हें अस्संच. खुद्द माझंच पहाना—

[चाल—जरि नाहिं कमल तें करीं.]

किति प्रेम वदूं गायनीं । वसत मन्मनीं । तसा असुनी ।
कंठही मधुर मोहनी ! ॥ १ ॥
वाटे व्यर्थचि असे । पतीला नसे । जरी प्रियसें ।
अंतरीं विफल ! करूं कसें ? ॥ २ ॥
येतां घन अंबरीं । हर्षितांतरीं । प्रिया मयुरी ।
नाचती विपिनिं कितितरी. ॥ ३ ॥
त्यांहीं मयुरा जरी । मोद तिळभरी । न होई जरी ।
कां न त्या झुरति अंतरीं ! ॥ ४ ॥

अग, पण ह्या पशुपक्ष्यांतदिखील असं होत नाहीं. त्यांचीं जोडपीं एका विचारानं आनंदांत क्रीडा करित असतात अगदीं. पण आह्मी मनुष्यासारखीं मनुष्यं होऊन आमचीं दोघांचीं तोंडं दोन्हीकडे, असं होतं. त्या माधवरावांनां—

[चाल—मूढमते तूं पापराशी.]

**निजवनितेनें भूषणांहीं । शृंगारुनियां, परिधानावीं**
**अभिनव वसनें चारुदेहीं. ॥ १ ॥**
**नटीपरि नव-सिंजिताहीं । केलि कराव्या स्वकीय मंदिरिं**
**घालुनि माला कंठिं पाहीं. ॥ २ ॥**
**शृंगारिकशा गायनांहीं । मधुरालापें निजकांतेनें**
**सुखवावें त्या वासना ही. ॥ ३ ॥**

पण सुंदराबाईला त्यांचं हें वाटणं सारंच विपरीत आणि चमत्कारिक दिसतं! तेव्हां काय! दोघांनांहि एकून सुख नाहीं झालं! हेंच जर माझ्या ठिकाणीं ती आणि तिच्या ठिकाणीं मी असतें तर—

[चाल—अबला स्त्री ही.]

**आवड कांताची त्यापरि मी वागुनि प्रेमानें,**
**आनंदामधिं काल काढिला असता सौख्यानें. । ध्रु० ।**
**प्रेमळ पद्यें सरस मनोहर गाउनि हर्षानें**
**प्रियपतिमन मीं केलें असतें तल्लिन गानानें. ॥ १ ॥**
**अभिनव वेषा नित्य घेउनी रमवुनि कांतातें**
**प्रियाराधना केली असती श्लेषुनि कंठातें. ॥ २ ॥**

आणखी—

**प्रियपतिसह मी गेलें असतें आनंदें तैशी**
**नाटक अवलोकाया, पति मम जरि असते हौशी! ॥ ३ ॥**

**सत्यभामा**—पऽऽण!

**मोहना**—अग या 'पण' नंचतर मेला जगांत सगळा घोटाळा केला आहेन् ना! आहे त्यांत तूंच भाग्याची नाहींस का! गोविंदराव किती हौशी आहेत? ते होऊन तुला आमच्या इथं पदं शिकून ये ह्मणून सांगतात.

**सत्यभामा**—(लाजून) हो. तुह्मी म्हणतां तें एका दृष्टीनं खरं आहे.

**मोहना**—एका दृष्टीनं कां? सगळ्याच दृष्टीनं.

**सत्यभामा**—तसं कसं ह्मणतां येईल बाई! कारण आठ दिवसांतून कायतें सारं एक दिवस गांवांत यायचं! मी ह्मणतें इथूनच गेलं रोज कालेजांत, तर काय हरकत आहे!

**मोहना**—(हंसून) अस्सं!

[चाल—झालें मी बावरी.]

**सुख आशा वाढते, मनुजांची! । ध्रु० ।**
**लव सुख मिळतां अधिक असावें,**
**अधिक लाभतां पूर्ण मिळावें,**
**अशि आशा दाटते. ॥ १ ॥ सुख आशा० ॥**
**अमर्याद ही आशा बाई,**
**कधिं काळीं ही संपत नाहीं,**
**जीववितें तशि मारिते. ॥ २ ॥ सुख आशा० ॥**

अग, अशी अधीरी कां होतेस तूं? अग आज नाहीं उद्यां तुह्मी एकीकडे रहाल, बोलाल, चालाल, हंसाल, काय हवं तें कराल! हें काय, एवढी शेवटची परीक्षा उतरेपर्यंतच चालायचं कीं नाहीं? माझ्यासारखंतर नाहींना महिनेच्या महिने तुला एकटीला रहावं लागत!

**सत्यभामा**—अहो पण—

**मोहना**—पण काय—

**सत्यभामा**—घरीं सासूबाईंचीं रोज जीं एकेक बोलणीं सहन करावीं लागतात तीं काय सांगूं? तीं माझीं मलाच ठाऊक. तोतरी नाहीं त्रास तुह्मांला!

(इतक्यांत इंदू हातांत एक बाहुली घेऊन यमूचें बोट धरून येते.)

**इंदु**—मावच्छी! मावच्छी! चल बाई, मला खेलायचं दे बाई अगोदल कलून. मी आद माझ्या भावलीचं लगीन कलनाल. यमूताईला दे ह्मतलं तल ती ह्मनते कीं तुला थांग!

**मोहना**—मी देतें हां बाळ! (सत्यभामाबाईस) पहा, हिला आहे कांहीं दुःख? नुसती आनंदाची मूर्ति आहे! (इंदूस) पण इंदू, तुझ्या भावलीचा नवला कुथं आहे?

**इंदु**—सकूताईदवल आहे की तो मोत्याचा नवला! नाईग यमूताई, तुला नाई दाकिवला मी तो? (मोहनेचें लुगडें धरून) चल बाई, लौकल चल.

**मोहना**—येतें ग, पण ह्या मावशी आल्या आहेत ह्यांनां सांग पाहूं एकदा माझ्या इंदूबाळाला कसला नवरा पाहिजे तो! (इंदूच्या तोंडावर हात फिरवून तिचा मुका घेते.)

**इंदु**—मला नवला होय?

**सत्यभामा**—हो. कसा पाहिजे बरं तुला नवरा? सांग पाहूं?

**मोहना**—निळूभाऊसारखा पाहिजे का?

(इतक्यांत निळू येतो व यमू लाजून बाजूस होते.)

**इंदु**—नको जा तथला. अथला मोत्ता आपला यमुताईलाच बला!

**निळू**—मग तुला कुणासारखा पाहिजे?

**इंदु**—(यमूस) ताई, लात्तेस कांग अची? इकल येकी इकल!

(यमूचा पदर धरून ओढते. यमू तो सोडवून घेऊन सलज्जपणें बाजूस उभी राहून मधून हंसत चोरून निळूकडे पहाते.)

**मोहना**—(इंदूस जवळ घेऊन) सोड बाळ, तिचा पदर कां धरतेस?

**इंदू**—नाई दा थोलत. मी काशीयात्ला कलनाल!

**मोहना**—अगोदर तुला कसला नवरा पाहिजे तें सांग अन् मग कर काशीयात्रा.

**इंदू**—हो थांगते हां. हे बग, आपन् पलवा ते नातक पाह्यला गेलो होतो कनई? अन् तिथं तो एक चिंकुला नवला आला होता तो–तथला नवला हवा मला!

**मोहना**—अग तसला ह्मणजे कसला?

**इंदू**—सांगू ऽऽ?

**दुच्छंताच्या मुलाथालिका थुंद्ल नवला मद्ला,**
**बान थोडुनी मालितथें दो वाघाथिंव्वाला;**
**गोला गोलापान अथावा, तोपी दोक्याला,**
**अंगामद्यें कोत द्लीचा वलती मोती त्याला,**
**इजाल तथलिच जलि बुत्त्याची लेशमि गोंदे त्याला.**

**मोहना**—आणखी त्याला दागिने कसले कसले पाहिजेत?

इंदू—

गल्यांत कंटी, गोप, गांटलं, मोत्यांच्या माला,
हातांत अंगट्या लाल खल्याच्या घालिल जो नवली;
कलितोले दो घालुनि येइल मद्‌थीं खेलायाला,
तोच पाहिजे नवला मद्‌ला कुणि नको दुथलातिथला !

(सर्व हंसतात.)

सत्यभामा—एकून असा नवरा पाहिजे तुला? दुथलातिथला नको? बरं, पण तुला काय काय दागिने पाहिजेत बरं?

इंदू—मी आतां नाहीं थांगत जा! मावच्छी, देतेस ना मला? चल बाई लौकल दे. ह्मंजे कनई थकूताईच्या भावल्याला मी लुक्वत नेईन.

मोहना—बरं पण बाळ, रुखवतावर न्यायला तुला काय काय पाहिजे, तेंतर सांगशील? (सत्यभामेस) आमच्या निळूच्या अण्णानं हिला एक गंमतीदार गाणं शिकवलं आहेन्. (इंदूस) सांगतेस ना?

इंदू—अगोदर दे ह्मंजे मग दाक्वीन ह्मणून.

मोहना—अगोदर ह्मण ह्मणजे देतें.

इंदू—खच्चित खच्चित देतेस ह्मतल ह्मंजे? (गाणें म्हणते.)

दे पुल्या, गुलवल्या, थोल्या दे छंकलपाली मद्‌ला,
अनलसे, कलंज्या, फेन्या, दे घीवल, मांदे मद्‌ला;
दाल तील चुल्मुले पोहे यांचे दे कलुनी लाल्लू,
शिप्तले देछिल भलुनी तलि नेइन लुक्वत त्याला;
ही पूजिल गौलिहलाला,
मी नेइन या घोल्याला,
घलिं आनिन मग नवल्याला,
वाजंतलि बेंद्‌बाजाला
लाउनियां कलु लग्नाला.

झाल, थंपल थगल, आतां देतेथना?

मोहना—चल बाई चल. हिचा एक शशिमिरा आहे माझ्या मागं. चला, आंतच या सत्यभामाबाई.

सत्यभामा—नाहीं बाई बराच उशीर झाला, मी जातें आतां.

**मोहना**—जाल ह्मणे! या, जरातर या. मी हिच्या तोंडावर मारतें.

**इंदु**—माध्या तोंडावल नको माल्रूं—

**मोहना**—वेडी पोर-(गाल दाबून) चल, चल!

[ जातात. निळू व यमूताई मागें रहातात.

**निळू**—( यमूचा हात धरून ) कां, घाई कसली इतकी? इंदूच्या भावलीच्या लग्नाच्या गडबडींत आहेस वाटतें?

**यमू**—हें काय बाई? कुणीतरी येईलबिईल इथं! मी जातें कशी!! (इतक्यांत मोहना 'यमू यमू' ह्मणून हांक मारते.) आलें आलें.

**निळू**—थांब, जरा थांब. तुझी ती 'स्त्रीधर्मकुसुममाला' आणि ती 'प्रभुरत्नमाला' वाचून झालीं का?

**यमू**—हो, केव्हांच झालीं.

**निळू**—देतर तीं, ह्मणजे परत करतों. तुझ्याकरितां ही 'भारतवर्षींच युवतिरत्नमाला' आणली आहे. मोहरा पुतळ्यांच्या मालांपेक्षां या माला जास्त सुंदर आणि शोभादायक नव्हत का?

**यमू**—मग नाहीं कोण ह्मणतं? पण यासुद्धां द्यायच्या अन् पुनः परत काढून घ्यायच्या, हें काय?

**निळू**—तर एकून या आपल्या स्वताच्या पाहिजेत! पण स्वताच्याच असल्या ह्मणजे मनुष्याला त्याची इतकी किंमत वाटत नाहीं. आणि त्यासंबंधानें कौतुक, आदर आणि उत्सुकता हींहि रहावीं तशीं रहात नाहींत. ह्मणून आहे हा प्रकारच ठीक आहे. ह्या मालांचा सुवास तूं आपल्या अंतकरणांत सांठवून ठेव ह्मणजे झालें.

**यमू**—हो, मनासारखंच होऊं दे. माझी कुठं त्याला ना आहे?

**निळू**—मग ठीक आहे. हें पहा, पुढच्या आदितवारीं मी कॉलेजांतून येईन तोंपर्यंत झाली पाहिजे ही वाचून. मग झांशीच्या राणीचें चरित्र आणीन.

**यमू**—( पुस्तक घेते. पुन्हा हांक ऐकूं येते. ) जातेंच बाई मी आतां! मोहनाताईच्या खोलींत त्यांच्या टेबलावर पुस्तकं आहेत तीं आणून देतें मी इतक्यांत.

**निळू**—तूं जा. मीच घेतों तिथें जाऊन. ( जातां जातां ) एवढें पुस्तक लायब्ररींत पोंचवावें अन् गोविंदरावांनां गांठून त्यांनांहि घेऊन कॉलेजांत जावें झालें.

[ जातात.

---

## प्रवेश ३ रा.

[स्थल—यादवरावांचें घर. श्रीपतराव फौजदार, यादवराव, गोविंदराव व निळू दिवाणखान्यांत बसले आहेत असा प्रवेश.]

**यादवराव**—त्या मुकुंदरावाचें आमच्या माधवरावांच्या इथें आतांशा फारच प्रस्थ माजलें आहे. आणि त्यानेंचतर त्यांनां हें सारें वेड लावून टाकलें आहेन्. अहो, नाटकांतल्यासारखे पोषाख आपण करायचे अन् आपल्या बायकांनांहि करायला सांगायचे, याचा अर्थ काय?

**गोविंदराव**—पण मी ह्मणतों, हरकत काय आहे असें करायला? ज्याला ऐपत असेल तो करील! इंग्लंड, फ्रान्स, जर्मनी, अमेरिका यांसारख्या सुधारलेल्या पाश्चात्य राष्ट्रांतूनतर मोठमोठ्या उच्च कुलांतले लोकदेखील नाटकांत कधींकधीं विशिष्ट भूमिका घ्यायला जातात. कांहींकांहीं कुटुंबांततर पुरुष व बायका मिळून घरच्याघरींच नाटकेंसुद्धां करतात करमणुकीकरितां. मग यांततर काय? त्यांच्यांत गुणाला मान आहे, आणि ह्मणूनच त्यांनीं हेनरी आयर्व्हिंगसारख्या गुणी नटाला 'सर'ही पदवी दिली. माझ्या ह्मणण्याचा आशय एवढाच कीं, ज्याची जिकडे विशेष प्रवृत्ति असेल त्याच दिशेनें त्याला जाऊं द्यावें. मात्र त्या दिशेला जातांना मुख्य 'व्हर्च्यू' सोडून 'व्हीशीअस' झालें नाहीं ह्मणजे झालें.

**निळू**—ह्मणजे सद्गुण सोडून दुर्गुण धरला नाहीं ह्मणजे झालें, असेंच कीं नाहीं तुमचें ह्मणणें?

**श्रीपतराव**—हे तुमच्या कॉलेजच्या विद्येचे प्रगल्भ विचार! आमच्यासारख्या सामान्य लोकांनां काय हे उपयोगी?

**गोविंदराव**—कां बरें नाहींत? ते सगळीकडे सारखे उपयोगीं पडले पाहिजेत, असेच सार्वत्रिक आहेत ते.

**यादवराव**—अहो तें सगळें खरें. पण लोकरूढीचा अतिक्रम करून पाऊल टाकलें कीं 'व्हर्च्यु' सुटून 'व्हाईस'कडे प्रवृत्ती झालीच ह्मणून समजा.

**गोविंदराव**—लोकरूढी! लोकरूढी!! लोकरूढी!!! धिस् इज् शीअर नान्सेन्स! हें नुसतें खूळ आहे!

**निळू**—अस्सें! भाषांतरासकट होऊं द्या!

**गोविंदराव**—हें मुळासकट उपटून टाकलें पाहिजे. हें आतां फार दिवसांचें गंज खाल्लेलें हत्यार झालें आहे! तें मोडूनच टाकलेलें बरें. आपण जर सदाचरणानें

वागतों आहों तर या लोकरूढीची काय इतकी प्रतिष्ठा! तिला बदलण्याचें तुमच्या हातांत आहे. या लोकरूढीवरच मीं एक लहानसा निबंध लिहिला आहे. आणि तो मी 'स्टूडंटस् लिबरल असोशिएशन'च्या व्याख्यानमालिकेंत एक दिवस घेऊन लौकरच वाचणार आहें! हा माझा निबंध वाचून माझ्या एका विद्यालयीन कविमित्रानें त्यावर एक सुंदर पद्य रचलं आहे. त्यांत त्यानें बऱ्याच गोष्टी ग्रथित केल्या आहेत. त्याची एक नक्कल त्यानें मला करून दिली आहे. (कागद काढतो.)

[ चाल—पंचकल्याणी घोडा. ]

रूढे! निबिडा गाढतरा प्रबला
करिशी बद्धचि कीं जगताला! । ध्रु० ।
मेघावलि उसळुनि अमिता । करिति नभाला
कज्जला जणुं मषियुक्ता । कृष्णचि कुटिला. ॥ १ ॥ रूढे० ॥
रूढे! जगांत पसरुनि तूं ही । ध्वंसिशी सुमनोवृत्ती पाहीं ।
घनतिमिरें धीमंतांच्या । उज्ज्वल मतिही
मंदाविशि पसरुनि कुमती । घातुक कृति ही! ॥ २ ॥रूढे०॥
क्रूरे! त्वांची भलतेसलते । प्रचार धर्मीं प्ररूढ केले ।
नवविवाहिं अज्ञ कुमारी । बांधुनि कुमते!
पतिनिधनीं हरिशी केशां क्षुरधर हस्तें! ॥ ३ ॥ रूढे० ॥
मूढे! युवांस हक्कचि सगळे। देशी कापुनि अबलागळे ।
युव असंख्य, मरतां कांता । हाय! स्मशानीं
ठरविति अन्यहि लग्नें! । मत तुज कुटिले! ॥ ४॥ रूढे० ॥
रूढे! शिक्षणही युवतीतें । गमतें पापचि मूर्तिमती तें।
तूं समाज-शकटा चूर । केलें कुमते! ।
राष्ट्रहितहि भंगुनि गेलें । तेणें किति तें! ॥ ५ ॥ रूढे० ॥
टाहो फोडिति अबला सगळ्या ।
नच ये कुणास परि मुळिं दया!
रडरडुनी नयनीं पूर । भरल्या सुनद्या ।
हो हृदयहि शतधा चूर । परि तूं अदया! ॥ ६ ॥ रूढे० ॥

ही पहा राष्ट्रदेवि आरडते । पिटुनी ऊर स्वकीयें हस्तें ।
"जगिं नच का कुणिही वाली? । जरि ओरडतें ।
जो मदीय सुतां सांभाळी । वारुनि हीतें?" ॥ ७ ॥ रूढे० ॥

या लोकरूढीनें आमचा आजपर्यंत असा नाश झाला आहे. अन् एवढ्याच-करितां पहिल्यांदा तिची बेडी खाडकन् तोडून टाकिली पाहिजे. त्याशिवाय स्त्रीशिक्षण व सामाजिक प्रगति हीं कधींहि व्हायचीं नाहींत. आणि आमच्या बायका सदा गुलामगिरीच्या स्थितींतच राह्यच्या!

**श्रीपतराव**—या उदार शिक्षणाच्या पिकामुळें हें एक नवीन खूळ पिकलें आहे आमच्यांत! ज्या गुलामगिरीच्या कल्पना पुरुषांच्या अथवा बायकांच्या आजपर्यंत कद्धीं डोक्यांतहि शिरल्या नाहींत त्या कल्पनांचा प्रादुर्भाव आमच्यांत या शिक्षणानें होत आहे.

**गोविंदराव**—विचार जागृत होणें ही शिक्षणाची जोरदार शक्ति व अपरिहार्य असा परिणाम आहे.

**निळू**—जोरदार शक्ति ह्मणजे पॉवरफुल फोर्स आणि अपरिहार्य परिणाम ह्मणजे इनेव्हिटेबल् कान्सिक्वेन्स असेंच कीं नाहीं!

**यादवराव**—विचार जागृत होऊन सगळ्या गोष्टी घडूं लागल्या तर ठीक आहे. पण विचाराचा लोप होऊन विकार वाढला आणि अविचारानें सगळ्या गोष्टी होऊं लागल्या तर तिथें काय करायचें?

**गोविंदराव**—मग आमचेंतरी कुठें असें ह्मणणें आहे कीं अविचारानें गोष्टी होऊं लागाव्या ह्मणून?

**यादवराव**—नाहींना? मग लोकरूढीनें आह्मांला आणि आमच्या बायकांनां गुलाम करून टाकलें आहे असें ह्मणण्यांत अर्थ काय?

**गोविंदराव**—अर्थ काय? याचा अर्थ समजायला फार लांब नको जायला. ही तुमच्या मेव्हण्याचीच 'केस' घ्या. ते इनामदार असून घरचे खाऊनपिऊन चांगले सुखी आहेत. थोडे शिकलेलेहि आहेत. त्यांनीं नाटकांतल्यासारखा झोंकदार पोषाख केला अन् समजा आपल्या कुटुंबालाहि तसा करण्याचा आग्रह केला, तर यांत वावगें तें काय झालें? नाटकी पोषाखांत असें विशेष जास्त तें काय असतें? उंची वस्त्राभरणें, जरा नीटनेटकेपणा, आणि टापटीप ह्यांशिवाय जास्त काय आहे त्यांत? त्यांत आपल्यालातर नाहीं बुवा कांहीं वावगें दिसत. ज्याला ऐपत असेल त्यानें खुशाल करावें तसें. जोंपर्यंत त्यांनीं देवपाटीं इंद्राच्या किरीटकुंडलां-

सारखीं किरीटकुंडलें अथवा परीच्या पंखांसारखें पंख लावून कांहीं विलक्षण प्रकार केला नाहीं, तोंपर्यंततरी त्यांनां नांवें ठेवतां येणार नाहीं. मला वाटतें माभळभटी कांसोटा घालून कसेंबसें नेसण्यापेक्षां जरा चापूनचुपून जिथल्यातिथें नेसणें अथवा अजागळासारखें ढुंगणाला कसेंबसें लुगडें गुंडाळण्यापेक्षां जिथल्या तिथें ठेकेबाज आणि डुसकेदार नेसणें, आणि ज्यांनां परमेश्वरानें अलंकारभूषणें दिलीं असतील त्यांनीं तीं जिथल्यातिथें ठाकठिकीनें घालणें, हें कांहीं वावगें नाहीं. तुह्मीच सांगा, यांत काय वावगें आहे बरें!

**यादवराव**—यांत कांहीं वावगें नाहीं हें तुमच्या विचारसरणीला ठीकच आहे. पण समजा, तुह्मीच उद्यां एकाद्या बंगाली बाबूसारखें केस वाढवून जर बोडकेच रस्त्यानें जाऊं लागलांत, अथवा चीनच्या राजासारखी पाठीवर वेणी सोडून त्यांत फुलें लटकावून जर रस्त्यांतून फिरूं लागलांत तर तें हास्यास्पद होईल कीं नाहीं?

**श्रीपतराव**—(यादवरावांच्या हातावर टाळी देऊन) सुरेख प्रश्न विचारलात! कां निळकंठराव, यांच्यासारख्यांनां असें अडिवलें पाहिजे; नाहीं?

**गोविंदराव**—ह्यांत अडिवलेंत तें काय? मी ह्मणतों कीं, असें एकदम केल्यानें पहाणारांनां कदाचित् पहिल्यापहिल्यानें तें जरा चमत्कारिक वाटेल. पण असें करणाराला जर कांहीं त्यांत विशेष सोय अथवा 'ॲडाप्टॅबिलिटी' दिसली असेल,—समजा बाबूसारखे केंस राखल्यानें त्यांच्या मेंदूवर कांहीं हितकारक परिणाम घडत असेल, अथवा चीनच्या राजासारखी वेणी घातल्यानें असाच कांहीं दुसरा फायदा होत असेल—तर त्यानें तें लोकांच्या हंसण्याला भिऊन करायला भ्यावें असें कांहीं नाहीं. तो जर 'स्ट्रॉंग कॅरेक्टर'चा माणूस असेल तर तो कुण्णाला न भितां बेलाशक करील तसें!

**श्रीपतराव**—मग मी ह्मणतों—तुह्मी ह्मणतां हीच सोय अथवा 'अॅडॅप्टॅबिलिटी' दिसली तर इंद्राचीं किरीटकुंडलें अथवा परींचे पंखहि लावायलातरी काय हरकत आहे?

**गोविंदराव**—मग इथें कोण ह्मणतो हरकत आहे ह्मणून? मुख्य तत्व, सोय आणि 'अॅडॅप्टॅबिलिटीचें.'

**यादवराव**—यांत सोय आणि 'अॅडॅप्टॅबिलिटी' ती काय बुवा? पंख लावल्यानें उडतां येऊन जर अस्मानांत जातां आलें, अथवा इंद्रासारखीं किरीटकुंडलें घातल्याबरोबर जर त्याला इंद्रासारखें राज्य प्राप्त झालें, तर मात्र

ह्मणूं आम्ही, असें करायला कांहीं हरकत नाहीं ह्मणून! मात्र दुसऱ्याचें पाहून त्याच्यासारखें करायचें ह्मणून जर कुणी करूं लागेल, तर तें हास्यास्पद नाहीं का होणार?

**गोविंदराव**—दुसऱ्याचें पाहून त्यांत कांहीं सोय अथवा 'अडॅप्टॅबिलिटी' न बघतां जर तो तसें करूं लागेल तर तें वेडगळपणाचें होईल. पण तेंच जर तो पूर्ण विचार करून करील, तर त्याला मात्र नांव नाहीं ठेवतां येणार आपल्याला.

**श्रीपतराव**—तें जाऊं द्या हो! पण उद्यांपासून तुम्ही बाबूसारखे केंस वाढविणार, कीं चीनच्या राजासारखी वेणी घालणार, तें सांगा पाहूं? मला वाटतें, सरावामुळें वेणी घातलेलेंच तुह्मांला जास्त छान शोभेल!

**गोविंदराव**—आह्मी चाहील तें करूं! त्याची तुह्मांला कां पंचाईत? But mind, this is a personal attack!

**निळू**—गोविंद, चल बुवा! हे आतां व्यक्तीवर हल्ला करूं लागले! यांच्याशीं वाद करण्यांत अर्थ नाहीं! चल, कॉलेजांत यायचें आहेना तुला आज, कीं नाहीं?

**यादवराव**—अंगावर बेतल्यावर निघालेंच पाहिजे!

**गोविंदराव**—कुणाच्या अंगावर बेतलें? बोलण्यालासुद्धां There are limits and limits!

**निळू**—अरे हे सहज थट्टेनें ह्मणतात अन् तूं तें 'सीरिअसली' घेतोस. तेव्हां तुला काय ह्मणावें?

**गोविंदराव**—सीरीअसली ह्मणजे! उगीचच्याउगीच एखाद्याचें मन दुखेल असें लावून बोलण्यांत काय अर्थ!

**यादवराव**—गोविंदराव, तुह्मांला लावून बोलावें असा कांहीं श्रीपतरावांचा हेतु नव्हता.

**श्रीपतराव**—आह्मी माफी मागतों तुमची, मगतर झालें?

**निळू**—अगदीं सपशेल माफी मागा!

**श्रीपतराव**—तें कांहीं नाहीं आपल्याला समजत. पण माझ्या बोलण्यानें यांचें मन जर दुखलें असेल तर मला माफी मागितलीच पाहिजे.

**गोविंदराव**—माफी कसली यांत मागायची ह्मणा. पण थट्टेचें बोलणें—'पर्सनॅलिटी'वर नेऊं नये, इतकेंच माझें ह्मणणें.

**निळू**—बरें आहे, येतों आह्मी. चल गोविंद.

**श्रीपतराव**—(गोविंदरावास) बोलल्याचालल्याचा राग नसावा.

**गोविंद्राव**—राग कसला त्यांत? चल निळू, आपल्याला तेवढ्या काव्य-प्रकाशाच्या नोट्स् उतरून घेतल्या पाहिजेत आज! तेवढ्या घेऊं अन् आजची रात्रीची रात्र इथेंच राहूं; अन् उद्यां भल्या पहांटेस उठून जाऊं झालें कॉलेजला.

**निळू**—(जातां जातां) गांवांत तूं आलास कीं तुझें सदान् कदा असेंच! कांहीं नाहीं कांहींतरी तुझी आपली सबब असतेच! न येण्याचा वार शनिवार!

**गोविंद्राव**—छे, आदितवार!

**निळू**—बरें, पण आज रात्रीं काय—कामगिरीतरी काय आहे अशी?

**गोविंद्राव**—इथला तो 'टवाळ क्लब' आहे ना तुला माहीत? तिथें आज कांहीं मंडळीचें गाणें आहे ह्मणून माझ्या एका स्नेह्यानें आज मुद्दाम रहाण्याविषयीं मला आग्रह केला आहेन्.

**निळू**—संभाळ हां! टवाळ क्लबना तो, मग त्यानें तुला बोलावून शेवटीं गाणें नाहीं अन् कांहीं नाहीं असें सांगून तुझी टवाळीबिवाळी करायचा तर बेत केला नाहींना! नाहींतर ही पुण्यांतली मंडळी!

**गोविंद्राव**—छत्. कुणी झालें, म्हणून काय झालें? काय भलत्यासलत्याची थट्टा करतील?

[जातात.

**श्रीपतराव**—(एकीकडे बोलत असलेले) छत्, ती त्याला झोंबण्यासारखी गोष्ट होती. कारण ही स्वारी दर शनिवारीं गांवांत येऊन करते काय हें आहे का तुह्मांला ठाऊक?

**याद्वराव**—काय बुवा?

**श्रीपतराव**—हे शनिवारीं गांवांत आले कीं बायकोला घेऊन नाटकाला जायचे आणि आदितवारीं घरीं नाटकाची तालीम करून पाह्यची! आणि त्यांत ह्या स्वारीवर केव्हांकेव्हां वेषांतर करून वेणी घालण्याचा प्रसंग येतो! हें आपलें मीं उडतउडत ऐकलें होतें ह्मणून सहज बोलून गेलों मी. पण तें त्याला किती झोंबलें! तुम्हींच पाहिलेंत ना 'सरावामुळें वेणी घातलेलें तुह्मांला जास्त छान शोभेल' असें ह्मटल्याबरोबर तो किती उसळला तो!

**याद्वराव**—अस्सें? मग बरोबर! (सचिंत होतो.)

**श्रीपतराव**—यादवराव, कां एकदम असे सचिंत कां झालांत तुह्मी?

**यादवराव**—सचिंत कां झालों? हें पहा—तुह्मीं सांगितलेला प्रकार ऐकून माझ्या पोटांत चर्र झालें एकदम!

**श्रीपतराव**—तें कां?

**यादवराव**—(निःश्वास टाकून) हंः कां तें काय सांगूं! आमची सुंदर–जिला तुह्मी आपली धाकटी बहीण समजतां–तिच्या नवऱ्याची–ह्मणजे त्या माधवरावांची स्थिति त्या मुकुंदरावाच्या संगतीनें कशी बिघडत चालली आहे, हें तुह्मी पहातांच आहां. खुद्द माझी कशी शोभा झाली, तेंहि तुह्मांला ठाऊक आहे. पण यापुढें ते त्या मुकुंदरावाच्या संगतींत राहिल्यास त्याचा अखेर परिणाम काय होईल, हें, ही गोविंदरावांची गोष्ट ऐकल्यापासून–मला कांहींच समजत नाहींसें झालें आहे. इथें आल्यापासून दर बुधवारीं आणि शनिवारीं त्यांचीं नाटकें चाललीं आहेत. आणखी–त्यांनीं किशाला तो दुष्यंताच्या मुलासारखा पोषाख केलेला तुह्मीं पाहिलाच आहे. तसलेच नाटकी पोषाख त्यांनीं झाडून सगळ्या जणांनां करविले आहेत! तेव्हां या सगळ्याचा अखेर परिणाम काय होणार, हें कांहीं समजत नाहीं मला!

**श्रीपतराव**—हें पहा, सुंदरकडे तुम्हीं याची सगळी किल्ली फिरवून ठेवा, म्हणजे सगळें आपोआप येईल ताळ्यावर! पहिली गोष्ट, तिला नाटकाला जात जाऊं नको म्हणून सांगा. दुसरें असें कीं, भलतासलता पोषाख घाल ह्मणून सांगितलें तर 'लोक हंसतील, नावें ठेवतील, नाक मुरडतील आणि छीःथू करतील, मी कांहीं साफ घालणार नाहीं,' असें तिनें स्पष्ट सांगावेन्. ह्मणजे काय करणार तो? अहो, घरांत बायका खंबीर असल्यावर त्यांच्यापुढें पुरुषांचें कांहीं चालायचें नाहीं!

**यादवराव**—हें मीं तिला केव्हांच सांगून ठेवलें आहे. पण तिच्यानें त्यांच्या मनाविरुद्ध कितपत जाववेल, हें मला सांगतां येणार नाहीं. तरीपण आणखीहि तिला मी बजावून ठेवतों. तो मुकुंदराव एक गांठ पडलाय त्यांनां! या नुसत्या पोषाखाच्या पायीं त्यानें जवळजवळ आज हजार रुपयांवरतरी खास हात मारला आहेन्!

**श्रीपतराव**—त्या मुकुंदरावासंबंधानें मीं आणखीहि कांहीं ऐकलें आहे.

**यादवराव**—आणखी काय ऐकलें आहे?

**श्रीपतराव**—त्यानें आपल्या बहिणीच्या नवऱ्याला–तो आजारी पडला असतां—विष घालून ठार मारलेंन्, आणि मेव्हण्यानें सगळी इस्टेट आपल्याला दिल्याचें एक खोटेंच मृत्युपत्र केलेंन् अशी बातमी आहे.

**यादवराव**—इतका उलट्या काळजाचा आहे तर तो? पैशाकरितां इतकेंदेखील करायला चुकायचा नाहीं मनुष्य!

**श्रीपतराव**—त्यासंबंधानें मी सध्या बारीक शोधांत आहेंच. त्यांत जर कांहीं निष्पन्न झालें, तर या स्वारीला इथून उडवायला किती उशीर!

**यादवराव**—त्या मुकुंदरावानें माधवरावांनां त्या संगीत 'टवाळ क्लबा'चा मेंबर करायचा बेत केला आहे.

**श्रीपतराव**—टवाळ क्लबाचा? ह्मणजे त्या इंद्रभुवनवाल्या मंडळीचाच कीं नाहीं?

**यादवराव**—हो त्याचाच. आणि आज संध्याकाळीं त्यांनां तो तिथें घेऊन जाणार. आणि आजच त्यांचें गाणेंहि पण करविणार तिथें. ह्मणजे—दररोज कांहीं नवें आहे. एकेक पाऊल पुढें आहे.

**श्रीपतराव**—अस्सें? पण जाऊं दे. त्याला तुह्मी नको ह्मणून काय होणार? त्या क्लबांत माझा एक चांगला स्नेही आहे. अन् तोतरी एवढ्याचकरितां कीं, तिथें येणाऱ्या निरनिराळ्या लोकांचे स्वभाव पहातां येऊन त्यांचीं एकेक बिंगटें करून त्यावर आपल्याला एखादी सुंदर कादंबरी लिहितां यावी.

**यादवराव**—असें असेल तर त्यांनां तुह्मी नीट बजावून ठेवा. त्यांचेकडून तिथला सगळा प्रकार कळायला पंचाईत नाहीं पडणार! माधवरावांवर नीट लक्ष्य ठेवावला सांगा त्यांनां.

**श्रीपतराव**—ती सगळी व्यवस्था करतों मी. त्याची नको तुह्मांला काळजी. बरें आहे, येतोंतर आतां मी, बराच उशीर झाला.

**यादवराव**—या.

[जातात.

---

## प्रवेश ४ था.

[ **स्थल**—यादवरावांचें घर. निरी व मंगळ प्रवेश करितात.]

**मंगळ**—अग ए पिरंवदे पिरंवदे! आज अगदीं इक्ती नटलीयास? आन् लांडोरीवानी हकडूनतकड आन् तकडूनहकड अक्षी उडतीयास आन् नाचतीयास? काय, हैतरी काय इचीभन आज? (निरी आपल्याच थाटांत आहे असें पाहून!)

**बिजली चमकारी। नैनी धरि ही कटियारी!**

अग—

सुंदर मुखडा, बुचडा, फिरकी, अक्कड तुजि ही न्यारी!
करि अक्कलमंदी सारी। फसवशील बी कारबारी!

निरी—

मी काय कुनि अशी बाजारी?

मंगळ—

मग कां करशि असा व्हो नकरा?

निरी—

ह्ये काय! पड घरधण्यासबि भुलारी?

मंगळ—

न्हाई काई कांईबी भुलारी, अग ह्योच तुजा कारबारी।
केली तुजी गंमत सारी!
बिजली चमकारी। नैनी धरि ही कटियारी!

ह्ये पग, दुसरतिसर काईबी न्हे! पर माज ह्यननं इक्तच की, ज्यादिशीं अशी नटशीला आन् थटशीला त्यादिशीं जरा संबाळूनशेनी हुशारीन न्हात जा. न्हैतर त्यो मुकुंदराव न्हैका तत रावसायबांच्या हत येत, त्यो लई यडच्छवा है यडच्छवा! कोनच्यावक्ती काय करील आन् काय न्है, सांगवत न्है.

**निरी**—ह्येच्या सारक्या सतरास मुकुंदरावाच दीन मी कान पिरगळूनशेनी हातामंदी! आपल रावसायेब जस भोळसंकर, पन् त्ये लागल हायती या मुकुंद-रावाच्या नादाला. ह्या कुटला मुकुंदराव त्येनां गांठ पडलाया, राम जान! रावसायेब वयनीसायबाल्ली न्हाईन्हाई त्या भुलतापा देऊनशेनी नाटकांतल्यावानी नटाया आन् मुरडाया सांगल्यात. पर वैनीसाब, त्येंची योक दिशीं वाइची फजिती झाली न्हे का—त्ये दिसापासूनशेनी त्येंचा योक शबुदबी ऐकत न्हैता! नाटकाल्ली चल, न्हे चलत; दागीन घाल, न्हे घालत; लुगड न्येस, न्हे न्येसत; दोगांच अक्शी भांडन जुपून राह्यलया जनू! (हलकेच सांगते) वयनीसायबानी मल्ली सांगितलया कीं, 'रावसायबाल्ली घरीं येन्याला रातीचा इक्ता वाह्ळ व्हतो, तो कशापाई त्ये पघूनशेनी ये, म्हून तुज्या घरधण्याल्ली सांग, आन् रावसाब कुट जात्याती आन् कुट येत्याती, ह्या समद्याची पाळद ठिऊनशेनी आपनाल्ली अक्शी रोजच्यारोज समदीं वर्दी येत जा' म्हुन तुमाल्ली सांगाया सांगितलया!

**मंगळ**—तर धनीसाब आतां रातीचबी भाईर जाऊ लागल व्हय? इचीभन, म्हैन्या दो म्हैन्यात किती फरूक पडला ह्येंच्यामंदीं! ह्ये न्हौत आल माज्या ध्येनांत. येकून धनीसायबाचा असाबी कारबार हैतर!

**निरी**—(त्याच्या कानाशीं कुजबुजते) आन् रावसायेब आन् मुकुंदराव जस ह्मंगतील आन् सांगतील तस अक्शी त्येंच्या ह्मनन्यापरमानं करायच, आन् तकड काय व्हतय आन् काय न्है त्येची समदी वर्दी मत्री द्यायची.

**मंगळ**—बस बस बस बस! ठरल ठरल; अक्शी असच! वाः वाः वाः वाः! युगुततर लई नामी काडलियास!

**निरी**—पर यादवरावानी आनकीबी योक युगुत सांगितलीया. ती काय जर का सादली तर लई ब्येस व्हईल अक्शी! घरधण्याली झाला पिलग—

**मंगळ**—आन् मीतर शाप साबूत हायेकी! इचीभन् मला पिलग? आन् मग तूं काय कुनासंग पाटबीट लावनार व्हय?

**निरी**—वाइचा कान द्या जरा—

**मंगळ**—अस्तुरीच्या हातामंदी कान घेऊनशेनी मी का भइरा व्होवूं व्हय?

**निरी**—पर अदूगर माज समद बोलन ऐकूनशेनी तर घ्या—

**मंगळ**—हं बोलबोल. काय बोलतीयास? (एकीकडे) बायकूच्या गुलगुल गोष्टी ऐकाया कोन् न्है देनार कान! अस्तूरीच्या हातामंदी कान देत न्है असा समद्या दुनयेमंदी योकबी न्है गवसायचा!

**निरी**—गेल्या पिलगानं तुमच त्वांड आन् कान दोनीबी गेल्याती—

**मंगळ**—आन् मग जेवनार कशान? तुला भाकरी बडवाया नंग म्हूनशेनी ही युगुत व्हय? त्वांड आन् कान ग्येल ह्मंजे मग ह्ये डोळतरी कशाला व्हावेत? त्येबी टाक काडूनशेनी!

**निरी**—असं वंगाळ काय बोलता? असा करा भाना—

**मंगळ**—हां! मग न्है काईबी हरकत. आन् ह्मोर—

**निरी**—(त्याच्या कानांत कांहीं सांगून) आन् असा भाना करूनशेनी रावसायेबाली ह्ये समद खुनेनं कळवा. ह्मंजे धनीसाब इश्वासबी टाकतील आन् घरधन्याह्मोरं ह्ये करू आन् ह्ये नंग म्हून कचरनार बी न्हैती!

**मंगळ**—अस्स! आता आलं ध्येनामंदी. हीतर मगाच्याहूनबी लै ब्यैस युगुत!

**निरी**—पर मी सांगितलया येच्यामंदी अक्शी योक काडीचीबी टंगळमंगळ न्है चालनार! त्यो मुकुंदराव हाये अक्शी लुक्का. त्येला आपला कावा न समजल अस धोरन ठिऊनशेनी क्येलं पायजे समद. टंगळमंगळ न्है चालनार करून—

**मंगळ**—व्हय, व्हय, व्हय, अग—

**टंगळ मंगळ जरी करीन तरी कर थूः थूः थूः थूः थूः!**
**माजी कामगिरी चुकवीन तरी कर थूः थूः थूः थूः थूः!**
**धोरन ठिऊनशनी नै वागन् तरी कर थूः थूः थूः थूः थूः!**
**मुकुंदरावच बिंगट न्है काडिन तरी कर थूः थूः थूः थूः थूः!**
**त्वांड उगडून कदीं बोलन् तरी कर थूः थूः थूः थूः थूः!**

**यादवराव**—(आंतून) निरे निरे! मंगळ आलायना? त्याला इकडे पाठीव अन् तूं किशाला घरीं घेऊन जा. तो रडतो आहे.

**निरी**—(मंगळास) त्ये पगा, आंत यादवराव हटकत्याती घरधण्याल्ली. (मोठ्यानें) व्हय आल्ये, आल्ये.

[दोघेंहि जातात.

---

## प्रवेश ९ वा.

[ **स्थल**—एका घराच्या भिंतीला **'इंद्रभुवन'** ह्मणून पाटी लागली आहे. व त्या पाटीखालीं **'टवाळ क्लब'** अशी अक्षरें भिंतीवर कोणीं कोळशानें लिहिलीं आहेत. आंतील दालनांत गोविंदराव, गोपाळराव, सदाशिवराव, मुकुंदराव, विनू, वाळ्या, इत्यादि मंडळी बसली आहे. तबला, पेटी, वीणा, पत्ते, गंजिफा, बुद्धिबळें असें सामान जागजागीं पडलें आहे असा प्रवेश. ]

**गोपाळराव**—रावसाहेबांचा कंठ मोठा गोड आहे बोआ! कसें काय गुरुजी?

**सदाशिवराव**—अहो, गोड ह्मणून काय विचारतां? नुसतें ऐकत रहावेंसारखें वाटतें. आपल्या इंद्रभुवनाचें नशीब ह्मणायचें आपल्याला हा एक लाभ झाला! (गोपाळरावांस) काय समजलांत?

**गोपाळराव**—अलबत्! (एकीकडे) मुकुंदराव, एकशेंत्र्याहत्तर!

**हरिभाऊ**—(स्वगत) हे दुसऱ्याला खुलवून चढीला देणारे गृहस्थ दिसतात!

**सदाशिवराव**—रावसाहेब, आणखी एक होऊं द्या चीज. मुकुंदराव, सांगा रावसाहेबांनां आणखी एखादी चीज ह्मणायला.

**मुकुंदराव**—(रावसाहेबांस) होऊं द्या, इथें कांहीं कुणी परकें नाहीं!

**माधवराव**—मी कांहीं लाजत नाहीं. कोणची ह्मणूं? सांगा, हवी ती ह्मणतों.

**सदाशिवराव**—कां, मी ह्मणतों हें खरें कीं नाहीं गोविंदराव? अहो, ह्मणा ह्मटल्याबरोबर ह्मणण्याची तयारी असणें हा एक गुण आहे, आणि चांगली आवाजदारी असणें ही एक ईश्वरी देणगी आहे! काय समजलांत?

**गोविंदराव**—अलबत्! (एकीकडे मुकुंदरावास) हं, एकशेंचौऱ्याहत्तर. टिपा.

**हरिभाऊ**—(स्वगत) आणि दुसऱ्यांनां खुलविण्याची विद्या असणें ही दुसरी ईश्वरी देणगी!

**गोविंदराव**—अलबत् 'गिफ्ट'च ती! आवाजांत काय नुसतें 'सिल्व्हर' आहे! (एकीकडे) आपण ह्मणत होतां ते हेच गृहस्थतर?

**सदाशिवराव**—हो, हेच ते. त्या यादवरावांचे मेव्हणे.

**गोविंदराव**—माणूसतर लाख्या दिसतो बुवा!

**मुकुंदराव**—(एकीकडे गोपाळरावास) लाख्याच का? मी ह्मणतो कोव्या!

**गोपाळराव**—तुह्मी कोव्या करतां ह्मणून तुम्हांला कोव्या ह्मटलेलें शोभेल.

**मुकुंदराव**—तसें नव्हे हो, कोट घालतो ह्मणून कोव्या!

**सदाशिवराव**—अहो, साहजिकच आहे. यथास्थित पैसे आहेत जवळ, अन् शिवाय काळजीबिळजी नाहीं कसली! आणीक काय पाहिजे? काय—काय समजलांत?

**गोपाळराव**—(एकीकडे) हं मुकुंदराव, टिपा, एकशेंपंचाहत्तर! (उघड) रावसाहेब, ह्मणतांना मग?

**माधवराव**—ह्मणतों की, पण कोणची ह्मणूं?

**सदाशिवराव**—आपल्या इच्छेप्रमाणें संगीत नाटकांतलीच कां होईना. काय समजलांत?

**गोपाळराव**—(मोठ्यानें) एकशेंशहात्तर! (माधवरावांस) हो हो, संगीत नाटकांतलीच होऊं द्या.

**माधवराव**—एकशेंशहात्तर काय? चिजांनां नंबर दिले आहेत कीं काय? हें पहा, नाटकांतल्या चिजा साध्याच ह्मणायच्या ह्मणजे तें जमत नाहीं जमावें तसें!

**गोविंदराव**—बरोब्बर आहे यांचें ह्मणणें! कारण शेक्स्पीयरच्या नाटकांतलीं जेव्हांजेव्हां 'रेसिटेशन्स' होतात तेव्हांतेव्हां तींदेखिल ॲक्टिंग आणि अभिनय

यासकट होतात. त्याशिवाय यावी तितकी 'ब्यूटी' अथवा रंग नाहीं येत आणि मजाहि पण होत नाहीं! तोच प्रकार नाटकांतल्या पदांनांहि लागू आहे. पात्राच्या तोंडीं घातलेल्या 'सेन्टिमेंट'ला बरोब्बर 'एक्स्प्रेशन' मिळायला आवश्यक लागणारें सगळें साहित्य अनुकूल पाहिजे. त्याशिवाय मनोविकारांनां बरोब्बर उद्गार असा देतांच यावयाचा नाहीं. शक्यच नाहीं मुळीं तें!

**माधवराव**—बरोबर आहे अगदीं तुमचें ह्मणणें! (इतरांकडे पाहून) या बाबतींत यांचें अन् आमचें मत अगदीं ठाम जुळतें!

**गोविंदराव**—(स्वगत) ही स्वारी एकंदरींत मोठी रसिक आणि मार्मिक दिसते.

**सदाशिवराव**—मग आमचा विनू आहे की नकल्या! तो हव्या त्या स्त्रीपार्टींचें काम अगदीं हुबेहुब उतरतो. हं विनू! चल, असा पुढें ये पाहूं. काय समजलास?

**गोपाळराव**—(एकीकडे हळूच मुकुंदरावाचे मांडीवर थाप मारून) हं, मुकुंदराव, एकशें—

**मुकुंदराव**—सत्त्याहत्तर!

**गोपाळराव**—(विनूस) अरे, असें लाजायला काय झालें? आपलेंतर हें इंद्रभुवन आहे. इथें कशाला कमी आहे?

**हरिभाऊ**—(स्वगत) आणि या एकजात भिंतीला टांगलेल्या स्वर्गांतील अप्सरा आहेत. इंद्रभुवनांत चित्रांची निवड तर मोठी सुरेख केली आहे!

**गोपाळराव**—हे आपले गुरुजी वाजविण्याच्या कामांत कुणाला हात धरूं देणार नाहींत!

**मुकुंदराव**—(एकीकडे गोपाळरावांस) काय पांचजन्य वाटतें? कां, हात कां नाहीं धरूं देणार? हातावर बिब्बा चिडलाय कीं काय त्याच्या?

**गोपाळराव**—वाः, मुकुंदराव वाः!

**सदाशिवराव**—हं, विनू! लाजतोस काय असा? परकें का आहे कुणी इथें! रावसाहेब, आपली जर कांहीं हरकत नसेल तर—हं, काय समजलांत?

**गोपाळराव**—(मुकुंदरावास) मुकुंदराव टिपा, हें एकशेंअठ्याहत्तरावें. काय समजलांत! मला वाटतें आज लाखोली होणार!

**मुकुंदराव**—आणि तुमच्या उजळणीला उजळा मिळून ती घटून जाणार! काय समजलांत? हें एकशें एकूणऐशीवें.

**गोपाळराव**—ह्मणजे? तुह्मीं ह्मटलेलेंसुद्धां यांचेंच समजायचें कीं काय?

**हरिभाऊ**—(हंसून स्वगत) एकून मघांपासून यांनीं गुरुजींच्या 'काय समजलांत'ची नोंद चालविली आहे!

**गोपाळराव**—(हरिभाऊंस) कांहो, हंसलांतसे?

**हरिभाऊ**—आपलें नोंदणीरजिस्टर पाहून!

**गोपाळराव**—अस्सें! (मुकुंदरावाकडे पाहून हंसतो.)

**सदाशिवराव**—(माधवरावांस) मग आपली कांहीं हरकत आहे?

**माधवराव**—छत्! माझी कसली हरकत?

**गोविंदराव**—नाहीं ना, तर मग होऊं द्या एक.

**माधवराव**—(स्वर लावतो व विनूकडे पहात)

**हा उत्सुक तव संगमा, मग कां भीसी?**
**झिडकारिन तुजला असें मनिं कां अणिसी?**
**दुर्लभ ती लक्ष्मी जना। जन का तिजशीं?**
**आतां संशय न धरिं मनीं,**
**या परिजनीं; विपरित बघसी.**

**गोपाळराव**—(मुकुंदरावास) मला वाटतें, विन्याला एखादा काजळी शाल्ह नेसायला दिला, तर यापेक्षां जास्त रंग येईल.

**मुकुंदराव**—ह्मणजे त्यानें लाजावें आणि सध्याच सगळें फिसकटून बसावें! तिथपर्यंतहि मजल पोंचेल. पण जरा दमादमानें घेऊं. नाहींतर काजळी शालूनें काळा रंग पसरायचा आणि साराच अंधकार व्हायचा!

**गोविंदराव**—मला वाटतें, बसून ह्मटल्यानें जितकें अवसान सांपडायला पाहिजे, तितकें सांपडत नाहीं. आणि ह्मणूनच नाटकांत बैठे सीन पडतात.

**माधवराव**—बरोब्बर आहे. तुह्मी ह्मणतां तें अगदीं खरें!

**गोविंदराव**—तुह्मी पद ह्मणत असतांनाच माझ्या लक्ष्यांत येऊन चुकलें तें. मग स्टेजची मजा ती काय! मृच्छकटिकाच्या वेळीं आह्मांला हा चांगला अनुभव आला.

**गोपाळराव**—हे गोविंदरावतरी दुसऱ्याला बरेच चढीला देणारे माणूस दिसतात.

**सदाशिवराव**—मग रावसाहेबांची जर कांहीं हरकत नसेल तर इथें कांहीं कुणी परकें नाहीं. काय समजलेत?

**गोपाळराव**—( मुकुंदरावाकडे पाहून हंसत) एकशें एकूणऐशीं! टिपा.

**गोविंदराव**—ह्मणून ह्मणतों कीं, हे असले प्रवेश उभ्यानेंच झाले पाहिजेत. ह्मणजे–मी काय ह्मणतों त्याचें बरोब्बर प्रत्यंतर येईल तुमच्या अनुभवाला.

**सदाशिवराव**—ऊठ, विनायक ऊठ. नीट पदरबिदर घे सांवरून! हं, काय समजलास ?

**गोपाळराव**—( घंटा वाजवून मुकुंदरावास) एकशें ऐशीं! (इतक्यांत घड्याळांत बाराचे ठोके पडतात.) तासाला १८० ह्मणजे एका मिनिटाला तीन पडले, काय समजलांत! बरेच स्वस्त पडले ह्मणायचे! (विनूस) हं, विनायक ऊठ, लाजतोस काय असा ? घंटादेखील झाली. आतां पडद्याबाहेर पात्रें आलींच पाहिजेत.

**हरिभाऊः**—( स्वगत ) सूत्रें चाळायला यांच्यासारखे सूत्रधार हातांत घंटा घेऊन तयार असल्यावर येथें पात्रांचा काय तोटा!

**सदाशिवराव**—हं, विनू, चल आटप.

( विनू उभा रहातो व पदर घेतो.)

**माधवराव**—(हंसत हंसत उठतो) हं, आतां हरकत नाहीं. गुरुजी, ठेका धरा तुह्मी नीट.

**सदाशिवराव**—हः हः हः हः! रावसाहेबतरी मंडळींतले आहेत—काय समजलांत ?

**गोपाळराव**—(मुकुंदरावास) ऐकशें एक्याऐशीं! (उघड) हें काय विचारतां ? विनू कोप आल्याचा हावभाव कर. पेटीच्या सुरावरून पद आलें कीं नाहीं लक्ष्यांत ?

**माधवराव**—(अभिनययुक्त ह्मणतो.)

**नच सुंदरि! करुं कोपा, मजवरि धरिं अनुकंपा!**
**रागानें तव तनु ही पावत कशि कंपा! । ध्रु० ।**
**करपाशीं या तनुला बांधुनि करिं शिक्षेला;**
**धरुनीयां केशांला दंतव्रण करिं गाला;**
**कुचभल्ली वक्षाला टोंचुनि दुखवीं मजला;**
**हाचि दंड योग्य असे सखये! मत्पापा!**
**नच सुंदरि! करुं कोपा, मजवरि धरिं अनुकंपा!**

**हरिभाऊ**—(स्वगत) आतां मात्र बरोब्बर रंग जमला.

**विनू**—(दूर होऊन)

**पुरे पुरे! ही कपटकृती!**
**किति आहे मजवरि अपुली प्रीती**
**असें खचित मी समजुनि ती—**

**गोविंदराव**—(मंडळीस) पहा, उठून उभें राहिल्याबरोबर किती रंग आला!

**विनू**—पुढचें आठवत नाहीं मला!

**हरिभाऊ**—(स्वगत) अशानें मात्र बेरंग व्हायचा!

**सदाशिवराव**—नाहीं तर नाहीं. 'हं हं मदंगा'तरी येतेंय कीं नाहीं पाठ?

**विनू**—हो, तें येतेंय.

**गोपाळराव**—मग, तेंच का होईना.

**गोविंदराव**—त्यालातरी काय हरकत आहे! चांगलें पाठ येत असल्याशिवाय 'ॲक्टिंग' नेहेमीं लंगडें पडतें! कारण, पदें काय अथवा भाषण काय, आठवण्याकडे लक्ष्य गेलें कीं इकडे आविर्भाव आणि अभिनय हे फिक्के पडलेच पाहिजेत. 'लॉ आफ इंपेनिट्रिबिलिटी' हा सगळीकडे सारखा लागू आहे.

**सदाशिवराव**—लॉ आफ इम्पिटि लिप्–टी लिप्–टी तो काय?

**गोपाळराव**—ह्मणजे ओंठाला चहा लावायचा—

**मुकुंदराव**—आणि बशी उपडी टाकायची!

**गोविंदराव**—गुरुजी, यांच्या थट्टेकडे नका लक्ष्य देऊं. तो लॉ ह्मणजे—दोन वस्तूंचें एकाच काळीं दोन ठिकाणीं व्यापकत्व असूं शकत नाहीं, हा होय. ह्मणजे आतां तुह्मी इथें आहां तर याच वेळीं तुह्मी आपल्या घरीं असूं शकणार नाहीं—

**सदाशिवराव**—आणि मी घरीं आहें तर इथें असूं शकणार नाहीं, असाच कीं नाहीं?

**गोपाळराव**—पण तुह्मी आतां ज्याअर्थीं इथें आहां, त्याअर्थीं आतां घरीं असूं शकणार नाहीं, हेंच खरें आहे.

(सर्व हंसतात.)

**गोविंदराव**—ह्मणून ह्मणतों, पाठ केलेलें आठविण्याकडे लक्ष्य गेलें कीं 'ॲक्टिंग' गेलें!

**गोपाळराव**—आणि 'ॲक्टिंग'कडे लक्ष्य गेलें कीं पाठ केलेलें गेलें! एकून साराच फज्जा!

**माधवराव**—म्हणजे, त्यांचें ह्मणणें कीं, चक्क पाठ येत असलें पाहिजे; म्हणजे सगळें लक्ष्य ‘ॲक्टिंग’कडे देतां येतें अन् मग तें सहज आणि स्वाभाविकपणानें येतें ह्मणाना.

**सदाशिवराव**—विनायक, तुला ‘हं मदंगा’ तरी अगदीं चक्क तोंडपाठ येतेंना पण?

**विनू**—हो, अगदीं चक्क येतें.

**मुकुंदराव**—मग तेंच होऊंदे तर.

**विनू**—पण मागचें भाषण झाल्याशिवाय मी कसें म्हणूं?

**माधवराव**—(साभिनय) सुंदरि! (स्पर्श करूं लागतो.)

**विनू**—(साभिनय)

**हं हं! मदंगा लावुं नका कर दूर सरा!**
**कर दूर करा—तुह्मि दूर करा!**
**खराच नसतो धीर नरा!**
**कर दूर करा—तुह्मि दूर सरा!**

**माधवराव**—(साभिनय)

**जीवन केवळ तुझ्या करीं गे!**
**ह्मणुनी कां हीं ऐशीं सोंगें?**
**दावुं नको मज पुढती अंगें—**

**विनू**—

**हं हं! कर दूर करा—तुह्मि दूर सरा!**

(वाः वाः! शाबास शाबास! मंडळीचा एकच हंशा पिकतो.)

**गोविंदराव**—माधवरावतरी एक ‘जीनिअस’ आहेत! हे जर इंग्लंडसारख्या देशांत जन्मते, तर यांच्या ह्या ‘जीनिअस’ची चीज झाली असती! तिकडे ज्याला ज्या विषयाची आवड त्या विषयाकडे त्याला आपलें सगळें आयुष्यदेखील खर्च करीन ह्मटलें तर सवड असते, तशा ‘फॅसिलिटीज’ असतात, आणि तिथें गुणांची पारख करणारे रसिक लोकहि असतात. हेनरी आयर्व्हिंग म्हणजे एक यःकश्चित् नाटकांतला सोंगाड्या! पण त्याच्या अंगचे अभिनय, अंगविक्षेप, तादात्म्य इत्यादि गुण पाहून महाराणीसाहेबांनीं त्याला ‘सर’ ही पदवी दिली. केवढा गौरव हा! पण हिंदुस्थानांत काय त्याचें! इथें गुण असले तरी त्याची माती व्हायची!

**गोपाळराव**—बरोबरच आहे. इथें मातीशिवाय आतां उरलें आहे काय!

**सदाशिवराव**—रावसाहेबांनां मात्र व्यर्थ तसदी झाली ह्मणायची. काय समजलांत?

**माधवराव**—तसदी? छेः हो! मला तुम्हीं आपल्या मंडळींतलाच एक आहे असें समजल्यावर मग तसदीबिसदी कसली? त्यांतून तुह्मीतर इथले गुरुजी!

**गुरुजी! तुमच्या प्रीतिस पार नसे!**
**प्रीतिस पार नसे हो! गुरुजी! तुमच्या प्रीतिस पार नसे!**

**मुकुंदराव**—(गोपाळरावास) गाण्यांनीं पार बांधा ह्मणावें आतां!

**माधवराव**—

**शिष्यतापहरिणी ही तव वाणी**
**भरली अमृतरसें हो गुरुजी! तुमच्या प्रीतिस पार नसे!**

**गोपाळराव**—गुरुजींच्या अमृतरसानें ही पिकदाणीमात्र भरली आहे खरी!

**सदाशिवराव**—हें पहा, रावसाहेबांनां जिथें जें हवें तेंच आठवतें हटकून. किती मार्मिकपणा आहे! काय समजलेत?

**गोपाळराव**—(मुकुंदरावाकडे पाहून हंसत) खूप समजलों! (उघड) आतां आपल्या बाळप्पाला घ्या पुढें. त्यांचा होऊंद्या आतां फार्स! गुरुजी, हं बोलवा त्यांनां.

**हरिभाऊ**—(स्वगत) मला वाटतें, इथें पहिला अंक संपला. आतां दुसऱ्या अंकाच्या पहिल्या प्रवेशाला सुरुवात होणार!

**सदाशिवराव**—बाळप्पा, या, असे पुढें या. विनू, त्यांनां घे, असे पुढें घे.

**बाळप्पा**—(हंसत पुढें येऊन) हः हः हः हः! मला काय येतें यांच्यापुढें!

**मुकुंदराव**—तुला यांच्यापुढें येत नाहींना? तरमग असें करूं. आह्मी सगळेच उठून तुझ्यापुढें बसतो; ह्मणजे तूं आपल्याआपण मागें होशील! मग तर नाहींना ह्मणायाला कांहीं हरकत? कां, असेंच कीं नाहीं गोपाळराव?

**गोपाळराव**—काय हरकत आहे? पुढें गाण्याची जी उठावणी व्हायची त्यापूर्वी ही उठावणी बरी! (बाळप्पास) बाळप्पा, हे नवे रावसाहेब तुमच्या लग्नफंडाला मोठी रक्कम देतील. पण काम मात्र जोडांत झालें पाहिजे!

**माधवराव**—अहो भिकंभटजी! या, या एक ठेवून!

**गोपाळराव**—(हंसत) होः होः होः होः! भिकंभटजी नव्हेत ते. त्यांच्या अन् यांच्या चेहऱ्यांत साम्य आहे. त्यामुळें सगळे असेच फसतात अगदीं. हं बाळप्पा, उभें राहून होऊंद्या—अथवा आम्ही सांगून नाहीं तुह्मी ऐकणार—तुम्हांला गुरुजींनींच सांगितलें पाहिजे. गुरुजी, तुम्हींच सांगा बुवा.

**बाळप्पाः**—छे: छे:, तसें नको. ह्मणतों की मी—

**सदाशिवराव**—उभें राहून नीट हावभावांसकट झालें पाहिजे सगळें! हें या इंद्रभुवनांतलें एक रत्न आहे!

**गोपाळराव**—(एकीकडे) आणि हें दुसरें!

**हरिभाऊ**—(स्वगत) मलातर इथें सारींच रत्नें दिसतात. भोजराजाच्या दरबारीं सुसतीं नऊच होतीं!

**मुकुंदराव**—हं, बाळप्पा उठा. इथें संकोच वाटूं देण्याचें कारण नाहीं.

**बाळप्पा**—(उठून उभा राहून) काय ह्मणूं? मंडळीच्या इच्छेप्रमाणें होऊंद्या.

**गोपाळराव**—हिंदुस्थानींत आरंभ होऊन मग संगीतांत उतरलें पाहिजे.

**सदाशिवराव**—हों, तसेंच.

**बाळप्पा**—(उठून उभा राहून विलक्षण हावभाव करून सूर लावून ह्मणतो)

**दिल् सफान पाय इन्सान**
**दिल् सफान पाय इन्सान!**
**रहे हार छान छान बुद्धिमान, ग्यानवान**
**दिल् सफान पाय इन्सान!**

**गोपाळराव**—ही नको बुवा, दुसरी ह्मणा एखादी.

**बाळप्पा**—दुसरी? (सूर बदलून) हं—

**हजारा मोरा कानका मोती—**

**मुकुंदराव**—हीतर हजारदां ऐकलेली आहे!

**बाळप्पा**—बरें दुसरी ह्मणतों तर, ऐका—

**हो न दिलाराम तो क्या दिल्को आराम**
**दिल्को आराम न तो जीनेसे काम ॥ हो न दिलाराम—**

**माधवराव**—हें ठीक आहे; पण मला वाटतें यापेक्षां आपल्या संगीत नाटकांतल्याच होऊंदेत.

**बाळप्पा**—जशी रावसाहेबांची मर्जी!

**शारदे, दासकामदे, कमलमृदुपदे, प्रजापतितनये**
**प्रजापतितनये—**

**सदाशिवराव**— हा जुन्या नाटकांतला प्रकार. हो-काय समजलांत? शाकुंतल, सौभद्र यांतल्या चिजा काढा.

**बाळप्पा**—हं–( सूर लावून हावभावासकट )

**व्यर्थ मी जलमलें थोर कुळीं**
**लागला सर्वदा फांऽऽऽस गळीं—**

**गोपाळराव**—यापेक्षां 'अरसिक किति हा शेला' हें जर ह्मवभावासकट ह्मटलेंत तर फार बहार होईल—

**बाळप्पा**—ठीक. ( आपल्या अंगावरील धोतराची चुंबळ करून उजव्या हातांत घेऊन त्याचेकडे पहात साभिनय म्हणतो )

**अरसिक किति हा शेला !**
**त्या सुंदर तनुला सोडुनि आला. । ध्रु० ।**
**प्रेमें प्राणपतीला । मीं संतोषें हा अर्पण केला ।**
**तेथुनि कां हा ढळला ।**
**कोंडुनि ठेविन याला ।**
**मज दृष्टिस नलगे निष्ठुर मेला !—**

(असें ह्मणून ती चुंबळ नेसावयाच्या धोतरांत ठेवतो व विलक्षण हावभाव करतो.)

**गोविंदराव**—हं, अभिनय सुरू झाल्याबरोबर कसा रंग आला पहा !

**बाळप्पा**—रंगाला काय कमी—

**रंगीनें लाविला चुटका—**

**गोपाळराव**—हं हा एवढाच चुटका बस्स ! आतां एखादें परमेश्वरपरस्तवन होऊंद्या.

**बाळप्पा**—हं–( एक काठी घेऊन तंबुऱ्यासारखी ह्मतीं धरून व पागोटें काढून शेंडी उभी करून नाचत नाचत ह्मणतो. )

**पावना वामना या मना**
**दे तव भजनीं निरंतर वासना. । ध्रु० ।**
**श्रीवत्सांकितकौस्तुभधारिन् योगिजनांतररंजना ॥ १ ॥**

**मुकुंदराव**—फार बहार केलीत. आतां एखादी लावणी होऊं द्या.

**बाळप्पा**—ठीक (विलक्षण डोळे व हावभाव करित)—

**नग नग पळून जाऊ तू नारी !**
**जरा थांब, थांब थांब फिर् मागारी ! । ध्रु० ।**
**त्यो मोर तू मोरिन का जातिस त्येला टाकुन ?**

**सर्व**—वाः खाशी, खाशी ! वन्समोअर !

**बाळप्पा**—एकदा झालेली पुन्हा नाहीं. ही दुसरी घ्या माझ्याकडून त्यापेक्षां सरस. (शीळ घालून शिळेंत म्हणतो.)

**मला मुमइला जायचय तिकिट काढून का द्यानां**

**माधवराव**—हं, हा प्रकार कांहीं निराळा! याचाहि रंग कांहीं वेगळाच आहे.. ही एक लज्जत आहे!

**गोविंदराव**—अलबत्—

**बाळप्पा**—दुसरें घ्या. (हां हां मदंगा यांतील दोघांचीं संभाषणें, एक मर्दांनी व एक जनानी आवाजांत म्हणतो. सर्वजण वाहवा करितात).

**मुकुंदराव**—तें 'आतां आलें मला अवसान' म्हणा हो.

**बाळप्पा**—

**आतां आलें मला अवसाऽऽऽन!**
**हाणाहाण, दाणादाण, रानोरान!**
**तांबदान, वस्तरदान, देदान, सुटे गिरान!**
**गोदान, कापीन मान, फुटले कान!**
**अहो, आतां आलें मला अवसाऽऽऽन!**

**हरिभाऊ**—(स्वगत) हा चांगला कोरडा आहे! पण समजणारांनां!

(मध्यंतरीं विनू बाळप्पाचे अंगावर एक ढेंकूण सोडतो. बाळप्पा तो चावतोसें पाहून काढूं लागतो पण तो सांपडत नाहीं. शेवटीं तो सांपडला असें पाहून एकच हंशा पिकतो.)

**गोपाळराव**—बरी सांपडली बुवा तुम्हांला शिकार! बाळप्पा, त्या 'माधवानुज–सख' कवीनें तुम्हांला या ढेंकणावर एक विनोदी पद करून दिलें आहेना? तें म्हणा पाहूं.

**बाळप्पा**—कोणचें? तें—

**काय बेट्या ढेंकणाची मजातरी वायुगती पळतो—**

**गोपाळराव**—छत्, तें नव्हे हो. तुम्हांला त्यांनीं तें संतापशमनांतल्या थर थर थर थरच्या चालीवर करून दिलें आहे तें?

**बाळप्पा**—हो हो! म्हणतों. पण तुह्मांला अगोदर एक फार्स दाखवितों. (एकदम विनूचें नाक धरतो.) हा नाक धरलें कीं तोंड उघडतें याचा फार्स! विन्या! पुन्हा करशील का थट्टा? ढेंकूण सोडतोस नाहीं माझ्या अंगावर?

**गोपाळराव**—जाऊंद्या, पोर आहे तो! त्याचें काय घेतां मनावर?

**बाळप्पा**—पोर! (डोळे वटारून विनूकडे पहातो.)

**गोपाळराव**—बाळप्पा, जाऊंद्या. त्याच्याकडे काय लक्ष्य देतां? आणखी एक चीज सुरेख ठेक्यांत होऊं द्या, कीं, रावसाहेब तुह्मांला एक फक्कड बायको करून देतील! लग्न करून घ्यायचेंय ना तुह्मांला? (रावसाहेबांस) ह्यांचें इतकें वय झालें आहे, पण हे आपल्या लग्नाकरितां अजून फंड गोळा करताहेत. तुमची ह्यांची कुठें आज ओळख होते आहे. ओळख झाली कीं तुमच्याकडे ते आपली लिष्ट घेऊन येतील. हं बाळप्पा! आटपा, तुमच्या लग्नाच्या फंडाला हे रावसाहेब ५०० रुपयांचा आंकडा टाकणार आहेत! आजपर्यंत ३१०० चा आंकडा झाला आहे. बरोब्बर पांच हजार झाले, कीं, सवाई माधवरावांच्या लग्नासारखा थाट देऊं उडवून! हं, चला आटपा. हावभावासकट होऊं द्या.

**बाळप्पा**—(ढेंकूण घेऊन)

[चाल—हीच खरी। मूर्ति तरी.]

**ढेंकुण हा, प्राणी अहा, प्रतापि हा, किती पहा!**
**खंती वाटे, धीर तुटे, यासी चिरडावया. । ध्रु० ।**
**दुष्टा! तुला टाकतों दिव्यांत; मर मर मर मर**
**मर मर मर मर मर मर—**
**रक्त प्याला, लठ्ठ झाला ... ... ... ... ...**
**मला जसा करी पिसा, तशा पिसा ह्याच्या स्वसा!**
**निशिभर मज तोडुन ह्या घेतिल मत्प्राण! ॥१॥ ढेंकुण हा० ॥**

**सर्वजण**—वन्समोअर, वन्समोअर बाळप्पा!

**सदाशिवराव**—हें नाटकी संगीत बस्स झालें आतां. आतां एखादी अस्सल चीज, नाहींतर तराणा, नाहींतर साधी सुरावटच होऊं द्या.

**बाळप्पा**—ठीक. सूर आणि ठेका मात्र चांगला धरायला सांगा. (सूर धरून)

**तना नादर् दर्दर् तुंदर् दर्दर् दीम्**
**तादीम् तन नन ननन नन दीम् । तना० ।**
**मगमधन्नी पधनिसा रेसानिध**
**पधपम गमप मगम गमगरेसा**
**कडांऽधा धागे तिटकत् धिरिकिट**

**धिधिकिट धुमकिट तक्टि धा**
**धा धिनक तकिट धिनक ॥ १ ॥ नादर दर्दर्० ॥**

**सदाशिवराव**—कां गोविंदराव, कसें काय? आतांतर ह्मणाल कीं नाहीं कीं इंद्र-भुवनांतलें हें एक रत्न आहे ह्मणून?

**गोविंदराव**—यांच्याजवळ नुसती थट्टाच नाहीं. खरें गाणेंहि दिसतें आहे थोडें! मला वाटतें, आतां पुरे करावें; बरीच रात्र झाली, नाहीं रावसाहेब?

**माधवराव**—हो, बरीच रात्र झाली.

**बाळप्पा**—थांबा, इथवर नाटक झालें. आतां शेवटचा एक फार्स व्हायचा आहे!

**गोविंदराव**—फार्स! तो कसला बोवा आणखी?

**हरिभाऊ**—इथले दिवे मालवून टाकले ह्मणजे फार्सच होईल तो एक! इंद्रभुवनांतले हे सगळे देव स्वयंप्रकाशी आहेत. यांनां बाह्य आणि कृत्रिम दीपांची काय आवश्यकता आहे!

**बाळप्पा**—ऐका. विनू, असा उभा रहा. (मंडळीस) आणखी एक पद हावभावासकट ह्मणायचें राहिलें आहे. (विनूस) हें पहा, अशी छाती पसरून उभा रहा. (आपली छाती ताठ करून दाखवितो).

**छाति पसारे**—ऽऽ (त्याचे छातीवर टिचक्या मारतो.)
**कान उठायाऽऽ!**—(त्याचे कान उपटतो व टोपी खालीं पाडवून)
**कल्गी न हाले शिरकी!**

विन्या! पुन्हा करशील फाजीलपणा अन् थट्टा!

(एकच हंशा पिकतो व विनू रागावतो.)

**गोविंदराव**—रावसाहेब, उठायचेंना आतां?

**माधवराव**—हो, चला उठूंच आतां.

**गोपाळराव**—गुरुजी, चहा तयार आहे.

**सदाशिवराव**—मग इकडेच येऊंदेत तर कप. काय समजलांत?

[चहाचे कप भरून येत असतांना

**पडदा पडतो.**]

# अंक ३ रा.

## प्रवेश १ ला.

[स्थल—प्रेमाबाईचा वाडा. मोहनाबाई आपल्या खोलींत विक्रमशशिकला नाटक वाचित बसली आहे इतक्यांत वसंतराव जुन्या पद्धतीच्या वेषांत प्रवेश करितो.]

**वसंतराव**—(स्वगत) वसंतराव! कशाला—आलासतरी कशाला तूं मुंबईहून? मी आलों तरी नाटकाला जायचा हिचा हेका आहेच.

**मोहना**—(उठून स्वगत) परमेश्वरतरी कशी सांगड घालतो पहा! जें मला हवं तें यांनां नको आणि यांनां पाहिजे तें मला नको! पण नशीबाला आल्यावर करायचं काय? ( वसंतरावास लडिवाळपणें ) मग जायचंना गडे नाटकाला?

[ चाल—फुलें सुवासिक हीं.]

**पदें मनोहर तीं । किती तरि!**
**प्रियकांत! व्हाल निभ्रांत, ऐकतां विविध मधुर पंक्ती!**
**तीं कर्णमनोहर पद्यें प्रेमळ असती!**
**चालिही अभिनवा किति गुंगविती चित्तीं,**
**किति लोक पहायाला । जाती. ॥ १ ॥ पदें मनोहर तीं० ॥**
**त्यांत नटकंठही गोड, पाडितो भ्रांती,**
**मोहवी अभिनयें करित चंचला वृत्ती!**
**वाटतें येत का गंधर्वचि भूवरती!**
**मज तेंचि पहायाची । प्रीती. ॥ २ ॥ पदें मनोहर तीं० ॥**

**वसंतराव**—मनाची वृत्ति अशी चंचल होते एवढ्याचकरितां नाट्य हें अधम गणिलें आहे.

**मोहना**—

[चाल—सुलभ कशि गणा न भूपसुता.]

**अधम कशि गणावि नाट्यकला?**
**विधि विरची स्वकरेंचि जिला! । ध्रु० ।**
**वेद चारिही मंथुनि पाहीं**
**विरिंचि निर्मि जिला । सुरसुखा. ॥ १ ॥ अधम० ॥**

**तांडव लास्यें नर्तन हास्यें**
**महेश उन्नतिला । करि जिच्या. ॥ २ ॥ अधम० ॥**
**सुराङ्गनांनीं नाट्यीं नटुनी**
**सुरांस मोद दिला । अभिनयें. ॥ ३ ॥ अधम० ॥**
**नहुष नृपालें थोर कृपालें**
**प्रकार हा अणिला । महिवरी. ॥ ४ ॥ अधम० ॥**
**भरतमुनींनीं स्वानुभवांनीं**
**सुरम्य केलि जिला । नियमुनी. ॥ ५ ॥ अधम० ॥**

**वसंतराव**—तूं ह्मणतेस तसें जरी असलें, तरी पण आपल्या धर्माप्रमाणें पुरुषांनीं काय किंवा बायकांनीं काय कुणींहि पुरुषांनीं स्त्रियांचे वेष घेतलेले कध्धीं पाहूं नयेत!

**मोहना**—तर मग—

[चाल—कसें मन मोहुनी अमुचें.]

**खुळें जग का असे सगळें? किती जाती**
**पहाया नाटकें पाहीं । अति प्रीतीं. । ध्रु० ।**
**कवीजन ते तसे सगळे । रचिति कां तीं?**
**नवीं हीं नाटकें ऐशीं । पडे भ्रांती. ॥ १ ॥ खुळें जग का० ॥**
**युवतिवेषां धरूनीयां । घरोघर ते**
**किती बहुरूपि येताती । दिवाराती. ॥ २ ॥ खुळें जग का० ॥**

**वसंतराव**—(स्वगत) हिनें मला इथें बरोबर अडिवलेंन्! पण ह्याकडे लक्ष्य न देतां हिला मोघम उत्तर दिलें ह्मणजे बस्स! (उघड) नुसते खुळे नव्हत, तर मूर्ख ह्मणून जातात ते नाटकें पाह्यला! एरवीं ज्यांनां आपल्या धर्माची चाड आहे ते कध्धीं नाहीं जायचे!

**मोहना**—पण मी ह्मणतें, असे न जाणारे किती?

**वसंतराव**—मी ह्मणतों, न जाणारा एखादा जरी असला तरी त्याला आपल्या धर्माची चाड आहे, असें होतें.

**मोहना**—तर मग नाटकं लिहिणारे नाटकं लिहितात तरी कशाला?

**वसंतराव**—कशाला म्हणजे?—वाचायला.

**मोहना**—वाचायला? हो, पण गेल्या आदितवारींच—निकून मला तें उत्तररामचरित सगळं वाचून दाखविलंन. त्यांततर—

[ चाल—वसंतीं बघुनि मेनकेला. ]

**कुश, लव, नाटक नव करिती**
**पितयासंनिध, सहाय्य त्यांनां करि ते वासंती. ॥ १ ॥**
**देवी सीता जननी ती**
**घेत भूमिका नवनाटकिं, तिस अनुमति मुनि देती. ॥ २ ॥**
**अर्जुन होउनियां युवती**
**विराटनाट्यालयीं नाचला, धर्म न त्या त्यजिती. ॥ ३ ॥**
**ते सुर नाट्यातें बघती,**
**इंद्रसभेंतच्चि धर्मभ्रष्टता काय तयें करिती ? ॥ ४ ॥**

**वसंतराव**—अग, देव ते देव, आणि मनुष्यें तीं मनुष्येंच. देवांनीं कांहीं जरी केलें तरी धर्मभ्रष्टता आणि पाप होतेंय थोडेंच ?

**मोहना**—देवांनीं अधर्माचरण केलं तरी पाप होत नाहीं ? तर—

[ चाल—अक्षमाला माझि वेउनि. ]

**इंद्र कैसा भ्रष्ट झाला । जोडितां ती पापमाला**
**चंद्र पावे क्षीणतेला । पापि जरि नाहीं ! ॥ १ ॥**

(इतक्यांत इंदू लगबगीनें येते.)

**इंदू**—मावथी मावथी ! नातक बगायला गेऊन जानालना मला तूं आद ? आएल थत्यभामा मावथी आनिक कुनीकुनी गाल्या गेऊन आल्या आहेत त्या बोलाताहेत तुला. चल बाई लौकल.

**मोहना**—जा, त्यांनां ह्मणावं ही आलेंच मी.

**इंदू**—अगदीं लौकल ये. मी अन् यमूताई गालींत बथायला दाऊं ?

**मोहना**—जा, तुह्मी जाऊन बसा गाडींत. ही आलेंच म्हणा मी तुमच्या मागोमाग. (वसंतरावांस) मग, नाहीं का तर यायचं ?

**वसंतराव**—मीतर साफ नाहीं येणार. अन् तूंहि पण न जावेंस हेंच चांगलें.

**मोहना**—पण आजतरी गेलेंच पाहिजे गडे मला. नाहींतर इकडचं येणं झालं ह्मणून येत नाहींस असं ह्मणून मेली थट्टा करतील माझी सगळ्याजणी. ह्मणून ह्मणतें आज तरी—

**वसंतराव**—(स्वगत) हो, ही ह्मणते हेंहि एका प्रकारानें खरेंच. (उघड) आज जा, मात्र यापुढें कधीं जात जाऊं नकोस.

**इंदू**—(जवळ येऊन पदर धरून ओढून) मावथी, मावथी, चल बाई, कितीग तली उछील तुधा.

**दाउं पहायला नातक, उछिल किती धाला!**
**दागा थगल्या अडुनी दातिल न मिले बथण्याला!**

**मोहना**—जातें तर. नाटक संपल्याबरोब्बर येईन. (जातां जातां इंदूस) यमूताई कुठं आहे ग? बसली का गाडींत?

**इंदू**—गाडींत नाहीं बथली ती. दालांत उभी आहे ती तुधी वात पहात, चल लौकल.

**मोहना**—मी जातें आहें पण मला असं वाटतं कीं:—

[चाल—कर टाकिं सखे गे.]

**मी कपट पतीशीं करित असें। ध्रु०।**
**" समजुनउमजुन पतिवच भंगुन**
**वरिशि अद्यपण,**
**हितकर गमन न "**
**हें श्रुतिं कोणी वदत असे!**
**मी कपट पतीशीं करित असें. ॥ १ ॥**
**नाटक पाहुन तृप्त न कधि मन,**
**जातचि वेधुन अधिकचि अनुदिन!**
**मी काय करूं?**
**मज कळत नसे!**
**मन वळत नसे!**
**मी कपट पतीशीं करित असें. ॥ २ ॥**
**अनृत वच वदुन, कुटिल मति धरुन,**
**मी करित गमन,**
**तिळहि न उचित न!**
**मी खचित पतीला ठकवितसें.**
**मी कपट पतीशीं करित असें. ॥ ३ ॥**

[जाते.

## प्रवेश २ रा.

[**स्थल**—बुधवारबाग. मुकुंदराव एकटाच बांकावर बसला आहे.]

**मुकुंदराव**—बायकांनां नाटकें दाखवावींत कीं दाखवूं नयेत? आपल्यालातर बुवा हा एक मोठा प्रश्न पडला आहे किती दिवस! या नाटकांसंबंधानें एक अलीकडचा कवी ह्मणतो कीं:—

**नाटक तर अखिल जगाचा दर्पण,**
**गुणिगण गणिति जया जगभूषण!**
**चित्रविचित्र स्वभावपरीक्षण,**
**सुखदुःखाचें पूर्ण प्रकाशन;**
**नवरस रसवाया, सुरनुति वदवाया,**
**दांभिक दंभा झटपट निवटाया,**
**कविवर विरचिति, नवकृति, नवरिति,**
**सरस रसिकजनतनमन हरिखाया!**
**विद्यागृह हें, शिक्षणसाधन,**
**त्यांतुनि संगित करि जनरंजन. ॥ १ ॥ नाटक तर० ॥**

पण मी ह्मणतों कीं:—

**नाटक तर कामिजनांचा दर्पण,**
**तेथें सुंदर युवति-प्रदर्शन;**
**नाटक पूर्ण सुखाचें साधन,**
**शृंगाररसाचें करि पोषण;**

कारण तिथें—

**वरतनु, शशिवदना, गजगति, मनहरणा,**
**सिंहकटी या, उठविति मनिं मदना!**
**प्रेक्षकवृंदहि येतो पाहीं**
**मधुर अधरधर युवतिंस निरखाया!**
**विलासगृह हें, कीं मदनाङ्गण**
**जेथ विहरती विविध विषयि जन!**
**फुकटचि मिटक्या माराया!**
**मधुनमधुन युवतिशतां निरखाया!**

इतकेंच नव्हे, पण खरे रसिक तर—

**कचरति नच मनिं हळुच मधुनमधुन खडेहि फेंकाया !**
**नाटक होतां द्वारीं जाउनि राहति नयनां सुखवाया !**
**नाटक तर कामिजनांचा दर्पण. ॥**

कित्येक चांगले सन्मान्य आणि मार्मिक लोकतर दुर्बिणी लावून सूक्ष्म निरीक्षण करितात. तेव्हां असें वाटतें कीं:—

[चाल—ऐक राया दे रघूत्तम रामजाया.]

**नाट्यशाला। केंवि ह्मणावें इजला!। ध्रु०।**
**वेधयंत्रें जेथ लावुनि वेध घेउनि विविध हे,**
**दिव्य तारामंडलाप्रति शोधिती जन मान्य हे! ॥ १ ॥**
**वेधशाला वाटते ही नाट्यगृह नच मन्मती,**
**गति, गुरुत्वाकर्षणा जन तारकांच्या लक्षिती! ॥ २ ॥**
**दिव्यतारा भूग्रहांची। होइ युति जरि चुकुनियां,**
**महदनर्थापात घडतिल! पात युक्तचि भ्रष्टल्या! ॥ ३ ॥**

पण मी ह्मणतों कीं—नाटक जर असा सगळ्या जगाचा दर्पण आहे, तर वाटेल त्यानें येऊन त्यांत आपलें तोंड पाहून जायला काय हरकत आहे? जसा पहाणारा असेल तसें त्याला त्याचें त्यांत प्रतिबिंब दिसेल! याचा प्रत्यय पहायला फार लांब जायला नको. आमच्या त्या माधवरावांनीं नाटकें बघितलीं आणि त्यांचे मेव्हणे ते यादवराव त्यांनींहि बघितलीं. पण एक स्वारी ही अशी उल्लू अन् दुसरी तशी घिम्मी! त्याचप्रमाणें माधवरावांची बायको नाटकाला जाते आणि मोहनाबाईहि जाते. पण दोघींच्यांत किती अंतर! हा इतका फरक कां असावा? त्या माधवरावांच्या उल्लूपणाचातर आतां अगदीं कळसच झाला! मला त्या नाटककंपनीकडे घेऊन जाऊन त्यांच्या मालकाला गांठून त्यांना दोनतीनशें रुपये द्यायचे ठरवून कालच्या नाटकांततर हे विक्रमाचें काम करून आले! कोण हा शोक! आणि ह्याचें काम पाहून ती मोहनाबाई यांच्यावर अगदीं मोहून गेल्यासारखी दिसते! कारण नाटकाहून परत येतांना तिनें मला माधवरावांच्या संबंधानें कितीतरी प्रश्नांवर प्रश्न विचारलेन्! हळूच हंसतहंसत मला काय ह्मणते 'काय हो मुकुंदराव, माझ्या मनांत घरच्या घरीं बायकांतल्याबायकांतच एक नाटक करायचं आहे; तुह्मी पोषाकबिषाक करून द्याल का?' हें ऐकून आपलीतर बुवा हंसतांहंसतां अगदीं मुरकुंडी वळली! मला हंसायला येऊं लागलें तेव्हां काय ह्मणते 'हंसायला काय

झालं इतकं? थट्टेनं नाहीं कांहीं ह्मटलं मीं! सोमवारीं सकाळीं मुंबईला जायचं झालं म्हणजे असे दुपारचे या तुह्मी, ह्मणजे सांगेन मी तुम्हांला काय काय करायचं तें!' काय सांगणार ही मला, कुणाला ठाऊक! पण हिचा अन् त्या माधवरावांचा दोघांचे स्वभाव सारखे उल्लू आणि रंगेले दिसतात. (दुरून वसंतराव येतोसें पाहून) हं, हे कोण बरें येताहेत पण! हे आमच्या मोहनाबाईचे यजमान वसंतराव! मोहनाबाई माहेरीं आल्यापासून बिचारा दर शनिवारीं आपला इथें ठेवलेला. बायको! बायको! बायको! काय हें बायकांचें इतकें वेड कीं काय कीं! यालाहि चांगला पगार आहे; सासवेजवळ यथास्थित डबोलें आहे; एकुलते एक जांवईबुवा; सासूहि ये म्हणते; येतो झालें. पण हा यायला आणि ती नाटकाला जायला एक गांठ! मागच्याच खेपेला यांची कांहीं बाचाबाची झाल्याचें मीं ऐकलें होतें. आणि कालहि जेव्हां ती नाटकाला गेल्याचें यानें ऐकिलें असेल तेव्हां मात्र स्वारी फार निराश आणि खिन्न झाली असेल! एकतर आपल्या बायकोनें नाटकाला जावें हें त्याला बिलकूल खपत नाहीं; दुसरें आपण आज येणार हें आगाऊ लिहून कळविलें असूनहि जेव्हां ती नाटकाला गेल्याचें त्यानें पाहिलें असेल तेव्हांतर त्याच्या अंगाचा तिळपापड होऊन गेला असेल अगदीं! पण करतो काय? सासवेकडे पाहून चप्प बसावें लागतें त्याला! आणि इकडे मोहनाबाईचातर एक बुधवार कीं शनिवारदेखील सुनका जात नाहीं! आपण जाते ती जाते, पण आपल्याबरोबर आपल्या घरच्या अन् दुसऱ्या शेजाऱ्यापाजाऱ्यांच्या मुलींनांहि घेऊन जाते! (वसंतराव अगदीं जवळ येतो त्यास पाहून) ओहोहो! कसें काय वसंतराव! काय मुंबईची खबर? कांहीं नवें जुनें!

**वसंतराव**—कांहीं नाहीं. आहे तसेंच आहे.

**मुकुंदराव**—गोविंदराव, यशवंतराव सारे खुशाल?

**वसंतराव**—सारे खुशाल! काल तुह्मी नाटकाला घेऊन गेलां होतां म्हणे साऱ्या मंडळीला?

**मुकुंदराव**—हो, गेलों होतों खरा. प्रेमाबाईच्या आग्रहास्तव जाणें भाग पडलें इतकेंच! साफ नाहीं ह्मणवेना. माझी प्रकृति ही अशी! कुणा लेकाला सोसतेंय जाग्रण? पण यांच्या इथें माझें जाणेंयेणें पडल्यामुळें यांचा शब्द मोडवत नाहीं. कालचें नाटक पाहूनतर मला असें वाटलें कीं, निदान असलीं नाटकेंतरी बायकांनां दाखवूं नयेत!

**वसंतराव**—असलींच काय? मी ह्मणतों मुळींच दाखवूं नयेत. अहो, लौकिकाकरितां म्हणून एक दाखिवलें तिथेंच चूक झाली ह्मणाना! आतां फार अनावर गोष्ट झाली आहे. आणि त्यांतून इथें असल्यामुळेंतर मला कांहीं बोलतांच येत नाहींसें झालें आहे!

**मुकुंदराव**—हो, हेंहि खरेंच! एकंदरींत सध्या तुह्मी मोठ्या चमत्कारिक स्थितींत सांपडलां आहांत ह्मणायचें.

**वसंतराव**.—अहो, तें कांहीं विचारूं नका! मी येणार ह्मणून पत्र घातलें असूनसुद्धां जर बेशक नाटकाला जायचें, तर कसचें काय अन् कसचें काय! यापुढें मी हिला ठेवित नाहीं इथें आतां फार दिवस! आणखी एक महिन्यानें येतों अन् घेऊन जातों हिला. तोंपर्यंत इथें पुण्याला आतां फिरकणारसुद्धां नाहीं.

**मुकुंदराव**—असें इतकें निकरावर नको यायला. मोहनाताईच्यासंबंधानें असें भलतेंसलतें आपल्या मनांत आणायला तुह्मांला कांहीं कारण नाहीं.

**वसंतराव**—मग मीतरी तसें कुठें काय ह्मणतों? पण हें वरचेवरवरचेवर नाटकाला जाणें मात्र आपल्याला बिलकूल पसंत नाहीं!

**मुकुंदराव**—आपल्यालासुद्धां नाहीं!

**वसंतराव**—आणि ह्मणून म्हणतों कीं, नाटकाला जायचें म्हटलें कीं तुम्ही कसातरी मोडा घालित जा. ह्मणजे लागेल मग सगळें नीट लागी.

**मुकुंदराव**—( एकीकडे ) नीट लागी लावतों! ( उघड ) हो हो, ठीक सुचिवलेंत. हें नव्हतें आलें माझ्या लक्ष्यांत! आतां त्याची नको तुह्मांला काळजी. यापुढें—मला वेळ नाहीं, आज मला अमुककडे जायचें आहे, उद्यां हें आहे, परवां तें आहे, तेरवां मी आजारीच आहें, माझें डोकेंच दुखतेंय, असा कांहींना कांहींतरी बहाणा करून नाटकाला जायचें करतों अगोदर बंद तुमच्या म्हणण्याप्रमाणें.

**वसंतराव**—एवढें केलेंत कीं माझें काम झालें.

**मुकुंदराव**—( एकीकडे ) तुमचेंच काम करतों! ( उघड ) त्याची नको आतां तुम्हांला काळजी!

**वसंतराव**—चला, जरा बाजारांत जाऊन येऊं. मला एक चंची, आणि कुठें जरदा, सुपारी, कातगोळ्या वगैरे किरकोळ सामान घ्यायचें आहे. तसेंच त्या यशवंतरावांनीं एक रेशमी पगडी सांगितली आहे. तुमच्याशिवाय नाहीं जमणार तें.

**मुकुंदराव**—मुंबईहून इथें यायचें ह्मणजे हा एक त्रासच असतो ह्मणायचा!

**वसंतराव**—अं:, त्रास कसला यांत! चार स्नेही आहेत आपले ह्मणून सांगतात् झालें. चला—ओ हो, हे कोण आले? निळकंठराव वाटतें. (पुढें जाऊन) कसें काय निळकंठराव! ठीक आहेना? आज कॉलेजला सुटी आहे ह्मणून गांवांत आलांत वाटतें? चला मुकुंदराव, आपण मिळूनच जाऊं सगळे बोलतबोलत.

[ जातो.

**मुकुंदराव**—चला, चला, मी एवढीं हीं पत्रें खांबांत टाकून आलोंच. (एकीकडे) वसंतराव! किती भोळसट आहेस रे तूं? अरे, नुसतीं नाटकें पाहून नाहीं आतां समाधान होत, तर आतां घरीं सुरू होणार आहेत नाटकें. खरेंच, एका आधुनिक कवीनें ह्मटलें आहेन् तें कांहीं खोटें नाहीं—

**सुख कुठुनी पतिला जगतीं नारी जरि स्वेच्छें वर्तती—**

[ गुंगत जातो.

---

## प्रवेश ३ रा.

[**स्थल**—मुकुंदरावाचें घर. भिकंभट व राधाबाई बोलत आहेत असा प्रवेश.]

**राधाबाई**—एकून इतक्या रात्रीं तुह्मी आंब मागायला आलांत तर?

**भिकंभट**—हो, न येऊन काय करूं? पोटांत दुखायला लागून अगदीं गडबडां लोळायला लागली तेव्हां येणें भागच पडलें. (बदलून) मुकुंदराव कुठें आहेत? अजून नाहीं आले? किती रात्र करायची बुवा घरीं यायला माणसांनीं?

**राधाबाई**—रात्र? अहो हें रोजचंच आहे! एकेक रात्र वाट पहातपहात मीं अशी जागून काढतें. सबंध रात्रची रात्र डोळ्याला डोळादिखील लागत नाहीं!

**भिकंभट**—नाहींतर डोळ्यालाडोळा कधीं लागतो आहे कुणाचा! परमेश्वराची योजनाच नाहीं दिसत तशी!

**राधाबाई**—तुह्मींतरी गडे फार थट्टेखोर आहांत! आणि म्हणूनच ह्मणतें—मग झोंप कुठची? त्या सत्यभामाबाईच्या तोंडून मीं एक सुरेखसं गाणं ऐकलं आहे, त्याची आठवण होते मला मी एकटी असलें ह्मणजे.

**भिकंभट**—कोणचें बरें गाणें तें?

**राधाबाई**—

**सुख कुठुनी स्त्रींनां जगतीं?**
**कांत जरी निजकांता त्यजिती. ।ध्रु०।**

**त्यजुनि स्वकिय रुचिर सदन सतत फिरति जरी. ॥ १ ॥ सुख० ॥**
**विनयवती युवति त्यजुन वारयुवतिचरण चुरिति तरी. ॥ २ ॥ सुख० ॥**
**दिवसरजनि सकल काल परसदनिं क्रमिति तरी. ॥ ३ ॥ सुख० ॥**
**कधिं काळींही शब्द सुखाचा एकहि नच वदति तरी. ॥ ४ ॥ सुख० ॥**

( इतक्यांत मुकुंदराव येतो. )

**मुकुंदराव**—वाः! एकून माझ्या इथेंसुद्धां हें संगीत सुरू आहे तर! (पुढें येऊन) कां! गाणीं आणि बजावणीं चाललीं आहेत वाटतें? खूप चाललाय रंग! (स्त्रीस) चल, जा त्याचा हात धरून त्याच्या मागोमाग. निर्लज्ज! बेशरम नाहींतर—

**भिकंभट**—मुकुंदराव, काय हें? आमच्या घरांत तिचें पोट दुखूं लागलें ह्मणून तुमच्या इथें मी आंब मागायला ह्मणून आलों—

**मुकुंदराव**—आंब मागायला ह्मणून आलांत तों इथें ही अंबा प्रसन्न झाली, आणि आयताच रंगहि पण करायाला मिळाला, असेंच कीं नाहीं? (स्त्रीस) वाः! वरती कांगावा करून रडतेस आणखी?

**राधाबाई**—ही पाहिली का पण आंबेची तांबली, अजून दादरासुद्धां बांधून नाहीं ठेवली.

**मुकुंदराव**—अस्सें! एकून दादऱ्याचा ताल आणि तुझा बेताल होता, अन् आंब देतांदेतांच आंबेवर गाणें ह्मणून दाखविलेंस वाटतें?—हंऽऽऽऽ! पण हा वेताळ आहे, याच्याशीं नाहीं अशी लुच्चेगिरी चालायची. मी अगदीं भोळसट, दुधखुळा आहें असें समजतेस वाटतें? काय पण अगदीं प्रेमांत आली होतीस! काय ह्मणे—**सुख कुठुनी स्त्रींनां जगतीं**? चल, चालती हो इथून—

**भिकंभट**—अहो—

**मुकुंदराव**—(वेडावून) ॲहो!

**भिकंभट**—वेडावा, वेडावा! पण मी म्हणतों तें ऐकातर खरें. त्या ह्या नाहींत का आपल्या—

**मुकुंदराव**—हं, आतां कां बोबडी वळली? खोटीनाटी कांहीं जुळवाजुळव करायची असली म्हणजे—त्या ह्या नाहींत का अन् ह्या त्या नाहींत का, असेंच व्हायचें!

**भिकंभट**—अहो, त्या अन्नपूर्णाबाईची सून—ती सत्यभामा नाहीं का! तिच्या तोंडचें ऐकलेंन आणि मातक्यान तेंच ध्यानांत धरून—

**मुकुंदराव**—ह्या अशा अपरात्रीं तुह्मांला आंब द्यायच्या बहाण्यानें बोलावून तुमच्या गळ्यांत हात टाकून हावभावासकट तुम्हांला म्हणून दाखिवलें, असेंच कीं नाहीं!

**राधाबाई**—शिव! शिव! तें गाणं ह्मणायची कुठली बाई मला बुद्धि झाली तरी!

**मुकुंदराव**—का, तुह्मी हिला ऋषिपंचमीची कथा सांगायला आलां होतां पोथी घेऊन? आंब, पुराण अन् पोथी—सगळीं सोंगें कळतात मला! रात्र होती ह्मणून आंबेची बतावणी! दिवस असता तर पांडवप्रतापाची पोथी उघडून ठेविली असतीत! दिवसाचा प्रताप निराळा आणि रात्रीचा निराळा!

**भिकंभट**—मुकुंदराव, नमस्कार असो तुमच्या या विलक्षण संशयखोर स्वभावाला! राधाबाईंनां मी आपल्या बहिणीप्रमाणें लेखतों आणि तुह्मी असले कुत्सित विचार—

**मुकुंदराव**—अहो 'बहीण बहीण' ह्मणूनचतर तुमच्यासारख्यांनां आपलें घोडें पुढें ढकलतां येतें! कुणी 'बहीण,' कुणी 'वहिनी,' कुणी 'काकू' असें ह्मणतह्मणतच आपले डाव साधित असतात! चला, चालते व्हा माझ्या इथून मुकाट्यानें, नाहींतर बत्तीशी घ्याल रंगवून फुकट.

**भिकंभट**—असें असेल तर यापुढें पाऊल नाहीं टाकणार आपल्या इथें! आपल्या इथें आंब मागायला आलों हीच चूक झाली आमची! माफ करा एक वेळ. पाहिजे तर आपल्यापुढें साष्टांग दंडवत घालतों. (तसें करितो व तोंडांत मारून घेतो.) आजपासून कानाला खडा लावून घेतला! यापुढें पाऊल नाहीं टाकणार आपल्या इथें!

[जातो.

**मुकुंदराव**—(स्त्रीस) रड रड! असें रडरडून आणखी कुणाची वाट लावणार आहेस कुणास ठाऊक! एक आमच्या मेव्हण्यांनां घालिवलेंस! राहती एक माझी बहीण घरांत होती तिच्याबरोबर भांडून तिला घरांतून काढवायला लावलेंस! आतां येऊनजाऊन मला काढायचें उरलेंय, असेंच कीं नाहीं? खरेंच—

**सुख कुठुनी पतिंनां जगतीं,**
**नारी जरी स्वेच्छें वर्तती, तरि. । ध्रु० ।**
**विनय त्यजुनि हृदयिं धरिति कुमति सुदति, तरी. ॥१॥ सुख०॥**
**सुपथ त्यजुन कुलिन कुलहि मलिन करिति तरी. ॥२॥ सुख०॥**

**प्रिय पतिपद करुनि दूर,**
**जरि परकीय पुरुषचरण चुरिति युवति तरी. ॥ ३ ॥**
**सुख कुठुनी पतिनां जगतीं,**
**नारी जरी स्वेच्छें वर्तती तरि. ॥**

**राधाबाई**—संशयी मनाला कांहीं नसतांनासुद्धां संशय हा यायचाच! हा संशय—

[चाल—सुचिन्ह हें नच.]

**कृतांत कालचि गमे अनावर,**
**संशय जरि हा ग्रासी अंतर,**
**अंतचि करिल करील ! । ध्रु० ।**
**ऐकवि श्रुतिसहि भलतेंसलतें,**
**दृष्टिस फसवी वरी। जगांतक. ॥ १ ॥ कृतांत० ॥**
**दृष्टिस श्रुतिसहि च्युत करि खल हा,**
**अंध बधिर तो करी । जगांतक. ॥ २ ॥ कृतांत० ॥**
**संशय विष हें मानसामृता**
**कालकूटची करी । जगांतक ! ॥ ३ ॥ कृतांत० ॥**
**कृतांत कालचि गमे अनावर!**

हा असा संशय घ्यायचातरी किती आणि कुठवर? मी ह्मणतें, याचं खरं अन् खोटंच जर पाह्यचं असेल तर भिकंभटांच्या मागोमाग जाऊन त्यांची बायको पोटदुखीनं विव्हळत पडली आहे का नाहीं तेंतरी तेवढं पाहून यावं—

**मुकुंदराव**—अस्सें! आणखी दुसरें कुणी यायचें आहे वाटतें?

**राधाबाई**—(स्वगत) देवा! नको नको जल्म हा! हें असलं ऐकायला दिखील नको मला! (जातां जातां) एक अक्षरदिखील तोंडांतून काढीन म्हटलं तरीसुद्धां बोलीं नाहीं! राधे, वाट कसली बघतेस आतां? जा, घे कुठलीतरी विहीर आपलीशी करून, ह्मणजे चुकशील ह्या एका जल्माच्या तरी त्रासांतून! कसलं जिणं हें तुझं! हो, मनाचा थडाच केला पाहिजे!

[जाऊं लागते.

**मुकुंदराव**—(विचारांत गुंग असा) अथवा ही ह्मणते असेंहि असेल कदाचित्! अग ए, चाललीस कुठें? हें पहा, तुझ्या ह्मणण्याप्रमाणें मी भिकंभटजीच्या घरीं जाऊन पाहून येतों. तोंपर्यंत इथून ह्या खोलींतून हालूं नकोस.

(जातो व पुनः परत येऊन कडी घालतो.) छत् नुसती कडी घालून नाहीं उपयोगीं, कुलूपच ठोकलें पाहिजे. (कुलूप लावतो.) आतां नाहीं कसली भीति.

[चाल—प्रधानाच्या घरीं जातो.]

**भटाच्या त्या घरीं जातों। खरें आहे काय बघतों।**

आणखी जर—

**अन्यथा तें दिसे कांहीं। सूड घेतों स्त्रियेचाही. ॥ १ ॥**

[जातो.

---

## प्रवेश ४ था.

[स्थल—मोहनाबाईचें घर. मोहनाबाई आपल्या खोलींत खुर्चीवर बसली आहे असा प्रवेश.]

**मोहना**—(स्वगत) मुकुंदराव म्हणत होता कीं, परवांच्या नाटकांत जें विक्रमाचं काम केलं तें त्या माधवरावांनीं! ते नुसतं नाटक पाह्यला आले होते तेव्हां त्यांनां मीं पाहिलं होतं त्याच्यामधें अन् नाटकांत सोंग घेऊन आल्यानंतर जेव्हां पाहिलं त्याच्यामधें कितीतरी अंतर! सोंग घेतलं ह्मणजे कसलंय मनुष्य चांगलं दिसतं. मग माधवरावांसारख्या सुंदर राजबिंड्यांनीं जर सोंग घेतलं तर ते कां नाहीं जास्त सुंदर दिसणार? मी तर—

[चाल—त्या मदनमनोरम रूपीं.]

**देखुनियां सुंदर नट ते, हृदयांतरिं दंगुनि गेलें!**
**मधुरशा कंठरवांनीं, भानचि तें हरुनी नेलें!**
**अभिनय ते बघुनी त्यांचे वेडिच कीं जशि मी बनलें!**
**येउं नये तें मनिं आलें अंतरिं किति गडबडलें—**
**शयनीं जरि, सोंग तें येई, झोंप नच पाहीं!**
**वेडि अशि बनलें, कां कुणीं मज चेटुक केलें!॥१॥ देखु०॥**

(इतक्यांत मुकुंदराव येऊन आड उभा राहतो.)

हां: (हातानें टाळी वाजवून) मी नाटक पाहून आल्यानंतर त्यांनां पाठिवण्याकरितां हें पत्र लिहून ठेवलं आहे. हें जर त्यांनां पाठिवलं तर ते येतील का इथं? मीं हें लिहून ठेवलं आहे, पण बाई, हें त्यांनां पाठवायला धीर होत नाहीं मला. (पत्र काढून) पण टपालांतून मी म्हणतें पाठवायला काय हरकत आहे? खरे रसिक असतील तर उत्तरतरी खचीत पाठवतील.

**मुकुंदराव**—(स्वगत) हिचें हें भाषण सारें माधवरावांनांच तर अनुलक्षून नाहीं? त्यांनीं परवां जें विक्रमाचें काम केलें त्यामुळें ही वेडावून गेल्यासारखी दिसते आहे! ठीक आहे. असेंच असेल. त्या माधवरावांनां एक हातीं धरलंच आहे! आणखी हें एक पात्र हातीं धरलें कीं आपलें जन्माचें कोटकल्याण झालें ह्मणून समजावें. (ओंठ चावून) युक्तीनें दोघांनांहि एकीकडे आणलें कीं मग यांच्याकडून पैसे काढायला किती उशीर! आपण नुसती सुरतीशीं गांठ ठेवली पाहिजे!

**मोहना**—परवांचं नाटक पाहिल्यापासून, अन् सत्यभामेनं साहेबलोकांत घरच्याघरींच नाटकं करतात ह्मणून सांगितल्यापासून, माझ्या मनानंतर असं घेतलंय कीं:—

**जमुनि युवतियुवती**
**करुं नाटककृति अभिनव रीति;**
**मधुरा कृति अति, वेधिल जनमति,**
**अशि नाटककृति करुं. ॥ १ ॥ जमुनि० ॥**
**वृंदावनिं जी गिरिधर करि कृति,**
**अथवा करित विलास मदनरति,**
**गुंफुनि तें या नव चरितीं**
**करुं नाटककृति अभिनव ती. ॥ २ ॥ जमुनि० ॥**

**मुकुंदराव**—(पुढें होऊन) मोहनाताई, हा पहा तुमच्या सांगण्याप्रमाणें मी आलों. काय, आपल्याआपल्याशींच काय गुणगुणत होतां?

**मोहना**—हो, आलांत बरं झालं. माझ्या मनांत किनई—

**जमुनि युवतियुवती**
**करुं नाटककृति अभिनव ती**

असं आहे. तर यांत तुह्मी मदत कराल का मला?

**मुकुंदराव**—हो, न करायला काय झालें? अलबत् करीन. पण माझ्याकडून ती काय होणार मदत?

**मोहना**—अहो, काय ह्मणजे काय? अहो त्या माधवरावांनां (जीभ चावते व बोलणें फिरवून)

**मुकुंदराव**—(मध्येंच) काय! माधवरावांनां आणायचें म्हटलेंत? मोहनाताई, काय, ह्मणतां काय तुम्हीं हें?

**मोहना**—छेः बाई, त्यांनां आणायचं ह्मणून कधीं कुणीं ह्मटलं? ह्मटलं—त्यांचा अन् तुमचा स्नेह आहे. तेव्हां त्यांच्यामार्फत त्या नाटकवाल्या मंडळीकडून जर कांहीं पडदेविडदे आणतां येतील तुह्मांला—

**मुकुंदराव**—(स्वगत) काय पण एकदम बदलली ही! (उघड) तें त्यांनांच विचारलें पाहिजे. अन् मीं जर त्यांनां त्याबद्दल विचारलें तर अर्थातच ते मला विचारतील कीं, तुह्मांला कशाला पडदे पाहिजेत?

**मोहना**—होय बाई! हेंहि खरंच. मग नकोचतर तें!

**मुकुंदराव**—पण, दुसरें एक संधान आहे. माधवरावांच्या इथें निरी ह्मणून एक कुळंबीण आहे. तिचा भाऊ त्या नाटकमंडळींत असतो पडदे रंगवायला. तेव्हां ते जर मिळाले तर त्याच्यामार्फत मिळतील कदाचित्.

**मोहना**—मग पहा तसे मिळवितां आले तर.

**मुकुंदराव**—पहातों खटपट करून. नाहींतर त्यालाच इथें बोलावून आणून नवेच रंगवून घेतले तर? (स्वगत) ह्मणजे त्यांतल्यात्यांत चार पैसे सांपडतील टाकायला खिशांत, आणि कामांत काम आणि रामांत राम!

**मोहना**—हो गडे, तेंहि खरंच! पण याशिवाय दुसरे कपडेबिपडेहि कांहीं लागतील, आणि त्याशिवाय दुसरंहि कांहीं सामान लागेल. किती एक का दोन गोष्टी म्हणून सांगूं? म्हणून म्हणतें, सगळ्या परीनं मला तुमची मदत पाहिजे! कांहींकांहीं कपडेतर मीं घरींच तयार केले आहेत शिवून. चला, तुम्हांला दाखिवतें. अन् कांहींतर विकतच घेतले पाहिजेत.

**मुकुंदराव**—पण मी म्हणतों, तुम्ही जें नाटक करणार म्हणतां तें कोणचं? त्याचा काय भाग आहे तेंतर सांगा अगोदर, म्हणजे त्यांत कसलीं पात्रें येणार आणि त्यांनां कपडे कोणचे लागणार हें नक्की ठरवितां येईल.

**मोहना**—(हंसून) अहो, तें सगळं ठरवून टाकलंय मीं!

**मुकुंदराव**—काय ठरिवलें आहे? अगोदर नाटक कोणचें? सौभद्र, का विक्रमशशिकला, का आणखी दुसरें कोणचें?

**मोहना**—त्यांपैकीं कोणतंच नाहीं. अगदीं नवंच नाटक आहे तें.

**मुकुंदराव**—नवं आहे? कुणीं केलंय तें?

**मोहना**—माझा मावसभाऊ कृष्णा—निळूचा थोरला भाऊ नव्हता का इथं कालेजांत, त्यानं केलंय तें.

**मुकुंदराव**—म्हणजे कालेजांत असतांना नदींत पोहायला गेला होता अन् तिथें बुडून मेला तोच कीं नाहीं?

**मोहना**—हो तो तोच! त्या नाटकाच्या पायांत त्याचं अन् निळूचं कोण भांडण! तें त्यानं लिहिलंन् तेव्हां मला वाचून दाखविलंन्; पण तें कांहीं निळूला मुळींसुद्धां आवडलं नाहीं. त्याचं ह्मणणं कीं, असलीं पुस्तकं बायकांनां वाचून दिखील दाखवूं नयेत.

**मुकुंदराव**—असें काय आहे काय त्या नाटकांत? कथाभागतरी काय आहे त्याचा? अन् नांव काय अगोदर त्याचें?

**मोहना**—त्याचं नांव 'राधाभुजंग अथवा सत्यभामाप्रकोप.' त्यांतला कथाभाग असा आहे:—नारदांनीं कळ लावल्यामुळं सत्यभामा आणि राधा—दोघीजणी कृष्णाची प्रीति आपल्यावर जास्तो ह्मणून भांडत बसल्या. इतक्यांत कृष्णाची स्वारी आली. दोघींनां एकीकडे पाहून कृष्णाला पंचाईत पडली कीं एकीवर प्रेम दाखिवलं तर दुसरीला राग येणार! त्या वेळीं त्यानं युक्ती केलीन्—

**मुकुंदराव**—हं हं हं हं! नाटकाचा भागतर फारच गमतीदार दिसतो बुवा! अन् त्यांतल्यात्यांत पौराणिक आहे. बरें, पण यांत पात्रें किती आहेत?

**मोहना**—पात्रं काय, जितकीं मिळतील तितकीं हवींच! कारण त्यांतल्या एका प्रवेशांत गोपीच पुष्कळ हव्या आहेत! बाकी पांचसात पात्रं झालीं ह्मणजे झालं! मुख्य कामं ह्मटलीं ह्मणजे कृष्णाचं, सत्यभामेचं, राधेचं अन् नारदाचं. शिवाय पेंद्या अन् जयंती हींहि हवींतच. बाकी गोपगोपी मिळतील त्याप्रमाणं.

**मुकुंदराव**—मग कुणींकुणीं कायकाय कामें करायचीं ठरिवलें आहे? कृष्णाचें कोण करणार? राधेचें कोण करणार? आणि सत्यभामेचें कोण करणार?

**मोहना**—तीचतर जरा पंचाईत आहे अजुनी!

**मुकुंदराव**—(एकीकडे) हं! इथें आतां जरा खुबीच केली पाहिजे. (उघड) पंचाईत ती कसली?

**मोहना**—लहान मुली आहेतच गोपींच्या कामाला. सत्यभामेचं काम आपल्या ला शेजारच्या सत्यभामाबाईच्या मनांत करायचं आहे.

**मुकुंदराव**—ह्मणजे गोविंदरावांचें कुटुंब कीं काय?

**मोहना**—हो. पण तिला सांगेन मी राधेचं करायला. कारण माझ्या मनांतून करायचं आहे सत्यभामेचं, नाहींतर कृष्णाचं! चंद्राबाई करील राधेचं. पण ती आहे अंमळ आजारी. ती येईल कीं नाहीं काय कीं. अन् नाहीं आली तर मग राधेचं

अथवा सत्यभामेचं काम मला करावं लागेल. पैकीं कृष्णाचं मीं केलं तर त्यांच्या-पैकीं एकीचं कुणींतरी दुसरीनं केलं पाहिजे.

**मुकुंदराव**—बरें, पण मीं केलें एखादें, तर चालेल का?

**मोहना**—छेः बाई! मुकुंदराव, हें काय हो तरी तुमचं विचारणं? सगळ्या बायकाबायकांचंच नाटक करायचं ह्मणून सांगितलंना तुह्मांला? (स्वगत) अथवा आतां जरा गंमतच करतें यांची! (उघड विनोदानें) बरं, पण हें पहा, मी जर कृष्ण झालें तर तुह्मांला राधा व्हावं लागेल!

**मुकुंदराव**—मग माझें काय गेलें त्यांत?

**मोहना**—काय गेलं! गेलं ह्मणजे समजेल! (त्याचे मिशांकडे बोट दाखवून) हें जाईल ना मग?

**मुकुंदराव**—हो खरेंच! (हंसतो) तर मग मी कृष्ण झालेलें चालेल का?

**मोहना**—इश् बाई, हें काय मुकुंदराव! तुह्मी लाजिवतां गडे अशानं आह्मांला! हें पहा, आणखी एखादी बायकोच असली ह्मणजे लाज नाहीं वाटणार आह्मांला. तुह्मीं आपल्या कुटुंबाला कां द्याना धाडून. त्यांचाहि गळा कांहीं वाईट नाहीं.

**मुकुंदराव**—मी पाठवीन ह्मणा, पण तिला हें रुचायचें नाहीं! तिला गव्हले नाहींतर वाती करित बसण्यापलीकडे कांहीं यायचें नाहीं. (स्वगत) हिला स्त्रीच पाहिजे काय! तर आतां द्यावी हिला एक गप्प झोंकून, अन् माधवरावांचा प्रवेश द्यावा करून इथें.

**मोहना**—असं असलं तर मग काय?

**मुकुंदराव**—पण हें पहा, ते माधवराव नाहींत का?

**मोहना**—हो, ते माधवराव इनामदार कीं नाहीं? आहेत. मग त्यांचं काय?

**मुकुंदराव**—(हंसून) 'त्यांचं काय?' तेच तेच—त्यांची एक बहीण आहे. माधवरावांनां गाण्याचा नाद असल्यामुळें तिलाहि येतें आहे थोडेंबहुत. तिचा आवाजहि गोड आहे. तिला नाटकें वाचायचा फार नाद आहे. इथें आल्यापासून इथल्या लायब्ररींतलीं बहुतेक सगळीं नाटकांचीं बुकें तिनें ने नेऊन वाचून टाकलीं आहेत.

**मोहना**—(साश्चर्य) खरंच का? बरं, मग—त्या कशानं येणार आमच्या इथं? तुह्मींच कांहीं खटपट केलीत तर काय की? तुम्ही कराल का कांहीं खटपट त्यांनां इथं घेऊन यायची?

**मुकुंदराव**—हो हो, पाहीन विचारून त्यांनां.

**मोहना**—नुसतं 'पाहीन विचारून' ह्मणण्यांत काय अर्थ! त्यांनां खुबीनं विचारून इथं घेऊन आलांत तरच तुमची करामत. (स्वगत) असं झालं तर आणखी काय पाहिजे मग? त्यांची माझी ओळख होऊन आमचा स्नेह जमला आणि तसा घरोबा पडला ह्मणजे मलाहि पण जायला सांपडेल त्यांच्या इथं!

**मुकुंदराव**—करामत काय ह्मणा. पण माझ्या हातून होईल तेवढी खटपट मी करून पहातों.

**मोहना**—बरं, पण त्या आहेत केवढ्याशा?

**मुकुंदराव**—बहुतेक तुमच्याच वयाच्या येतील. पण उंचीला मात्र तुमच्याहून दोनचार बोटं जास्त येतील.

**मोहना**—ह्मणजे! एकून तुमच्या मनांतून मीं कृष्ण होऊं नये असं आहे तर-बरं, पण दिसण्यांत कशा आहेत त्या? माधवरावांत आणि त्यांच्यांत कांहीं साम्य?

**मुकुंदराव**—दोघां भावाबहिणींचा तोंडवळा एक, आवाजी एक, बोलणें एक. सगळें बहुतेक सारखें. दोघे भाऊ असते तर एकाला झांकावा अन् दुसऱ्याला काढावा! 'भ्रांतिकृत चमत्कारां'त ते दोन धर्म्या शृंगारपूरकर आणि धर्म्या सारंगपूरकर नाहींत का, त्यांतला प्रकार उडता अगदीं.

**मोहना**—अग बाई! इतकीं का दोघं एकसारखीं आहेत अगदीं! तर मग ती चांगलीच सुस्वरूप आहे ह्मणायची.

**मुकुंदराव**—हो, सुस्वरूप ह्मणजे?

**मोहना**—पण ती इथं येईल का?

**मुकुंदराव**—हो, न यायला काय झालं? तिला आहे नाटकाचा फार शोक. तेव्हां तिला आणायची व्यवस्था मी करीन सगळी; पण त्याबद्दल उगीच बभ्रा मात्र होऊं देऊन नाहीं उपयोगी. ह्या कानाची गोष्ट त्या कानालादेखील कळतां कामा नये.

**मोहना**—त्याची जिम्मा माझ्याकडे लागली. मगतर झालं?

**मुकुंदराव**—असें असेल तर तिला आणण्याची जिम्मा माझ्याकडे लागली. मग तर झालें? बरें, पण तुह्मीं पडदे आणि पोषाख काय केले आहेत? तेतर दाखवा अगोदर पाहूं.

**मोहना**—थांबा; ही मी पुढच्या दालनाची किल्ली आंतून घेऊन येतें. (आंतून गाणें ऐकूं येत आहेसें पाहून) अगबाई, सत्यभामाबाई येऊन बसल्या वाटतं केव्हांच. हें पहा मुकुंदराव, आंत बायका जमल्या आहेत, तेव्हां आतां तुम्हांला उद्यां

सकाळीं तुह्मीं आलांत ह्मणजेच दाखवीन ते सारे. आत्तांच दाखिवलं असतं सगळं, पण तुह्मांला पाहून त्या लाजतील.

**मुकुंदराव**—बरें आहे. येतोंतर मी. [जाऊं लागतो.

**मोहना**—या. (स्वतांशीं गुणगुणते.)

[चाल—योग्य न वणिज.]

**होई अनुकूल जरि नटदेवी!**
**दुर्मिळ पात्रें कां न मिळावीं. । ध्रु० ।**
**सुंदर सुंदर पात्रें पाहुनि,**
**सहज मनाची वृत्ति फिरावी,**
**मधुर असे जरि कंठ पिकासम,**
**किति श्रोतृमनें तल्लिन व्हावीं! ॥ १ ॥**

(मोहना लगबगीनें आंत जात असतां तिचें पत्र पडतें.)

**मुकुंदराव**—(स्वगत) माझ्या अगदीं तोंडांत आलें होतें बोलायचें–कीं तुह्मी व्हा राधा अन् मी होतों कृष्ण. कारण मी मुकुंद आहेंच! मुकुंद राधे, मुकुंद राधे! राधा मुकुंद, राधा मुकुंद! किती गोड नांव दिसतें आहे हें! (पडलेलें पत्र पाहून उचलून घेऊन) हें पत्रतर उघड उघड माधवरावांनांच लिहिलेलें दिसतें आहे. (वाचून) एकून कमाल आहे या बायकांची! मी आलों तेव्हां ही जें ह्मणत होती तें माधवरावांनांच अनुलक्षून होतें तर! (दांतओंठ चावून) तर आतां माझी युक्ति अगदीं नेमकी लागू पडणार! हें पत्रतर माधवरावांनां पोंचिवतोंच; पण त्यांच्याकडून पुन्हा हें खुबीनें काढून घेतों. नुसत्या ह्या एका पत्रावर हजार दोन हजार रुपये सहज काढतां येतील. (खिशांत ठेवतो व हंसून) हः हः हः! त्या माधवरावाला वहीण वगैरे कांहीं नसतां हिला मीं जी ही थाप दिली ती आज आपल्या फायद्यावरच पडली ह्मणायची एकून!

**दिली सोळा आणे थाप, हातोहात, माझी बात सव्वा हात,**
**ही मोहनि हा माधव, फसुंदेत, हंसुंदेत, मिळुंदेत, रमुंदेत,**
**केलि कशी मजा!**
**केलि कशी मजा!!**
**केलि कशी मजा!!! ॥ १ ॥**

[जातो.

## प्रवेश ९ वा.

[ **स्थल**—मोहनाबाईचें घर. मोहना, सत्यभामा, यमू, इंदु इत्यादि बसल्या आहेत असा प्रवेश ]

**मोहना**—यमूताई, आणखी एकदा ह्मण गडे तें पद. लाजतेस कां अशी?

**सत्यभामा**—मी कुठं होतें तें ऐकायला? निळकंठराव येतील ह्मणून भीति वाटते इतकी होय? पण आज संध्याकाळीं व्याख्यान आहे ह्मणे कुणाचंसं, तें झाल्याशिवाय नाहीं यायचे ते. आणि म्हणून मीतरी इतकावेळ बसल्यें इथं. हं ह्मण ह्मण एक. तें महाश्वेतेनं काल ह्मटलंन तें–'**आधीं आलिंगन दे मजला.**' तें ह्मण. ही बघ मी तुझी सखी ह्मणून इथं उभी आहें—

**यमू**—ही बघ मी तुझी सखी ह्मणून उभी आहें! तूंच ह्मण अगोदर ह्मणजे मग मी ह्मणीन पाहिजे तर.

**मोहना**—( सत्यभामेस ) तुह्मी कां ह्मणाना.

**सत्यभामा**—माझ्याकडून कुठं हरकत आहे. ( यमूस बिलगून अभिनयासह ह्मणते )

**आधीं आलिंगन दे मजला**
**धरुं दे कवळुनि हृदयीं तुजला—**

**मोहना**—( स्वगत ) त्या माधवरावांचं तें विक्रमाचं काम पाहिल्यापासून काय माझ्या मनांत विचार येतात हे! आवाज किती गोड, प्रेमळ आणि मधुर! मला वाटतं, ते पुंडरीक होऊन मला जर असं ह्मणतील कीं ( उघड ) हें बघ, मी ह्मणतें हां आतां एक पद. तें पुंडरीकाच्या तोंडांतलं '**ये अशी**–' यमू तूं हो महाश्वेता.

**यमू**—मी नाहीं बाई!

**सत्यभामा**—मी होतें, मग तर झालं?

(सत्यभामा महाश्वेता झाल्यासारखें करिते व मोहना साभिनय ह्मणूं लागते )

**मोहना**—

**ये अशी, बैस मजसरशी, उगिच कां भीशी**
**नाहिं कुणी दुसरें!**
**दे सोडुनि अवघी शंका बिंबाधरे!**

**निळू**—( बाहेरून येऊन आड उभा राहून स्वगत ) ही गोविंदरावांची बायको नव्हे का! इथें पदें शिकायला येऊन हें स्त्रीशिक्षण चाललेंय वाटतें! कोण चावटपणा चालविलाय हा यांनीं?

**मोहना**—(यमूस) यमू, तूं ही अशी लाजते आहेस कां इतकी उगीच? अग, मी पुंडरीकासारखं अथवा चंद्रापीडासारखं बोलल्यानं का कुठं पुंडरीक आणि चंद्रापीड होत्यें आहें खरोखरी? वेडी नाहींतर! चल ये. कादंबरी नाटक तूं दोनतीनदा पाहिलं आहेस. त्यांतला तिसऱ्या अंकांतला आपण तो शेवटचा प्रवेश करूं! हंः—

**निळू**—(एकीकडे) इथपर्यंत गोष्ट आली तर! (ओंठ चावतो.)

**यमू**—मी नाहीं बाई!

**सत्यभामा**—अग, लाजायला काय झालं असं? मी आणि ह्या मोहनाताई नाहीं का आत्तां पुंडरीक अन् महाश्वेता झालों. तुझा गळाहि चांगला आहे, अन् कादंबरीचीं तीं पदंहि तुला पाठ येताहेत.

**निळू**—(एकीकडे) हिनें लाजबीज सोडून दिली नाहींन् तोंपर्यंतच हिला इशारत द्यावी हें बरें.

**मोहना**—हं चल. लाजूं नकोस अशी. सत्यभामा नाहीं का आत्तां महाश्वेता झाली. मग घटकाभर तुला कादंबरी व्हायला काय हरकत आहे? ही बघ मी चंद्रापीड झाल्यें—

**हे तन्वि! मदन हा शर मारी। मजशिं तारीं,**
**तूंचि कैवारी कैवारी। यातें निवारीं निवारीं,**
**होइन आभारी आभारी। मज दुःख देतसे भारी॥ हे तन्वि०॥**

( तिला आलिंगन देण्याचा प्रयत्न करीत )

तर हे प्राणसखे,—

**सत्यभामा**—(यमूस) 'हे प्राणसखे,' ह्मणून आलिंगन द्यायला असं पुढं सरसावल्याबरोबर—किंचित् दूर सरून 'हें काय हें! बाहेर अगदीं दुपार झाली आहे, अन् आतां हें काय भलतंच?' असं किंचित् लज्जायुक्त होऊन ह्मटलं पाहिजे. समजलीस?

**निळू**—(एकीकडे) सुरेख चालली आहे तालीम!

**यमू**—(मोहनेस व सत्यभामेस) हें काय बाई! कुणीतरी आलं तर काय ह्मणेल? जातें बाई मी इथून! (जाऊं लागते.)

**निळू**—(एकीकडे) एवढीतरी शरम आहे अजून!

**मोहना**—

लज्जापट त्यजुनि राहिं,
क्षणभरि तरि येथ पाहिं
अधरपानदान देईं—
थांब सुंदरी!

**सत्यभामा**—(यमूस) जा, जा. पण **आहे कुणितरि बोलत**—हें ह्मण अन् मग सगळ्याचजणी जाऊं आपण.

**यमू**—(लाजत लाजत साभिनय ह्मणते.)

आहे कुणितरी बोलत,
स्पष्ट शब्द ऐकुं येत,
मग कधिं पुरवीन हेत,
सोडिं मज आतां—

**निळू**—(एकीकडे) वाईट संगतीनें कोंवळ्या मनावर हे असेच संस्कार व्हायचे!

**मोहना**—उत्तम जुळलं; असंच! हा—

न नराचा हा शुकरव,
व्यर्थ होत भीती तव,
दे मजला अधरासव
थांब सुंदरी!

(यमूचे हनुवटीस हात लावते.)

**यमू**—(कावऱ्याबावऱ्या इकडेतिकडे पाहून) हें काय बाई!

वाटे पाउल वाजत,
कुणितरि इकडेच येत,
मग कधिं पुरवीन हेत,
सोडिं मज आतां—

**मोहना**—

व्यर्थ सखे! भास असुन
जाशि उगिच काय भिउन?
देईं मला आलिंगन,
थांब सुंदरी!

( साभिनय आलिंगन देऊन तिचें चुंबन घेते व त्यांच्यात्यांच्यांत हंशा पिकतो. )

**यमू**—(विनोदानें) हें काय बाई!

**मग कधि पुरवीन हेत**
**सोडिं मज आतां—**

**निळू**—(एकीकडे) किती विचकटपणा हा! हा माझ्या बायकोचा आवाज! हा गोड आहे, कर्णमधुर आहे, पण हीं असलीं नाटकांतलीं पदें म्हणून तो दूषित आणि भ्रष्ट झाला आहे! आपल्या बायका हीं असलीं नाटकांतलीं पदें नाटकांतल्यासारखे हावभाव करून म्हणताहेत हें पाहून कोणच्या नवऱ्यांनां संताप आणि त्वेष येऊन त्यांचीं डोकीं खवळून जाणार नाहींत? कोण बेशरम आणि बेतालपणा हा! वसंतराव मुंबईस, ही इथें एकटी, खुशाल नाटकें पहाते, दुसऱ्यांनांहि नेते, अन् त्याचे परिणाम हे असे–घरांत नाटकांचीं रिहर्सल्स!

**मोहना**—आतां आपल्या 'सत्यभामाप्रकोपा'चा कोरस म्हणूं आणि आटपूंच! चला या, अशा मिळून उभ्या राहूं. हें पहा, सगळ्या जणींचं एका सुरांत आलं पाहिजे, समजलांत?

[चाल–शंकरा! पामर हा नर.]

**श्रीधरा! उद्धर सत्वर जर्जर होत कृपागारा! ।ध्रु०।**
**भो अविनाशा! संसृतिपाशा, मद्‌मोहाशा, छिन्न करा,**
**नाना क्लेशा वारुनि, ईशा! निजपद्‌पाशा बद्ध करा;**
**जो परिहरिलचि जन्ममृत्युचा फेरा, रमावरा! ॥१॥ श्रीधरा०॥**
**गुणैकधामा, सुखविश्रामा, आत्मारामा हृदयिं धरा,**
**प्रिय हा 'भामा-प्रकोप' व्हावा मेघश्यामा शैलधरा!**
**न्या निजपदिं कृष्णा मंदा, परात्परा दिगंबरा! ॥२॥ श्रीधरा०॥**

**निळू**—(एकदम पुढें होऊन) ताई, काय चाललेंय?

**मोहना**—(चपापून) कोण तें? अण्णा! तूं का?

**निळू**—हो मीच! कां, तुम्ही अशा दचकलांतशा?

**मोहना**—नाहीं, मला वाटलं येणं झालं असेल बाजार करून!

**निळू**—(एकीकडे) अस्सें! (उघड) बरें, पण गाणें कसलें चाललें होतें?

**सत्यभामा**—(हळूच) मी येत्यें बाई.

**मोहना**—हो, या. यमू, कुंकू लाव त्यांनां. (त्या जातातसें पाहून निळूस) कांहीं नाहीं रे, आपलीं गाणीं ह्मणत होतों झालं.

**निळू**—गाणीं कीं नाटकांतलीं पदें? ताई, तूं आतांशा नाटकांनां फारफार जाऊं लागली आहेस हां! हें कांहीं चांगलें नाहीं!

**मोहना**—हो, पुरुषांनां वाटतं कीं बायकांनीं मेलं घराच्या बाहेर कुठंदिखील जाऊं नये, अन् पुरुषांनीं मात्र वाटेल तिथं जावं अन् वाटेल तें करावं. खरंच दादा, विक्रमशशिकला नाटकांत ती शशिकला ह्मणते तें कांहीं खोटं नाहीं!

**कपटाचे नर पुतळे, भूवरि असती सगळे!**
**कळकळ त्यां अबलांची येते का कधिं काळें?**
**कपटी नरजात खरी**
**सुख तरि या व्याघ्रकरीं**
**कोठुनियां स्त्रीस मिळे?**

कारण हे नरव्याघ्रः—

**चरचर चिरितात गळे!**

**निळू**—हं! एकून नाटकांतल्या पदांनीं उत्तरें देऊं लागलीस! ताई, हें कांहीं चांगलें नव्हे एकंदरींत आपल्या लौकिकाला. एकामुळें—

**मोहना**—अण्णा, अरे तुझ्याजवळ ह्मणूनच जरा विनोद केला. दुसऱ्या परक्या लोकांच्याजवळ कोण करील बाई असा!

**निळू**—बरें, तें झांशीच्या राणीचें चरित्र वाचून झालेंय का? झालें असलें तर तें परत करणार आहें मी.

**मोहना**—हो, आमचं दोघींचंहि वाचून झालं तें. यमू, माझ्या खोलींतल्या टेबलावर तें झांशीच्या राणीचं चरित्र आहे तें आण पाहूं.

(इतक्यांत वसंतराव येतो.)

**निळू**—(वसंतरावास पाहून) काय, झाला बाजार?

**वसंतराव**—हो, तुह्मी कुठें बाहेर निघालांत कीं काय?

**निळू**—हो, मी अंमळ लायब्ररींत जाऊन येणार आहें.

**वसंतराव**—मलाहि यायचें आहे त्याच बाजूला. तुम्ही लायब्ररींतच आहांना? मला जरा काल्चा टाईम्स पाहिजे आहे. मुकुंदराव येतों ह्मणाले आहेत इतक्यांत. ते अन् मी मिळून येऊं.

**मोहना**—(यमू पुस्तक देते तें घेऊन) अण्णा, हें घे पुस्तक.

**निळू**—(वसंतरावास) होतोंतर मी पुढें.

**वसंतराव**—व्हा पुढें. मी हा आलोंच पांचदहा मिनिटांत.

[यमू घरांत व निळू बाहेर जातात.

**मोहना**—(वसंतरावास) केवढं बाईतरी हें पागोटं अन् दिसतंय पण कसंसंच! मी ह्मणल्यें, मेलं शंभरदा पुण्याला यायचं होतं, एखादी पगडी घेतली तर काय होईल! पुणेरी पगडी, पुणेरी पगडी म्हणून नाहीं नाहीं तिथून लोक पगड्या मागिवतात—

**वसंतराव**—पुणेरी पगडी! आपल्या घराण्यांत चाल नाहीं ती कशाला घाला उगीच! आणि शिवाय कधीं नाहीं ती घातली तर लोक छचोर ह्मणून टवाळ्याहिं करायला सोडायचे नाहींत.

**मोहना**—लोकांनां काय मेल्यांनां! आपण आपल्या पदरचे पैसे खर्च करून हौस करणार त्यांत लोकांचं काय जातं? त्यांनां काय हंसायला!

**वसंतराव**—हें बघ, लोकांच्या हंसण्याकडे कोण लक्ष्य देतो म्हणा; पण आपली रीत आपण सोडणें चांगलें नव्हे. आणि त्यांतून आपल्यासारख्या घरंदाजांनींतर—(इतक्यांत वसंतराव ह्मणून मुकुंदराव हांक मारतो त्यास) आलों हो आलों. (मोहनेस) हें सगळें सामान माझ्या थैल्यामध्यें भरून ठेव. मी तासाभऱ्यांत येतों परत.

**मोहना**—थैल्यांत! पण मी ह्मणल्यें, एखादी ट्रंक नाहींतर सुरेखशी एखादी चामड्याची पेटी विकत घेतली तर काय होईल?

**वसंतराव**—काय व्हायचें आहे? मग ह्या पागोट्याला आणि धोतराला रजा द्यावी लागेल!

**मोहना**—मग त्यांत वाईट तें काय?

**वसंतराव**—अशानेंच तर सगळें बिघडलें आहे. यासंबंधानें व्यर्थ तुझ्याशीं बोलण्यांत अर्थ नाहीं.

[जातो.

**मोहना**—(स्वगत) कसली ह्मणून मेली हौस नाहीं मुळींदिखील! आणि अशाशीं जल्माची गांठ पडल्यावर—

[चाल—गांजितां मला कां नाथा!]

कोठुनी सुखाची आशा?
लग्नें जरि हीं विजोड होती!
छेदिती सुखाच्या पाशा. ।ध्रु०।
दयितेच्छा जरि पति नच पुरविती
मग कोठें । स्थिरवावें । विश्वासा? ॥ ॥ १ ॥ कोठुनी०
सुंदर वसनें पतिनीं ल्यावीं ।
विनवितसें । परि होते । मोघाशा. ॥ २ ॥ कोठुनी० ॥
हौस मनाची पुरत नसे जरि,
सेवावी । काय तरी । दुःखदशा. ॥ ३ ॥ कोठुनी० ॥
कीं, कंटाळुनि या संसारा
लावावें । निजकंठीं । गळफांसा! ॥ ४ ॥ कोठुनी० ॥
[जाते.

---

## प्रवेश ६ वा.

[स्थल—माधवरावाचें घर. माधवराव व
मुकुंदराव बोलत आहेत असा प्रवेश.]

**मुकुंदराव**—तुह्मीं नाटकांत विक्रमाचें काम केल्याबद्दल तुमचे मेव्हणे सगळ्या गांवभर सांगत सुटले आहेत! तुमच्या नालस्त्या करण्याशिवाय त्यांनां दुसरेंतिसरें कांहीं दिसत नाहींसें झालें आहे सध्या!

**माधवराव**—काय? खुद्द माझ्या मेव्हण्याकडून माझ्या नालस्त्या!

**मुकुंदराव**—नुसत्या नालस्त्याच काय पण तुह्मी दारू पितां ह्मणूनदेखील त्यांनीं उठवायला कमी केलें नाहीं!

**माधवराव**—एकून इथपर्यंत मजल पोंचली तर! ठीक आहे तर, यापुढें त्यांचा आमचा संबंधच उरला नाहीं!

**मुकुंदराव**—रावसाहेब, तुह्मीं ते पोषाख करिवलेत त्या दिवसापासूनच त्यांनां तुमचा खर्चिकपणा पहावेनासा झाला आहे. हें मीं तेव्हांच ताडलें.

**माधवराव**—मी आपल्या पदरचे पैसे खर्च करून आपली हौस करणार, मग दुसऱ्यांचे कां उगीच डोळे फुटतात? त्याच्या अथवा त्याच्या बापाच्या पदरचें तर कांहीं मी वेंचित नाहींना?

**मुकुंदराव**—अहो, परवां आपण ती बायसिकल घेतलीत, तें पाहूनतर त्यांच्या पायाची आग अगदीं मस्तकाला जाऊन पोंचली आहे. अन् तुमच्या बायसिकलवर मीं बसलेलें तर त्यांनां अगदीं विषतुल्य वाटतें!

**माधवराव**—हं:, क्षुद्रबुद्धीच्या लोकांनां असेंच वाटायचें!

**मुकुंदराव**—बरें, मग आज संध्याकाळीं बंडवर जायचें ना ती रिचर्डसनबाई विमान उडवणार आहे तें पाह्यला?

**माधवराव**—हो हो, तें ठरलेंच आहे आपलें.

**मुकुंदराव**—मीं गोंद्याला चार साडेचारांला फैटण घेऊन यायला सांगितलें आहे. जातों तर मी (जावयास लागतो पण पुनः परत येऊन) पण तें पत्र मात्र नीट ठेवा. परत पाहिजे आहे तें मालकांनां. तुह्मीं लिहिलेलें उत्तर टपालांतूनच जाऊं दे. मीं सांगितल्याप्रमाणें पत्ता लिहा ह्मणजे झालें.

**माधवराव**—ठीक आहे.

**मुकुंदराव**—येतों तर मी. [ जातो.

**माधवराव**—(पत्र काढून वाचतो. इतक्यांत निरी येऊन आड उभी राहून ऐकते.) 'आपली प्रेमाभिलाषी मोहना' किती गोड शब्द हे!

**निरी**—(स्वगत) ही म्हैाणा कुटली गाड पडलीया?

**माधवराव**—ती स्वरूपानें खुपसुरत आहे ह्मणून हा मुकुंदराव सांगतो अन् तिच्या ह्या पत्रावरूनतर ती मोठी रसिक आणि चतुर असावी असें स्पष्ट दिसतें. (पत्राकडे पाहून) माझें विक्रमाचें काम पाहून ही इतकी मोहून जाते, आणि प्रत्यक्ष माझी स्त्री मी नाटकाला चल चल म्हणत असतांनादेखील येत नाहीं. आणि मीं नाटकांत सोंग घेतलें एवढ्यामुळेंच कडवट आणि हिरमुसलें तोंड करते. तेव्हां ह्मणावें काय या प्रकाराला? (पद वाचतो.)

**देखुनियां सुंदर वेषा हृदयांतरिं दंगुनि गेलें,**
**मधुरशा कंठ-रवांनीं भानचि तें हरुनी नेलें!**

भान हरपून टाकण्याइतका का माझा कंठ मधुर आहे? तो इतका मधुर असेल अशी मला हा वेळपर्यंत कल्पनाहि नव्हती!

**अभिनय ते तुमचे बघुनी वेडिच कीं जशि मी बनलें!**

इतकं दुसऱ्याला वेड लागण्याजोगं माझ्याजवळ कांहीं असेलसें आजपर्यंत माझ्या स्वप्नांतहि कधीं आलें नाहीं!

**येउं नये तें मनिं आलें, अंतरिं तरि किति गडबडलें !**

यावरून हिचें अंतःकरण अगदीं स्पष्ट होत आहे !

**शयनिं जरि मूर्ति तव येई । झोंप नच पाहीं !**

**वेडि अशि बनलें । मज गमे तुह्मि चेटुक केलें !**

मी कसलें चेटुक करणार? तूं मात्र ह्या पत्रानें कांहीं विलक्षण चेटुक करून मला वेडा करून टाकित आहेस. अहाहा! काय रसिकता ही! स्त्रियांच्या ठिकाणीं इतकी रसिकता असेल याची मला आजपर्यंत कल्पनादेखील नव्हती! मला वाटलें जगामध्यें—

**रसिकजनांचें मन रसिकांवरि लोभे सहजचि जगतीं,**

**अन्य स्थलिं तें जाय न कधिंही सृष्टीची ही रीती!**

**आवरुं मन कैसें । रसिक सखी ज्या ओढितसे?**

**निरी**—खास खास चाललाया! ह्ये काई समद न्यारच दिसतया. रावसाब कुनाइशी बोलत्याती? अन् पतुर कुनाच वाचत्याती? अन् मदूनमदून बाइसायबाल्नी नांव ठिवत्याती? काय, हाय तरी काय ह्ये!

**माधवराव**—जीं वस्त्रें आणि आभरणें माझ्या स्त्रीनें घालावीं ह्मणून मीं मोठ्या प्रेमानें करिवलीं तीं न घालण्याविषयींच्या तिच्या हट्टानें माझा सगळा निरुल्हास आणि विरस होऊन गेला होता. पण परमेश्वरानें—

**आभरणांचें चीज कराया । प्रेषियली ही मोहनि माया!**

(इतक्यांत सुंदराबाई येते व निरेनें खुणावल्यावरून आड ऐकत रहाते.)

**निरी**—(स्वगत) वैनी आल्या, बर झाल अगदीं वक्ताला आल्या जनू! रावसायबाल्नी आतां अक्शी पकडा ह्मनाव बोलन्यामंदी!

**माधवराव**—माझ्या कांहीं ती बरोबर लक्ष्यांत येत नाहीं. पण मुकुंदराव त्यादिवशीं थिएटरमध्यें जिच्याशीं बोलत होता तीच जर ती असेल तर—

**चंद्रकांतिही लज्जित करि सखि,**
**चपलेपरि ती चंचल शशिमुखि,**
**चकिता हरिणीसम जी निरखी**
**तीच भूषविल आभरणां या!**

**सुंदराबाई**—(पुढें होऊन) कुणाला ह्मणायचं हें?

**माधवराव**—(स्वगत) अरे, हिनें माझें सगळें बोलणें ऐकलन् कीं काय? तर आतां असेंच बदललें पाहिजे. (उघड) कुणाला ह्मणजे? तुला आलेली मीं पाहिलें नाहीं असें वाटतें कीं काय तुला? या आभरणांचें चीज दुसरें कोण करणार तुझ्याशिवाय!

**निरी**—(स्वगत) पगा इक्त्यांतल्या इक्त्यामंदी कस बोलन फिरिवलया?

**सुंदराबाई**—पण—

**माधवराव**—पण नाहींन कांहीं नाहीं. आज मीं निश्चयच केला आहे अगदीं कीं तुझें कांहींएक ऐकायचें नाहीं! अन् तूं येते आहेस हें पाहूनच मीं ह्मटलें कीं:-

**आभरणांचें चीज कराया। प्रेषियली ही मोहनी माया!**
**चंद्रकांति तव लज्जित करि सखि,**
**चपलेपरि तूं चंचल शशिमुखि,**
**चकिता हरिणी सम तूं निरखी**
**सत्वर भूषविं आभरणां या!**

**निरी**—वैनी साएब–अगदीं भोळसट व्हो तुम्ही भोळसट! धनीसाब अक्शी फसवता हैती तुमास्नी ग्वाड बोलूनशानी!

**माधवराव**—हं, घालतेस कीं नाहींस? अजून कां मागेंपुढें बघतेस?

**सुंदराबाई**—हें काय बाई! उगीच भलताच काय आग्रह करावा माणसानं? एकदाच सांगितलं ना मीं, कीं मी कांहीं घालायची नाहीं ह्मणून? मग वरचेवर वरचेवर घाल घाल ह्मणून हिणवायचं काय एखाद्याला? पहिल्यांदा घातला त्याच वेळीं सांगितलं नव्हतं का मीं, कीं एकदाच घालीन, पुन्हा घालणार नाहीं म्हणून! मग उगीच असा शंभरदा कां बाई आग्रह!

**माधवराव**—शंभरदाच काय पण हजारदा करीन! पण तूं मात्र—

**सोड सोड हा आग्रह सुंदरि!**
**उगिच कशाला धरिशि असा गे?**
**पतिवच सतिनां वंद्य असावें**
**विपरित तरि कृति करिशी कां गे? ॥ १ ॥**

**सुंदराबाई**—मी इकडच्या शब्दाबाहेर एक काडीइतकी तरी वागतें का? मग असं कां ह्मणायचं बाई! नाटकांतल्या पोषाखासंबंधानं मात्र—

**माधवराव**—मीतरी तेवढ्याचसंबंधानें ह्मणतों, कारण—

[ चाल—तुजविण गमे. ]

**अनुचरिविणें नरा विश्वांत । विश्वांत पूर्ण गमतो**
**मग धीर कोठचा धरि तो. ॥ १ ॥**
**अनुचरिविणें नसे विश्राम । विश्राम-धाम कुठचें!**
**जग गमे नरा गृह मृतिचें! ॥ २ ॥**
**द्युतिविण जरी नभीं चंद्रार्क । चंद्रार्क व्यर्थ नभि ते!**
**गृह तसें रितें सखि-हसितें. ॥ ३ ॥**
**तरुवर जरी उभे निष्पर्ण । निष्पर्ण व्योमिं चढती**
**सखिविणें पती जणुं दिसती. ॥ ४ ॥**
**घनविरहिता जशी विद्युत् । विद्युन्निनद कुठचे?**
**सखिविणें सुनें जग पतिचें! ॥ ५ ॥**
**रसविरहिता जशी कविता । कविता काव्य-रहिता**
**अनुचरीविणें तशि पति-ता. ॥ ६ ॥**

दृष्टी आहे पण तिला पहाण्याची शक्ति नाहीं, फळ आहे पण त्याला रुचि नाहीं, कोकिळा आहे पण तिच्यांत गाणें नाहीं, त्यापैकीं प्रकार होतो आहे हा! ह्मणून ह्मणतों-हं मग घालतेस कीं नाहीं हे कपडे आणि गजरे?

**सुंदराबाई**—माझी एकदा फजिती झाली तेवढी नाहीं का पुरेशी झाली? त्या दिवसापासून दादाला तोंड दाखवायचीदिखील लाज वाटते बाई मला कशी ती! अन् इकडून त्याचा चांगलाच मान झाला! 'पुनः असं करूं नकोस. हें असलं लौकिकांत चांगलं नव्हे,' असं म्हणून परवां मला त्यानं आपल्या गळ्याची शपथ घातली आहेन. त्याला माझा नाइलाज आहे—ह्मणून ह्मणलें मी काय करूं बाई आतां याला!

**माधवराव**—(ओंठ चावून) अस्सें, हें नव्हतें सुचलें मला! तर मग माझ्या इच्छेप्रमाणें तुला वागायला लावायला थोडकीच युक्ति आहे ह्मणायची. माझ्या गळ्याची शपथ आहे तर—

**सुंदराबाई**—(तोंडांत लुगड्याचा पदर धरून व माधवरावाच्या तोंडावर आपला हात देऊन) हें काय बाई भलतंच! शपथ आहे माझ्या गळ्याची, मला कांहीं शपथबिपथ घालणं होईल तर!

**माधवराव**—असली शपथबिपथ मी बिलकूल ऐकणार नाहीं! माझ्या इच्छेप्रमाणें तुला हे कपडे आणि हीं आभरणें घालायचीं आहेत कीं नाहींत? नाहीं तर पुनः नांव घेणार नाहीं मी तुझें!

(इतक्यांत लगबगीनें निरी येते.)

**निरी**—वैनी, यादवराव आन् रमाकाकू आल्याती.

**सुंदराबाई**—हें सगळं कुठंतरी दडवून ठेवावं. नाहींतर सगळींजणं थट्टा करतील माझी आणि इकडचीहि पण!

**माधवराव**—माझी थट्टा करतील? कां? यांत त्यांच्या पदराला कांहीं खार लागतो कीं काय? असल्या बाबतींत मी प्रत्यक्ष आपल्या बापाला जुमानणार नाहीं, मग बाकीच्यांनां तर काय? यादवराव, पुनः आमच्या इथें पाऊल टाकणार नाहीं ह्मणून त्या दिवशीं जो मोठ्या कुऱ्यानें गेला तो निर्लज्जासारखा आला आहे कशाला पुन्हा तोंड घेऊन? लोचट लोक नाहींतर—

**सुंदराबाई**—अग बाई! कायतरी बोलायचं हें! माझ्याकरितां एकदा नाहीं दहादा येणं भाग आहे त्याला. पण हें असं काय बोलायचं अगदीं माणसांतून उठल्यासारखं?

**माधवराव**—माणसांतून उठल्यासारखें का? अस्सें! माणसांतूनच उठलोंय मी! तुला जर माझें बोलणें रुचत नसेल तर खुश्शाल माहेरीं जाऊन रहा, जरूर नाहीं इथें राह्यची! तुला ठाऊक आहे? हा तुझा भाऊ सगळ्या गांवभर माझ्या नालस्त्या करित हिंडतो आहे आतांशा; समजलीस? तुला आपला भाऊच पाहिजे असेल तर जा, रहा जा त्याच्या इथेंच जाऊन; तो नको आहे इथें यायला.

**सुंदराबाई**—पण तूं इथं येऊं नकोस असं कसं सांगतां येईल मला त्याला?

**माधवराव**—तुला नसलें सांगतां येत तर हा बघ, मी जातों अन् त्याला सांगतों कीं जसे आलांत तसे चालते व्हा म्हणून!

[जोरानें निघून जातो.

**सुंदराबाई**—अगबाई, आतां काय होईल सांगवत नाहीं माझ्यानं! ही इकडची वृत्ति अशी एकदम कशानं बरं इतकी पालटली! त्या मुकुंदरावानंतर नाहीं इकडचे कांहीं कान भरले! (ऐकून) अगबाई, केवढ्यानंतरी आरडायचं हें!

**निरी**—हे पत्तुर आल्यापासूनशेनी ह्ये धन्याच काम लई बेसुमार होत चाललया!

**माधवराव**—चला चालते व्हा–दुसरेंतिसरें कांहीं नाहीं! मी माणसांतून उठलों आहें, नाटकांत नाचतों, दारू पितों, काय वाटेल तें खातों, म्हणून सगळ्या गांवभर सांगत फिरा जा. पाहिजे तर गळ्यांत एक दवंडी बांधून घेऊन सगळ्या गांवभर पडघं बडवित सुटा. बेशरम, लोंचट लोक नाहींतर! आमचे मेव्हणे हे! अन् अशी आमची अब्रू बचावतात!

**सुंदराबाई**—अग बाई, दादाला काय वाटेल हें ऐकून! त्याला तोंडतरी कसं दाखवूं आतां मी हें? (पुढें जाऊन) पुरे बाई आतां हीं असलीं बोलणीं!

**माधवराव**—(वेडावून) पुरे बाई आतां हीं असलीं बोलणीं! तुला कुणीं सांगितलें होतें मधें तोंड घालायला? तूं कशाला आलीस इथें! चल चालती हो इथून. बेशरम, लुच्ची नाहींतर!

[लोटून देतो. सुंदराबाई रडूं लागते.

**यादवराव**—माधवराव, तुम्ही भानावर आहांत का?

**माधवराव**—तर काय—मी अफू, गांजा खाऊन दारू प्यालों आहें असें समजतां तुम्ही? (वेडवून) म्हणे–तुम्ही भानावर आहां का? जगांत अलीकडे कायतरी बेशरम आणि पाजी लोक झाले आहेत! गांवभर दुसऱ्याच्या नसत्या नालस्त्या करायच्या त्या करायच्या, आणखी पुन्हा वरतीं तोंड करून बेशरमपणानें त्यांच्याकडे जायचें!

**यादवराव**—बस्स! इतकी शोभा पुरे झाली! सुंदरकरितां म्हणून मला यावें लागलें. यापुढें तुमच्या इथें पाऊल टाकीन तर शपथ! हा चाललों मी—

**सुंदराबाई**—(दुःखानें) दादा!

**माधवराव**—(वेडावून) डॅ डॅ!

**यादवराव**—यापुढें एक अक्षर बोलूं नकोस. येतों मी. इथें माझ्यानें आतां उभेंच रहावत नाहीं. ताई, तुझ्या घरीं अशी हीच तुझी माझी आतां शेवटची भेट. भेटावेंसें वाटलें तर तुलाच बोलवायला पाठवीन!

**माधवराव**—'तुलाच बोलवायला पाठवीन!' यापुढें तिला आतां तुमचा उंबरठादेखील दिसायचा नाहीं! तिला जर जायचेंच असलें तर आतांच्या आतांच जावें तिनें. माझी ना नाहीं. मात्र मग पुनः इथें येण्याचें कारण उरणार नाहीं!

**सुंदराबाई**—दादा, वहिनी! जा, जा तुह्मी. (नवऱ्यास) मला कुठं जाणंय नको अन् येणंय नको. मी हें घर सोडून कुठं जाणार नाहीं! पण माझ्या माहेरच्यांनां मात्र हें असं—

**माधवराव**—(तिला मारतो) 'हें असं!' निर्लज्ज! बेशरम नाहींतर!!

[यादवराव रागानें पत्नीसह निघून जातो.

---

## प्रवेश ७ वा.

[**स्थल**.—माधवरावाचें घर. मुकुंदराव प्रवेश करितो.]

**मुकुंदराव**—(स्वगत) माधवराव बाहेर गेले आहेत हें एक बरेंच आहे. ह्यांनां मोहनेचें तें पत्र आणि त्या 'भामाप्रकोप' नाटकाची नक्कल आणून दिल्यापासून ह्यांची वृत्ति फारच पालटलेली दिसते. आणि शिवाय परवांच्या नाटकाच्या दिवशीं या स्वारीनें त्या मोहनेला पाहिल्यापासूनतर हा जसा अगदीं वेडा होऊन गेला आहे. थिएटरांत गेल्यापासून तों तेथून उठेपर्यंत स्वारी एकसारखी तिच्याकडे पहात होती. आणि त्या दिवसापासून घरीं बायकोवर हात काय टाकतो, तिला शिव्या काय देतो, एक आणि दोन! ती बिचारी रडते रडते एकसारखी! पण आपलें काम साधायला हें सगळें ठीकच आहे ह्मणायचें! मोहनाबाईकडून नाटकाची तालीम घेऊन आतां इकडे आलों माधवरावांचें भाषण ह्मणून घ्यावें ह्मणून! पुढच्या आशेवर मनुष्य किती खटपटी अन् यातायात करतो! पण यातायातीशिवाय पैसा कसा मिळणार! ह्या नाटकाच्या पायांत मोहनाबाईकडून कृष्णाच्या पोषाखाला ह्मणून पैसे घेतले. इकडे याच्याकडूनहि कृष्णाचा नवीन पोषाख करिवला त्यांत थोडेबहुत मिळाले. एकंदरींत महाडकर जोशांनीं सांगितल्याप्रमाणें विलक्षण द्रव्ययोग आला आहे खरा! ह्या वेडबंबूनें सत्यभामेच्या आणि राधेच्या गळ्यांत घालण्याकरितां ह्मणून दोन खरे रत्नहार करिवले आहेत. ते कसेंहिकरून आपल्या पदरांत पाडले पाहिजेत! हं! परवां रात्रीं महालक्ष्मीच्या निमित्तानें 'भामा-प्रकोपा'ची रंगाची तालीम करायचें ठरिवलें आहे मोहनाबाईनें, हें ऐकल्यापासूनतर स्वारी किती आतुर होऊन गेली आहे! मोहनेचा कंठ फार गोड आहे ह्मणून सांगितलें मात्र तों स्वारीनें मनांतल्यामनांत जिभल्या चाटायला सुरुवात केली! खा, हवेतितके खा ह्मणावें मांडे. तूं तिकडे मांडे खा, अन् मी इकडे हांडे भरतों. एकून सध्या आपले ग्रह छान जुळून आहेत एवढें खरें!

हं, तूं जा कृष्ण होऊन अन् मी येतों नारद होऊन! आणि देऊं एकच गंमत उडवून! तूं साध आपलें काम आणि मी साधतों आपला दाम! मनुष्यामध्यें अक्कल, कर्तबगारी आणि हिंमत असली ह्मणजे काय होणार नाहीं? (टेबलाचा खण उघडतो) हें मोहनेचें तें पत्र! बरें झालें आपल्या हातीं आलें! पण ह्या नोटा कसल्या इथें? (मोजून पहातो) साडे तीनशें! इथें ह्या वेळीं आल्याचा हा एक बराच लाभ झाला ह्मणायचा! (खिशांत टाकतो.) इथें माधवराव नाहीं. गडीमाणसेंहि कुणी जवळपास दिसत नाहींत. तो मंगळ गेला असेल बहुतेक स्वारीबरोबर; तेव्हां आपला फारा दिवसांचा डाव साधायला ही वेळ मोठी छान आहे. वहिनी वहिनी, (हांक मारतो. सुंदराबाई येते तिला) कां, रावसाहेब कुठें आहेत? बाहेर गेले आहेत वाटतें?

**मुकुंदराव**—(सुंदराबाई हो ह्मणून मानेनं खुणावते.) मला थोडें पाणी द्या पाहूं प्यायला. किशा कुठें आहे?

**सुंदराबाई**—त्याला निरी घेऊन गेली आहे दादाच्या इकडे. (आंत जाते व पाण्याचा तांब्या घेऊन येते.)

**मुकुंदराव**—(स्वगत) ही छान वेळ आली आहे जुळून! (ती तांब्या ठेवते. तिच्या तोंडाकडे न्याहाळतो) वहिनी, तुह्मी मला माझ्या बहिणीप्रमाणें आहांत. खरेंच सांगा, तुह्मी अशा दुःखी कां दिसतां अलीकडे? (पाणी पितो.)

**सुंदराबाई**—भाओजी, काय सांगूं? अलीकडे स्वारीची वृत्ति–कशामुळं कांहीं कळत नाहीं–अगदीं पालटून गेली आहे. पहिलं कांहींएक राह्यलं नाहीं. माझ्याशीं सुखाचा एक शब्द नाहीं कीं कांहीं नाहीं!

**मुकुंदराव**—अस्सें? तरी ह्मटलें? पण हें पहा, तुम्ही अशा झुरूं नका. मी आहेंना? (पाणी पितो.) बस्स पुरे. ठेवा तांब्या. (ती तांब्या उचलायास येते तोंच तिचा हात धरतो).

**सुंदराबाई**—(घाबरून) हें काय?

**मुकुंदराव**—माझ्या मनांतून तुह्मी अशा दुःखांत असूं नये. तुम्हीं माझ्या म्हणण्याला रुकार द्या कीं—

**सुंदराबाई**—(हात सोडवून घेऊन) कुणाच्या हाताला झटतां तुह्मी? मुकुंदराव, शुद्धीवर आहांत का तुह्मी?

**मुकुंदराव**—हें पहा–मी चांगला शुद्धीवर आहें. मी तुमच्या इथें येऊं लागल्यापासून माझ्या मनांत फार दिवस होतें हें. पण हा प्रसंग आज आला.

**सुंदराबाई**—मला 'वहिनी' अन् आपली 'बहीण' ह्मणून ही अशी पापवासना धरतां? ही पहा परसांत जातें मी अन् हांक मारतें सगळ्या शेजाऱ्यांपाजाऱ्यांनां.

[ तडक निघून जाते.

**मुकुंदराव**—(मागून जाऊन तिचें मनगट धरून) हें पहा सुंदरी, माझ्यापुढें तुझें कांहींएक चालणार नाहीं! आतां माझ्या तावडींतून तूं निसटून जाणार कुठें? आंत आलीस हें अनायासेंच उत्तम झालें. आतां आरडाओरड केलीस तरी बाहेर ऐकूं जाणार नाहीं.

**सुंदराबाई**—मेल्या चांडाळा, मांगा! हात सोड, हात सोड. धावा हो धावा—

[ मोठ्यानें ओरडते इतक्यांत निरी येते
व मुकुंदराव भिऊन बाहेर येतो. ]

**निरी**—वहिनी, का वोरडल्याती का! (मुकुंदरावास पाहून) तळपट का व्हइना मेल्याच!

**मुकुंदराव**—(बाहेर घाबरून येऊन) ही साडेसाती कुठून आली इतक्यांत! मला वाटलें, अशा स्थितींत ती वश होईल. पण हें प्रकरण मोठें खंबीर दिसतें. ती ओरडल्याबरोबर माझी छातीच होईना; उलट माझ्या छातींत धडकी भरून सर्वांगाला कोण भयंकर कंप सुटला आहे हा! आतां यापुढें इथें एक क्षणभरदेखील राहून उपयोगी नाहीं! माझे पायदेखील लटलट कांपताहेत! मीं का खून केला, का कुणाचा गळा दाबला असें वाटतें आहे मला! आतां ही आणि ही निरी हा सारा प्रकार माधवरावांच्या कानांवर घातल्याशिवाय कध्धीं रहाणार नाहींत! आणि याच वेळीं जर का माधवराव आले तर मात्र आपल्या फजितीला पारावारच उरणार नाहीं. तर आतां इथें एक क्षणभरदेखील राहून नाहीं उपयोगी.

[ जातो.

[ पडदा पडतो. ]

# अंक ४ था.

## प्रवेश १ ला.

[**स्थल.** माधवरावाचें घर. माधवराव व मुकुंदराव कांहीं बोलत आहेत असा प्रवेश.]

**माधवराव**—हिचें आणि त्या गोविंदरावाचें कांहीं सूत आहे असें भिकंभट ह्मणत होता.

**मुकुंदराव**—कोण, भिकंभट? आणि वहिनींच्यासंबंधानें? छेः छेः छेः! मी आज इथें वर्ष दोन वर्षें येतों आहें पण वहिनींच्यासंबंधानें कुणी असें ह्मणेल हा विचार माझ्या मनालादेखील कधीं शिवला नाहीं! तोच लुच्चा आणि महा पाजी आहे! वहिनी खरी पतिव्रता आणि साध्वी आहे. त्यांच्यासंबंधानें जर कुणी असे पापी आणि कुत्सित उद्गार काढून आपली जीभ विटाळील तर त्याची जीभ झडून पडेल! मात्र तुमच्यासंबंधानेंच त्यांनां वाईट वाटतें आणि त्यामुळें सध्या त्यांची कशी काय प्रकृती झाली आहे हें पहातांच आहां तुह्मी!

**माधवराव**—(स्वगत) तिनें सांगितलेंन त्याप्रमाणें जर कांहीं प्रकार असता तर ह्यानें तिच्या पातिव्रत्याची इतकी स्तुति केली नसतीन. तेव्हां मला वाटतें–(उघड) मुकुंदराव, तुम्ही असें ह्मणतां पण तिनेंतर तुमच्याचसंबंधानें मला कांहीं भलतासलता प्रकार सांगितला आहेन.

**मुकुंदराव**—माझ्यासंबंधानें! तें काय?

**माधवराव**— मी घरीं नसतांना तुह्मी इथें येऊन प्यायला पाणी मागितलेंत आणि ती पाणी आणून देत असतां तिचा घट्ट हात धरलात!

**मुकुंदराव**—मीं? पाणी प्यायला गेलों अन् तिचा हात धरला? शिव, शिव काय भयंकर किटाळ हें! मला वाटतें, तुह्मीं माझी परीक्षा पहातां आहां. वहिनी असें खोटें कधीं सांगणार नाहींत! चला, त्यांच्याकडे रुजवात करा. (विचार करून) अथवा असेंतर नसेल, माझें तुमच्या इथें येणें बंद करण्याकरितां त्या यादवरावाची-तर नसेल ही कांहीं शक्कल! (विचारयुक्त स्वगत) असेंच! (उघड) मला वाटतें, माझ्या बायकोजवळ त्या भिकंभटानें जो कांहीं फाजीलपणाचा प्रकार केलान तो मीं तुमच्यापासून चोरून ठेविला आणि तो माझ्या तोंडून काढून घेण्याकरितां तुह्मी मुद्दाम हें असें ह्मणतां.

**माधवराव**—(साश्चर्य) ह्मणजे! तो काय प्रकार?

**मुकुंदराव**—रावसाहेब, तो घडलेला प्रकार तुमच्याजवळ सांगायला मला शरम वाटली म्हणून तुमच्यापासून मीं तो चोरून ठेवला. तो चोर आमच्या इथें एकदा अपरात्रीचाच आंब मागायला ह्मणून आला, पण त्या वेळेला दुसरें कुणी तिथें होतें ह्मणून तेव्हां त्याचें कांहीं जुळलें नाहीं. परवांचीच गोष्ट, अगदीं भर दिवसाची, घरांत आला आणि पाणी प्यायला ह्मणून मागितलेंन. ती जों पाणी आणते तों चोरानें एकदम तिचा घट्ट हात धरलान! रावसाहेब, या गोष्टी दुसऱ्याजवळ कशा सांगायच्या? तुह्मीच पहा—

**माधवराव**—(चकित होऊन) आणि पुढें?

**मुकुंदराव**—पुढें त्यानें आपल्या उजव्या हातानें तिची हनुवटी धरून तिचे गाल दाबून धरलेन. त्या बरोबर तिनें खडाडदिशीं त्याच्या एक श्रीमुखांत दिली आणि त्याचे गाल रंगिवले.

**माधवराव**—शाबास! मोठी धीरवान् आणि समयसूचक बायको! आणि पुढें?

**मुकुंदराव**—पुढें काय? श्रीमुखांत दिल्याबरोबर त्याचा एक हात लुला पडला. दुसऱ्या हातानें त्यानें तिचें मनगट जास्त घट्ट धरलेंन. पण तीहि पक्की वस्ताद. त्याबरोबर ती त्याच्या हाताला कडाडदिशीं चावली आणि मोठ्यानें ओरडली. मग कसचें काय अन् कसचें काय! स्वारी जी एकदम भेदरली आणि काळतोंड करून पळून गेली–ती गेलीच! त्यावर त्यानें पुन्हा तोंड दाखिवलें नाहींन मला.

**माधवराव**—असा प्रकार झाला एकून!

**मुकुंदराव**—रावसाहेब, तुह्मींच पहा, ह्या असल्या गोष्टी उगीच कोण दुसऱ्याजवळ सांगेल? अहो, बायकांची अब्रू ह्मणजे नुसती कांचेसारखी!

**माधवराव**—अलबत्! (विचारयुक्त होतो.) हं, आतां येत चाललें आहे सारें माझ्या लक्ष्यांत!

**मुकुंदराव**—(स्वगत) तेवढ्याचकरितांतर माझा हा सारा प्रयत्न आहे! (उघड) हें पहा रावसाहेब, मला राहून राहून तुमच्या मेव्हण्यांची शंका येते. मी तुमच्या इथें येतों हें मला वाटतें त्यांनां खपत नाहीं! काल सकाळचीच गोष्ट. त्यांची अन् माझी कोण बाचाबाची झाली! ते मला एक पत्र दाखवून म्हणाले 'हें पहा, तुमच्यामुळें इथपर्यंत मजल येऊन ठेपली आहे!' पण मला त्यांच्या या बोलण्याचा कांहींच अर्थ समजेना!

**माधवराव**—(विस्मित होऊन) पत्र दाखवून म्हणाला?

**मुकुंदराव**—हो हो, पत्र दाखवून!

**माधवराव**—(स्वगत) मोहनेचें पत्र जें कुठें सांपडेनासें झालें आहे तेंचतर तें नसेल! त्या नोटी आणि तें पत्र अशीं दोन्ही मीं टेबलाच्या खणामध्यें ठेवल्याचें मला पक्कें स्मरतें! (उघड) मुकुंदराव, मला वाटतें तें मोहनेचें पत्र त्यांच्या हातीं लागलें असावें!

**मुकुंदराव**—(आश्चर्यानें चकित झालासें दाखवून) ह्मणजे! असें दुसऱ्याचे हातीं लागण्यासारखें ठेविलें होतें कीं काय तें तुह्मीं कुठें?

**माधवराव**—छत्! हातीं लागण्यासारखें मुळीं ठेवलें नव्हतें. नोटा आणि तें अशीं दोन्ही एकीकडेच खणामध्यें ठेविलीं होतीं.

**मुकुंदराव**—तुम्हांला पक्की आठवण आहे अगदीं? चुकून अथवा मुद्दामच दुसरीकडे नाहींना कुठें ठेवलेंत?

**माधवराव**—छेः हो! पण हें पहा, मीं तें दोनचार वेळां वाचायला घेतलें होतें त्यामुळें मला त्याचेसंबंधानें आतां अगदीं विस्मरण पडल्यासारखें झालें आहे!

**मुकुंदराव**—मला वाटतें, तुह्मीं डाव्या हातानें तें कुठेंतरी ठेवलें असेल!

**माधवराव**—सांपडेनासें झालें ह्मणजे मग वाटतील तसे तर्क करित सुटावें!

**मुकुंदराव**—तेंतर खरेंच. सांपडेनासें झालें ह्मणजे मनुष्य असेंच गोंधळून जातें. पण सगळीकडे नीट पाह्यलेंत ना तुह्मीं? नाहींतर एखाद्या खिशांतच तें असायचें आणि आपण पाहूं लागायचें सतराशें ठिकाणीं!

**माधवराव**—जिथें म्हणून पहाण्यासारखें होतें तिथें दोनदोनदा तीनतीनदा पाहिलें. धाकट्या पेटींत मात्र पुन्हा पाहिलें पाहिजे एकदा! पण तें पहाणेंदेखील व्यर्थ आहे! मला वाटतें, तें त्या नोटांबरोबर खास दुसऱ्या कुणाच्या हातीं लागलें!

**मुकुंदराव**—(विचारांत निमग्न होऊन) तर मग तें त्यांच्याच हातीं लागलें असलें पाहिजे खास! कारण त्यावेळीं मला ते ह्मणाले कीं, 'माधवरावांच्या इथें तुमचें जाणेंच बंद करून टाकतों!' त्या बोलण्याचा याच्याशीं कांहींतरी संबंध असावा! तुमच्या निरीच्यादेखत बोलला तो हें मला.

**माधवराव**—तरीच निरीनेंदेखील तिचेंच तुणतुणें ओढलेंन!

**मुकुंदराव**—होय ना! (विचारांत निमग्न झाल्यासारखें करतो.)

**माधवराव**—कांहो? असे विचारांत काय निमग्न झालां आहांत?

**मुकुंदराव**—(एकदम शुद्धीवर आल्यासारखें दाखवून) काय ह्मटलेंत?

**माधवराव**—नाहीं, ह्मटलें, असे विचारांत कसल्या निमग्न झालां आहांत?

**मुकुंदराव**—हो, मोठ्या विचारांत पडलों आहें!

**माधवराव**—विचारांत कसल्या?

**मुकुंदराव**—यापुढें तुमच्या इथें यावें कीं नाहीं ह्या! कारण तुमच्या ज्या नोटी गेल्या आहेत त्याचेंहि बालंट माझ्यावरच घालण्याचा त्यांचा बेत असावा अशी मला आतां शंका येऊं लागली आहे! तुमच्या मनांत माझ्यासंबंधानें काळेंबेरें आणून देण्याचा त्यांचा हा प्रयत्न, त्यांच्या हातीं तें पत्र जाणें, आणि त्यांनीं मला असें बजावणें, ह्या सगळ्या गोष्टींवरून मी त्यांच्या डोळ्यांत सलतों आहें खचीत! असलीं एकेक नसतीं भयंकर तुफानें येऊं लागलीं तर मग या कशाला आणि जा कशाला! पण रावसाहेब, तुमच्या इथें येणें अज्जीबात बंद करण्यापूर्वी माझी आणि वहिनींची एकदा समक्षासमक्ष तुमच्यादेखत रुजवात झाली पाहिजे! कारण, असल्या गोष्टीचा समक्षच उलगडा झाला म्हणजे बरें. (एकीकडे) हं:, त्या माउलीसंबंधानें आणि असले पापी विचार!

**माधवराव**—जाऊंदे हो! तुह्मी भलतेंच काय मनांत आणतां? त्यांचा सगळा कावा आतां माझ्या पक्का लक्ष्यांत येऊन चुकला आहे. मी मनावर घेईन तरच ना सगळ्या गोष्टी? तुम्हांला माझें घर बंद करणार ते कोण? त्याचें पहातां येईल ह्मणे. बरें पण, तालमीचें काय झालें? किती वाजतां आरंभ करायचें ठरलें आहे? **'भामा प्रकोपां'**तलें तें **'संसार हा फार असार हा'** हें पद फार गोड झालें आहे बुवा! चला, माझें भाषण आणि पदें ह्मणून घेतांना?

**मुकुंदराव**—तुह्मांला नाटक सुचतें आहे, पण मला यावेळीं कांहीं सुचत नाहींसें झालें आहे!

**माधवराव**—मुकुंदराव, तुम्हांला एकदा सांगितलें ना, कीं तुह्मी आपल्या मनाला या संबंधानें कांहीं वाटूं देण्याचें कारण नाहीं ह्मणून? मग काय हें असें? त्यांचा सगळा कावा माझ्या लक्ष्यांत येऊन चुकला आहे! माझ्यापुढें यादवरावांच्या लुच्चेगिऱ्या बिलकूल चालणार नाहींत, हें तुह्मीं पक्कें समजून ठेवा. चला तर, वर जाऊं. आज रात्रीं जर नाटक व्हायचें आहे, तर अगोदर त्याची तालीम झाली पाहिजे. चला, मीं पाठ केलेलें सगळें तुम्हांला ह्मणून दाखिवतों ह्मणजे आयतेवेळीं नको मग घोटाळा व्हायला. त्यांतलीं एकदोन पदें तर मोठ्या गमतीदार चालींत बशिवलीं आहेत.

[मुकुंदरावाचा हात धरून त्यास घेऊन जातो.

**मुकुंदराव**—चला. (एकीकडे) इथपर्यंततर छान बार भरला गेला! आतां पुढें काय करायचें तें पाहूं. [जातात.

---

## प्रवेश २ रा.

[स्थल—मोहनाबाईचें घर. मोहना, सत्यभामा, यमू वगैरे वीझिक खेळत बसल्या आहेत. इतक्यांत नाटकाची रंगीत तालीम पहाण्यास बोलाविलेल्या बायका, लहान मुली व मुलें येतात. मंडळी येतांच मोहना उठून त्यांस दुतर्फा नीट बसविते.]

**मोहना**—(घड्याळाकडे पाहून) अगबाई, नऊ वाजले कीं! नि, अजून मुकुंदराव कां नाहीं बरं आले?

(इतक्यांत मुकुंदराव येतो.)

**मुकुंदराव**—हा आलों कीं मी! माझ्याकडून नाहीं उशीर व्हायचा!

**मोहना**—मुकुंदराव, तुह्मांला अगदीं शंभर वर्सं औक्ष आहे. तुमची आठवण काढायला अन् तुह्मी यायला एक गांठ!

**मुकुंदराव**—हा गांठीचा योग मीं मुद्दामच जमवून आणला. कारण, मला ३६ व्या वर्षीं अपमृत्यु आहे ह्मणून आपल्या महाडकर ज्योतिषांनीं सांगितलें आहे; ह्मणून कुणीं आठवण काढायचा अवकाश, कीं मी तिथें ठेवलेला! बाकी मी आलों आहें केव्हांच!

**मोहना**—हं! एकून चिरंजीव व्हायचा बेत आहे वाटतं!

**मुकुंदराव**—काय होईल तें खरें! मीं आपल्याकडून प्रयत्न चालिवला आहे!

**मोहना**—बरं, पण तो वेडापीर बाळप्पा कुठं आहे? त्याला पेंद्या करायला आणणार होतांना तुह्मी?

**मुकुंदराव**—त्याला आणून रंगवूनदेखील ठेवलाय मीं केव्हांच!

**मोहना**—असं का! अन् तुह्मी नाहीं रंगलांत अजून? तुह्मी नारद होणार ना?

**मुकुंदराव**—हा पहा तिकडेच चाललोंय मी; मला कांहीं रंगण्याचें फारसें कारणच नाहीं.

**मोहना**—हें पहा मुकुंदराव, शेंडीचा झुपका मात्र अगदीं ताठ राहूंदे हो तुमच्या डोक्यावर!

**मुकुंदराव**—ताई, आतांपासूनच थट्टा करायला लागलांत वाटतें? (माधवरावांचा गडी आलासें पाहून स्वगत) माधवराव अगदीं वेळेवर आले ह्मणायचे! (उघड) त्या पहा रमाअक्का आल्या. अहो यादवेंद्र, राधारमण कृष्ण! हा आलोंच मी नारद होऊन आपलें स्तवन करायला. हः हः हः! ताई, चला, त्या आल्या.

**मोहना**—( पुढें जाऊन ) मुकुंदराव, नाटक सुरू झाल्यावर मात्र नाहीं बरं का हें असं चालायचं! ( सत्यभामेस व यमूस ) उठा ग आतां सगळ्याजणी. तें बिझिके पुरे करा तुमचं आतां. आतां आरंभ करूंया आपण नाटकाला. ह्या पहा रमाअक्का आल्या! ( पुढें होऊन ) माझी तुमची प्रत्यक्ष ओळख नसतांना तुम्ही आलांत हे बाई फार उपकार आहेत तुमचे माझ्यावर. चला या आंत.

**जमुनि युवति युवती । करुं नाटककृति अभिनव अति!**

[ जातात.

---

## प्रवेश ३ रा.

[ गर्भ नाटक. ]

[ **स्थल**—रंगभूमी. मोहनेच्या घरांतील दालन. मोहना नटी झाली आहे, सत्यभामा व यमू तिच्या सख्या झाल्या आहेत असा प्रवेश. ]

### नांदी.

**गिरिधर, सुंदर मुरलि अधरिं धर**
**धरणीधर माधव दिव्यांबर धरि**
**कविवरि स्मित करिं कंजनयनधर! ॥ गिरिधर० ॥**
**धरि हरि रुचिर माल, आकंठ धरि चित्र आभरण,**
**चक्रपाणि धरि, आयुध करिं, कंबुकंठधर! ॥१॥ गिरिधर० ॥**
**श्रीवत्सांकित, शारंगधर, कौस्तुभमणियुत दिव्यहारधर,**
**रत्नमणियुत मुकुट शीर्षिंधर ॥ २ ॥ गिरिधर० ॥**
**नटवर यदुविर तम हर सत्वर, कविजनमानिं विहर**
**सकल दुःखहर, असुरकंदनकर, येई श्रीहरि झर झर! ॥ गिरिधर० ॥**

[ चाल—नळ सुमनांजलि. ]

**पुष्पांजलि हा अर्पुनि रसिकां**
**करितों नाटककृति अवलोका. । ध्रु० ।**
**कृष्णचरित नव सरस रसान्वित**
**जनमनरंजन बुधजनमंडन**
**भक्तिरसाचें करि जें पोषण**
**दावुनि तोषवुं सकलहि लोकां. ॥ १ ॥ पुष्पांजलि० ॥**

**अभिनव 'भामा-प्रकोप' नाटक**
**अथवा 'राधाभुजंग' नामक**
**कृष्णचरित हें कृष्णग्रंथित**
**दावूं करुनी मार्मिक लोकां. ॥ २ ॥ पुष्पांजलि० ॥**

**नटी**—सखे, नांदी म्हणून या रसिकांस पुष्पांजलीहि अर्पण केली—

**सखी**—अग, पण हे गानलोलुप हरिण तुझ्या या नुसत्या पुष्पांजलीनं थोडेच तृप्त होणार आहेत. यांनां गानदानच केलं पाहिजे. हे पहा कसे अगदीं कान देऊन बसले आहेत.

**नटी**—तर मग मी ते ओढून घेतें!

**सखी**—हं हं! असला हस्तप्रयोग मात्र करूं नकोस हो! आधींच प्रेक्षकमंडळी थोडी आली आहे, अन् त्यांचे जर कान धरून तूं ओढूं लागलीस तर तुझा पुढचा प्रयोग पहायला बसेल कोण इथं!

**नटी**—अग वेडी आहेस तूं! अग ज्या वेळेस आपण मंगलाचरण म्हणून या रसिकांनां पुष्पांजलि अर्पण करितों त्याच वेळीं यांचे डोळे, यांचे कान, अन् यांचं मन आपण त्या पुष्पपरागांच्या रज्जूंनीं आपल्याकडे ओढून घेतों, आणि यांनां नुसतीं बाहुलीं करून बशिवतों इथं.

**सखी**—सखे, तें सगळं खरं पण आज सूत्रधाराची स्वारी नाहीं कुठं आली!

**नटी**—सूत्रधाराची स्वारी! काय, काम काय आहे इथं सूत्रधाराचं! आपला असा निश्चय आहेना कीं:—

**जमुनि युवति युवती। करूं नाटककृति अभिनव ती!**

**सखी**—हो, पण या नाटकांत सूत्रधाराचं काम आहे. आणि तें चंद्रभागाबाईंनीं करावं असं ठरलं होतं आपलं.

**नटी**—हो गडे, मी विसरल्येंच होत्यें अगदीं. (इतक्यांत नारदाचा वीणारव ऐकूं येतो.) अग बाई, सूत्रधार अन् नटीचा प्रवेश होण्यापूर्वींच ही नारदांची स्वारी कशी आली इकडे! मला वाटतं 'राधा' अन् 'सत्यभामा' या दोघींमधें कांहींतरी कलागत लावण्याकरितां चालली आहे स्वारी! तर चल, आपण दोघीजणी राधेचं अन् सत्यभामेचं सोंग घेऊन तयार असूं.

[ जातात.

**नारद्**—(प्रवेश करून)

[चाल—राम स्मरावा राम.]

**श्रीरंग करो भवभंग, जगत्रयिं ! । ध्रु० ।**
**श्रीहरि-संस्मृति अंतरिं प्रेरी उदात्त चिन्मय रंग, किती तरि !**
**देवकिनंदनवंदन सकलहि संहरि मार अनंग, खरोखरि !**
**सुरमुनिजनमन-रंजन करि जो भंगे भेदतरंग, अनावर !**
**वृंदावनिं करि व्रजवधुवृंदा स्वानंदें अति दंग, परात्पर !**
**योगीजनकुल यत्पदिं भ्रमतें; हो मज तत्पदसंग, निरंतर !**

कृष्णाजवळ मीं एक गोपी मागितली तर त्यानें मला स्त्री करून टाकून माझें सगळ्या त्रैलोक्यांत हंसें करून टाकलेंन. त्यावेळेपासून होईल तितका कृष्णाला त्रास द्यायचा हें ठरलें आहे माझें ! म्हणून रुक्मिणींत आणि सत्यभामेंत कळ लाविली. पण कृष्णांनीं दोघींचीहि समजूत केली. आतां या राधेंत आणि सत्यभामेंत द्यावा कलह लावून म्हणजे अर्थात् कृष्ण सुखाला आंचवलाच ! या दोघी अगदीं प्रेमानें वागतात. पण राधेला तुझ्यावर कृष्णाचें जास्त प्रेम आहे असें सांगून मीं कलहाच्या बिब्याची एक फुलीतर घालून ठेविलीच आहे. पाहूं आतां कशी गंमत उडते ती. तिकडेच जावें तर.

[चाल—झडकरीं कधीं मजला.]

**कलह हा जिथें रुजला । तेथें ।**
**विध्वंसचि करि समुळा**
**संक्षोभवि चित्ता । किती तरि ! । ध्रु० ।**
**स्वभाव-सुंदर प्रेमळ जन जरि,**
**कलहबीज हें ध्वंसि तयातें,**
**आंध्यचि देतें तन्नयनातें,**
**स्वैरगतीतें रसना वरिते । करि दशा. ॥ १ ॥ कलह हा० ॥**

अरे, मी गाण्याच्या नादांत या कृष्णमंदिराशींच येऊन पोंचलों कीं ! तर आतां आंत प्रवेश करावा. पण देवडीवरच कोण हा आहे बरें इथें उभा ? ही पेंदोबाची स्वारी दिसते आहे; बराच लठ्ठ दिगंबर झालाय कीं हा ! (पुढें जाऊं लागतो.)

**पेंद्या**—(नारदास हटकून) हं, कुट चालला कुट ? हत पेंद्याशीं गाट है पगा. हततर समदा रानीवसा है रानीवसा ! कुनासनीबी परमानगी न्है आतमंदी जायाला. कोन्, पायजे कोन तुमास्नीं ?

**नारद**—अरे, अगदीं बेमुरवत हटकतोससा? कृष्ण आहेत का आंत?

**पेंद्या**—हत किसनबी न्है आन् मसनबी न्है! किसन हवा असला तर जा गवळीवाड्यामंदी, आन् मसन हव असल तर जा गावाभाईर!

**नारद**—अरे पेंद्या, मलासुद्धां का तूं ओळखेनासा झालास?

**पेंद्या**—मलासुद्दा! असा कोन-हैसतरी कोन तूं 'मलासुद्दा?' आपन न्है कंदीबी ह्यें असल 'मलासुद्दा' नांव ऐकल!

**नारद**—(स्वगत) अरे, यानें माझ्या अहंकारवृत्तीवर हा चांगलाच प्रतोद ओढलान म्हणायचा! (उघड) अरे, या देहाला नारद म्हणतात.

**पेंद्या**—व्हय व्हय व्हय! तूं ना-रद नारद न्हव का? तर तुलाय न्है आन् तुज्या वालाबी न्है सोडनार हत. रुक्मिनीमंदी आन् सत्यभामेमंदी अक्शी योकच भांडन लावनार कज्जदलाल तूच न्हैका नारद! नारद! करतुया पारद! कलागत लाऊनशेनी समदी योकच आगडोंब करूनशेनी द्यायचा तुजा धंदा न्हव का? मुकाट्या आल्या वाटन जा. जातूयास कीं न्है झटकन्? का देऊं योक काटीचा रप्टा फट्कन्!

(इतक्यांत गोपकन्या जयंती दरवाजाशीं येते.)

**जयंती**—अगबाई, नारदमुनींची स्वारी आली वाटतं! (पेंद्यास) अरे आचरटा पेंद्या! ह्या महाभागमुनींशीं काय चालिवला आहेस तूं हा वात्रटपणा? मेल्याला रीतच नाहीं जशी!

**पेंद्या**—ह्यो भट्टरगा शाक कराया योक भोपळा घेऊनशेनी आलाया ह्मूनशेनी चालिवलायस व्हय त्येचा तोंडपुजपना!

**जयंती**—वेडा पीर नाहींतर! भाजीचा भोपळा कारे तो! आचरट नाहींतर! चल, दूर हो वाटेंतला. मेला अजगर जसा!

**पेंद्या**—आन् तूं नागीन जशी!

**जयंती**—चल, दूर हो ह्मणतें ना! वाट सोड त्यांनां. या, मुनिवर्य, आंत या.

(पडद्यांत सत्यभामा व राधा यांचा वाद चालला आहे.)

**राधा**—तर मग, माझ्यावरतीं मुकुंदाची प्रीति नाहींच कीं काय?

**सत्यभामा**—

अग माझ्यावरती हरिची प्रीती
कोण असे ती ठाउक जगतीं
मग कां वदसी ऐशा रीतीं
वद वद राधे? तूं! ॥ १ ॥

**पेंद्या**—हा कळलाव्या येन्याच्या अदुगरच ह्येंच्यामंदी भांडाया सुर्वात झालीया.

**जयंती**—( आंत येऊन ) नारद मुनिवर्यांची स्वारी आली.

**नारद**—( गात गात येतात )

**श्रीरंग करो भवभंग, जगत्रयिं—**

**सत्यभामा**—जयंती, मुनिवर्यांना आसन दे.

( नारदास आसन देतात व ते बसतात. सर्वजणी नमस्कार करितात. नारद त्यांस आशीर्वाद देतात. )

**नारद**—( स्वगत ) इथेंतर मी येण्याच्यापूर्वींच यांच्यांत भांडणाला सुरुवात झाली आहे. ( उघड ) काय, भांडण कसलें चाललें होतें?

**सत्यभामा**—भांडण कसलं ह्मणा? पण मुनिवर्य, तुह्मीच सांगा, कीं कृष्णाची माझ्यापेक्षां दुसऱ्या कुणावर का जास्त प्रीति आहे?

**नारद**—त्याबद्दलचा निर्णय पारिजातकानें कधींच केला आहे!

**राधा**—हो, मीतरी तेंच ह्मणलें! कृष्णांनीं पहिल्यांदा रुक्मिणीबाईंनांच पारिजातकाचं फूल दिलं.

**सत्यभामा**—तिला फूल दिलं तर मला पारिजातकाचं झाड दिलं हरींनीं. तेव्हांच—

**नारद**—तेव्हांच कृष्णाची प्रीति अगदीं स्पष्ट दिसून आली! होय कीं नाहीं?

**राधा**—म्हणजे? असं मोघमांत कां बोलतां?

**सत्यभामा**—खरंच गडे, असं दुटप्पी बोलणं काय कामाचं?

**नारद**—दुटप्पी बोलूं नको तर काय करूं? खरें बोललों तर तुमचा आमच्यावर फुकट रुसवा व्हायचा. ह्मणून मोघमांतच ठेवलेलें बरें नव्हे का?

**सत्यभामा**—तर मग असं का तुमचं ह्मणणं, कीं, माझ्यापेक्षां रुक्मिणीवर मुकुंदाचं प्रेम जास्त?

**नारद**—खरें निर्भिडपणानें विचारशील तर असेंच खरें. नाहींतर तो तें फूल पहिल्यांदाच नसता का देता तुला? त्यानें तुझ्या इथें झाड लावलेंन, पण ती तुझी समजूत करण्याकरितां! त्याचें खरें प्रेम प्रथमतः पुष्प देण्यांतच दिसून आलें!

**सत्यभामा**—तर मग मुकुंदानं माझी समजूतच केली तर ती? तें एक असूं दे, पण या राधेवर कृष्णाची जास्ती प्रीति आहे कीं माझ्यावर आहे तेंतरी कळूंद्या एकदा मला.

**राधा**—मलाहि पण तेंच कळलं पाहिजे एकदा. मात्र मुनिवर्य, कुणाची भीडमुर्वत न ठेवतां तुम्हांला खरं खरं काय वाटतं तेंच सांगा.

**नारद**—( राधेस उद्देशून ) कृष्णाची प्रीति तुमच्यावर आहे.

**सत्यभामा**—(रागानें) पण, किती झालं तरी मी पट्टराणी आहें! तुह्मी काय वाटेल तें ह्मणा. मुनिवर्य

**माझ्यावरती हरिची प्रीती**
**कोण असे ती ठाउक जगतीं;**
**मग कां वदतां ऐशा रीतीं**
**सांगा मुनिराया? ॥ १ ॥**

**जयंती**—बाहेर श्रीकृष्णांची स्वारी आली आहे.

**नारद**—( दोघींस ) तर मग हें पहा, आपण आतांच त्या कृष्णाची परीक्षा पाहूं. तुम्ही दोघीजणी इथें दरवाजाकडे पाठ करून एकमेकींशीं बोलत बसा. मी या चित्रफलकाच्या आड लपतों. कृष्ण आल्याबरोबर पहिल्यानें कुणाकडे बघतो आणि कुणाशीं बोलतो हें आपण पाहूं. म्हणजे त्याची खरी प्रीति कुणावर आहे हें तेव्हांच कळून येईल. तर अशा बसा, जशा कांहीं अगदीं बहिणीसारख्या गुजगुज गोष्टी करितच बसलां आहांत. ( दोघीहि त्याप्रमाणें करितात. ) कृष्ण आला तरी त्याच्याकडे दोघीहि लक्ष्यच देऊं नका, समजलें? मी लपतों तिथें!

( नारद लपतो. पेंद्या व जयंती एका बाजूस बोलत उभीं रहातात. )

**कृष्ण**—( प्रवेश करून )

[**चाल**—व्यर्थ अम्ही अबला.]

**मधुर असा कुठुनि नाद उठला!**
**मंजु स्वनींचा मंजु गीतरव काय एकवटला! ॥ १ ॥ मधुर० ॥**

पण—

**ह्या लोकींचा खचित नव्हे हा, मंदिरिं परि भरला!॥२॥मधुर०॥**
**गंधर्वांच्या कंठरवानें नादित जणुं झाला! ॥ ३ ॥ मधुर० ॥**
**किंवा नारदवीणारव हा येथ असे घुमला! ॥ ४ ॥ मधुर० ॥**
**कां सारा हा मोहचि मजला भ्रंशवि चित्ताला! ॥५॥ मधुर०॥**
**अथवा गानोत्तर रव मंजुळ काय शिरीं भरला! ॥ ६ ॥ मधुर०॥**

**नारद**—( स्वगत ) काय? यानें मी इथें आल्याचें ओळखलें न तर! अथवा परमेश्वराला अज्ञेय आणि अदृश्य असें काय आहे?

**कृष्ण**—( सत्यभामा व राधा कुजबुजत आहेत असें पाहून )

[चाल—नारी नजर तुझी गहिरी.]

**पडुनि मनीं भ्रम तो। भ्रमतों।**
**चंद्रबिंब हें अन्या बिंबा चुंबितसें बघतों!। ध्रु०।**
**चंद्रलोकिं कां आलों चुकुनी!**
**परि दोन शशी हे बघुनी**
**अंतरिं जात पुन्हां भ्रमुनी**
**कां संल्लापीं रत चंद्रमुखी देखुनियां फसतों! ॥ १ ॥**

छे:, हा खास भ्रम नव्हे, कारण ह्या इथें एकमेकींशीं—

[चाल—स्मितवदनि ही.]

**वदत असति ह्या शशिवदना त्यजुनि कलहा**
**नवलचि गमत मज असति हंसत!** ( खोकतो )
**मृगिपरि चंचल-नयना सुंदर**
**फिरविति नच निज नयन-चकोर**
**मी आलों हें यांस न अवगत**
**कां नारद करि नव कपटाचरणा! ॥ १ ॥**

ज्या अर्थीं या अजूनदेखील माझ्याकडे बघत नाहींत त्या अर्थीं खास नारद मुनींनींच आज कांहींतरी कळ लावण्याकरितां यांनां मुद्दाम अशा हंसत बोलत बसायला लावलें असावें! तर आतां हीच युक्ति! ( किंचित् पुढें होऊन )

**ही भामा तर मानाची पुतळी**
**अवगणितां घेइल फांसचि खास गळीं.। ध्रु०।**
**हीतर गोपसुता, मजवरती अति अनुरक्ता**
**चुंबिन जरि मी एकीला। कोपचि येइल दुसरीला**
**करुं काय! करुं काय! कठिण दिसत गति सगळी! ॥ १ ॥**

(सलकडीं वाजिवतो) छेः, ह्यातर माझ्याकडे नुसती मानदेखील वर करून पहात नाहींत! (चित्रफलकाकडे पाहून) ह्या चित्रफलकाच्या आडून नारद-मुनींच्या ऊर्ध्व केशकलापासारखें हें काय बरें दिसत आहे? छेः, बहुधा त्यांचेंच असावें हें सारें कपट! तर आतां हीच युक्ति करावी. नाहींतर रुक्मिणीला फूल दिलें तेव्हां ही सत्यभामा जशी रागावली माझ्यावर तशी आतांहि रागावयाची एखादी.

(दोघींच्या मागें जाऊन सत्यभामेच्या स्कंधावर हात ठेवून तिचे नेत्र मिटतो व राधेचें चुंबन घेतो; सत्यभामा चटकर हात सोडवूं पहाते. तिकडे पेंद्या जयंतीचे डोळे झांकतो.)

**माधवराव**—(स्वगत) मीं दोघींच्याकरितां करविलेल्या या रत्नमाला यांच्या गळ्यांत घालतों. (तसें करतो.)

**सत्यभामा**—अगबाई कोण तें? डोळे कुणीं झांकले माझे? कितीतरी गार हात लागले पण! आणि गळ्यांत ही रत्नमाला कुठली? हें नव्हतं बाई नाटकांत! (स्मित करते) बघ, राधे बघ. आतांतरी झाली तुझी खात्री?

**माझ्यावरती हरिची प्रीती**
**पूर्ण असे, हें ठाउक जगतीं;**
**मग कां तोरा धरिशी चित्तीं?**
**गवळणि राधे ग!**

**राधा**—अग वेडे,

**नयन तुझे हे झांकुनि हरिनें**
**चुंबियलें मज प्रेमभरानें,**
**खचित ठकविलें तुज कृष्णानें**
**मजवरि प्रेमा गे!**

तुलाच काय, पण ही बघ मलादिखील रत्नमाला घातली आहे! (दाखविते.)

**नारद**—(नाचत नाचत एकदम पुढें येऊन)

**राधाधरमधुमिलिंद। हरि हा, राधाधरमधुमिलिंद!**
**भामे तुजवरि प्रीती नच करि**
**राधासक्त मुकुंद! हरि हा, राधाधरमधुमिलिंद!**

**सत्यभामा**—(रागानें संतप्त होते, कृष्ण तिचें चुंबन घेण्यास सरसावतो व ती त्यास झिडकारते.)

[चाल—नुपेक्षावें मला नृपराज.]

पुरे खोटी प्रीत यदुराय, कंठचि चिरिला हाय!
झालां खचित कसाय!
राधेवरती, करुनी प्रीती, ठकवितसां मज काय?
मानहानि परि, बरवें होतें, चिरितां जरि कंठातें,
ही स्थिति दुःसह! करितें जाउनि, कांहिं जिवास अपाय! ॥ १ ॥

कृष्ण—

प्रिये! पदिं तव विनत यदुराय, सुंदरि! रुसशी काय?
तुजवरि प्रेमा असतां माझा, शंकिशि तूं अशि काय?
प्रियतम भामा, एकलि रामा, त्यजिं त्यजिं सखि! संकोपा!
हीं वचशल्यें सहवत नच मज, करिं तरि यास उपाय. ॥ १ ॥

(कृष्ण तिचा हात धरतो, ती सोडवून घेण्यास झटते.)

सत्यभामा—

असे खोटी प्रीत यदुराय! कंठचि चिरिला हाय!

कृष्ण—(सत्यभामेस) हें काय बरें असें?

नच सुंदरि करूं कोपा। मजवरिं धरिं अनुकंपा!

सत्यभामा—रमाबाई, हें काय! हें कुठलं म्हटलंत बाई पद? सौभद्रांतलं नव्हे का हें?

कृष्ण—पण कृष्णाच्याच तोंडचें आहेना हें? भामे, आपल्याला नाहीं आतां धीर निघत. तर चल ये, आणि माझ्या अपराधाबद्दलः—

करपाशीं या तनुला। बांधुनि करिं शिक्षेला!

नारद—कृष्णा, हिच्यावर तुझें खरें प्रेम नसतांना उगीच हा मानभावीपणा कां करतोस वरतीं?

सत्यभामा—(हात सोडवून घेऊन) तुमच्या या फसवेगिरीनं रुक्मिणी-सारख्या भोळ्या बायका फसतील. मी नाहीं फसायची, समजलं? नको, नको, नको! हा संसारच नको मला यापुढं! मुनिराय, चला मी तुमच्याबरोबर येत्यें. मला स्वर्गलोकीं न्या, अथवा एखाद्या चांगल्या रम्य अशा गिरिकंदरीं घेऊन चला. तिथं मी आपली मला मिळतील तीं कंदमुळं खाऊन ईश्वरभजन करून राहीन खुशाल आनंदानं! मला आतां ही द्वारका नको. कारणः—

[ चाल—संताप हा ताप. ]

संसार हा फार असार हा

कृष्ण—

रमणवदन त्यजिति रमणि तयांस !

सत्यभामा—छे:, तसं नव्हे. तर—

रमणिवदन त्यजिति रमण तयांस !

कृष्ण—

सुंदरि ! तरि उगि रोष नको धरूं
वदनकमल हें तव असें प्रिये नको दुरी करूं ! ॥१॥ संसार० ॥

सत्यभामा—

कपटि प्रीत ही मज अजि कळली
कां झटतां मग उगी असें मदीयका करा हरी ! ॥२॥ संसार०॥

नारद—

संसार हा फार असार हा
श्रीहरिचरण त्यजुनि भ्रमत तयांस !

कृष्ण—सुंदरी ! मुनि नारद काय म्हणतात तेंतरी ऐक:—

कोप कुटिलतर खचित असे हा
अर्पिं मद्धरीं सखि ! तया निजाधरीं नको धरूं ! ॥३॥ संसार०॥

जयंती—( सत्यभामेचा हात कृष्णाचे हातांत देऊन ) सखे, श्रीकृष्ण तुझी इतकी मनधरणी करित असतां त्याचेवर कां अशी रागावतेस उगीच ?

[चाल—फुलें सुवासिक हीं.]

करीं धरा सखिच्या । करा या।
संतापवन्हि हृदयास पेटवी त्यास शमविं सदया ! । ध्रु०।
तो कृतांत मत्सर सखिच्या अंतरिं शिरला,
जाळितो राधिका-श्रीहरि-प्रेमा इजला,
भामका प्रेमळा अधिक तुह्मां हे विमला,
कां उशिर तरी ? न्या या । विलया. ॥ १ ॥
करीं धरा सखिच्या करा या !

**कृष्ण**—मग माझ्याकडून कुठें ना आहे?

[ चाल—मजवरि तरु कुसुमरेणु. ]

**सोड सोड सोड सखे! धरिं न आग्रहा !**
**शशिवदने! तुजविण प्रिय कोणि नच पहा—**

( इतक्यांत 'यमू यमू' ह्मणून दरवाजावर हांका ऐकूं येतात व सर्वत्रांची एकच धांदल उडते. )

**यमू**—अग बाई, कुणी गांवाहून आलं वाटतं. आपल्याच दरवाजाशीं गाडी थांबली !

**मोहना**—म्हणजे ! मुंबईहून यायचं झालं कीं काय? पण या वेळीं कुठली गाडी?

**यमू**—होय, वसंतरावांचीच हांक ही ! माझ्याच नांवानं हांक मारताहेत !

**सत्यभामा**—होय तिकडचीच हांक ही ! ( निळू, ताई ह्मणून हांक मारतो ती ऐकून ) ही निळूची हांक दिसते !

**मोहना**—मुकुंदराव, आतां कसं? सत्यभामे, तूं अन् यमू तेवढे ते पडदे गुंडाळा. मुकुंदराव—

**मुकुंदराव**—आतां काय? मीं सांगितलेली युक्ती करा म्हणजे झालें. ( मुकुंदराव आपला पूर्वीचा पोषाख करूं लागतो. ) तुह्मांला सांगितल्याप्रमाणें तुह्मी आंत महालक्ष्मीचा मुखवटा मांडलाच आहेत तिच्यापुढें घागरी घेऊन फुंकत रहा. नाहींतर सोंगट्यांचा पट मांडून खेळूं लागा. मी या माधवरा—( जीभ चावून ) रमाअक्कांनां घेऊन मागच्या दारानें जातों.

**मोहना**—या तर.

**माधवराव**—येतों, पण एकदा—

**सत्यभामा**—'येतों!' रमाबाई, अजुनी काय ही थट्टा! नाटक का चाललंय आतां? उरलेलं पुढचं नाटक आणखी करूं एक दिवस. हें असं होईल हें कुणाला ठाऊक? थांबा, कुंकूं लावतें.

**मुकुंदराव**—( माधवरावांस चिमटा घेतो ) हं, ओळख देऊं नका आतांच. ही वेळ नव्हे. ( पेंद्यास ) बाळप्पा, तूं झोंपेंतून उठल्याचा बहाणा कर. ( मोहनेस ) येतोंतर आह्मी.

[ माधवराव व मुकुंदराव मागल्या दारानें जातात. बाळप्पा "आलों आलों" ह्मणून ओरडत दरवाजाशीं जातो; मोहना, सत्यभामा, यमुना घागरी घेऊन फुंकूं लागतात, व प्रेक्षक स्त्रिया घरोघर जाऊं लागतात. वसंतराव, निळू व गाडीवाला पाकीट घेऊन आंत येतात. निळू गाडीवाल्यास पैसे देतो व तो जातो.

**मोहना**—ह्या वेळची कोणची गाडी?

**वसंतराव**—अकरांची गाडी. तपासणीमुळें जरा उशीर झाला यायला. बरें, पण हे दिवे अन् पडदे कसले हे? आणि ही मंडळी कसली जमली होती?

**मोहना**—आज महालक्ष्मी नव्हे का? घागरी फुंकायला बायका आल्या होत्या झालं.

**वसंतराव**—अस्सें. (स्वगत) मला वाटलें घरांत नाटकें सुरू झालीं कीं काय?

**मोहना**—बरं, पण जेवायचं असेल नव्हे का?

**वसंतराव**—छत्! आतां बराच उशीर झाला, थोडा फराळ करीन झालें.

**मोहना**—चलायचं तर. [जातात.

**निळू**—(स्वगत) मुकुंदराव आणि माधवरावच तर ते! बरें, पण अशा रात्रीं कशाला आले होते ते इथें? 'नाटक मोठें नामी झालें. मोहनाबाईनें आपलें काम सुरेख केलें, आणि तुम्हींहि पण बहार उडवलीत.' असें कायसेंसें ह्मणत गेले ते! इथें हे पडदे दिसताहेत! आरासहि केली आहे! अन् महालक्ष्मी बशिवली आहे! तेव्हां काय, आहे काय प्रकार हा? मला वाटतें, आतां घरीं नाटकें होऊं लागलीं! अथवा त्या मुकुंदरावानेंचतर नसेल त्या माधवरावाला इथें नाटकांत सोंग घ्यायला आणला? महालक्ष्मीचें हें नुसतें निमित्यच असेल! कांहीं असो, याचा नीट छडाच लाविला पाहिजे. याउप्पर मी इथें रहाणार नाहीं, आणि तिलाहि पण इथें ठेवणार नाहीं! जगांत अब्रूसारखी दुसरी प्यार गोष्ट नाहीं मनुष्याला. आणि ती जर इथें राहिल्यामुळें जाऊं लागली तर इथें रहाण्यांत अर्थ काय? वाइटाच्या संगतीनें चांगलें मनुष्यहि उगीचच्या उगीच विघडायचें. नाटकांतल्या अश्लील झगड्यांच्या तालमी जर बायका घरांत करूं लागल्या तर उद्यां त्या नाटकांत निघून जाणार नाहींत ह्मणून कशावरून! त्या कुठल्याशा प्रासादिक संगीत मंडळींततर एका भिक्षुकाची सून निघून गेल्याचें श्रीपतराव सांगत होते. ह्या नाटकांचे असेच परिणाम व्हायचे! राजशेखर कवीनें एका नटव्या नटाला पाहून कोणीएक स्त्री त्याच्यावर मोहित होऊन गेल्याचें सातव्या आठव्या शतकांत आपल्या 'विद्धशालभञ्जिकें'त नमूद करून ठेवलें आहे.

(इतक्यांत मोहना पुढें येते.)

**मोहना**—अण्णा, आंत फराळाला बसणार अन् तूं नाहीं का येत? तुला बोलवायला सांगितलंय मला. बरं, पण तूं गांवांत केव्हां आलास?

**निळू**—तुमचें नाटक सुरू झालें तेव्हां!

**मोहना**—( चपापून स्वगत ) ह्मणजे, याला कळलं कीं काय हें! ( उघड ) नाटक कसलं बाई. थट्टा करतोस वाटतं माझी हे पडदे बघून?

**निळू**—तरमग हे पडदे अन् ही आरास कशाला केली आहे इतकी आज?

**मोहना**—अरे, आज महालक्ष्मी नाहीं का आपल्या इथं यमूताईची?

**निळू**—अस्सें! अन् तो मुकुंदराव मागच्या दरवाजानें कां गेला तर?

**मोहना**—( चपापून ) मागच्या दरवाजानं? त्यांच्या आळीला मागच्या दरवाजानं अगदीं जवळ पडतं ह्मणून गेला असेल तिकडनं. त्याची बायको अन् त्या रमाबाई आल्या होत्या त्यांना घेऊन गेला तो.

**निळू**—रमाबाई कोण?

**मोहना**—ते यादवराव नाहींत का? त्यांचे मेव्हणे ते माधवराव त्यांची बहीण.

**निळू**—मुकुंदरावाबरोबर तर बायका दिसल्या नाहींत कुणी मला. त्याच्या-बरोबर कुणी एक पुरुषच दिसला. (एकीकडे) खास, इथें कांहींतरी घोटाळा आहे. नाहींतर मुकुंदराव मागच्या दरवाजानें गेला ह्मटल्याबरोबर ही कां इतकी चपापती!

**मोहना**—छेः, तो त्यांच्या इथला गडीबिडी असेल—

**निळू**—अस्सें! (स्वगत) खास इथें कांहींतरी काळेंबेरें आहे. (उघड) ताई, सोलापुराहून तार आली आहे.

**मोहना**—तार? तार कुणाची बाई! यमूताईच्या बापाकडून कीं काय? काय ह्मणून आली आहे?

**निळू**—आह्मांला दोघांनां मेलनें एकदम निघून या म्हणून लिहिलें आहे.

**मोहना**—खुशाल आहेत ना पण सगळीं?

**निळू**—तें कांहीं लिहिलें नाहीं त्यांत. हं, तर उशीर नको आतां, बरोबर काय द्यायचें असेल तें दे झटपट. गाडी आणली आहे. मेल गांठली पाहिजे.

**मोहना**—चल, देत्यें काय द्यायचं तें बांधून. आंत चल, देवापुढं सुपारीबिपारी ठेव, नमस्कार कर आणि नीघच.

**निळू**—मी आलोंच. तूं आंतलें आटप अगोदर. (मोहना जाते). ही छान युक्ति सुचली मला. आतांपर्यंत माझे डोळे उघडले नव्हते. आतां छान उघडले. श्रीपतराव किती दिवसांपासून बजावतोय मला.

तो मोठा कुलीन आणि सज्जन मनुष्य आहे. त्याची आई आणि बायकोहि तशींच सज्जन आहेत! 'तुझ्या मोहनाताईच्या नादानें तुझी बायको बिघडेल' ह्मणून तो मला कित्ती दिवस बजावतो आहे; तेव्हां आतां त्याच्या इथेंच जाऊन बिऱ्हाड ठोकावें! नाहींतर हिला द्यावी चार दिवस तिच्या बापाकडे पाठवून, आणि पुन्हा आली कीं निराळें बिऱ्हाड!

[ आंत जातो.

(पडदा वर होतो.)

**मोहना**—( यमूताईची ओटी भरून तिला कुंकूं लावते, निळूस सुपारी देते व दोघांचे हातावर दहीं घालते. ) जपून जा. अन् अण्णा, तूं गेल्याबरोबर सगळीं खुशाल असल्याचं पत्र घाल. विसरूं नकोस हो!

**निळू**—ठीक आहे.

[ जातात.

**मोहना**—( पोंचवून परत येऊन ) गेलीं एकदाचीं. ( स्वगत ) आजचा प्रकार सगळाच कांहीं चमत्कारिक! आह्मीं नाटक काय केलं! अन् मधींच येणं काय झालं! अन् यांचं एकदम जाणं काय झालं! सगळंच अकस्मित! पण, ज्या वेळेस हांका ऐकूं आल्या त्यावेळीं माझी काय स्थिति झाली पण!

[ पद—पति राखीं श्रीहरी. ]

**किति झालें घाबरी! पति येतां. । ध्रु० ।**
**नटवेषातें टाकुन देउन, आभरणांतें काढुन टाकुन**
**दिधलें परि मीं भिउनि अंतरीं. ॥ १ ॥ किति० ॥**
**युवति जमवुनी नाटक अभिनव, केलें ऐसें जानें कळलें तर,**
**काय वदति हें येइ मदंतरीं. ॥ २ ॥ किति० ॥**
**ऊरहि माझा धडधडला किति, कंपित झालें वाटुनि भीती,**
**चोरीची अति भयद स्थिति खरी. ॥ ३ ॥ किति० ॥**

[ जाते.

**[ पडदा पडतो. ]**

# अंक ५ वा.

## प्रवेश १ ला.

[ **स्थल**—श्रीपतरावाचें घर. गोविंदराव, निळकंठराव, आणि श्रीपतराव बोलत बसले आहेत असा प्रवेश. ]

**गोविंदराव**—काय? तर मग ती माधवरावाची बहीण रमाबाई नव्हती ह्मणतां? खुद्द माधवराव गेला होता?

**श्रीपतराव**—हो हो, खुद्द माधवराव. आपला निळकंठराव जो आमच्या इथें राह्यला आला तोतरी एवढ्याचकरितां! मी ह्मणतों, याचा जर तुह्मांला पडताळाच पाह्यचा असेल, तर तुह्मी माधवरावांच्या इथें जा आणि त्याला जरा खुलवून विचारा ह्मणजे सगळें सांगेल तो तुह्मांला. मात्र नीट त्याच्या पोटांत शिरून काढलें पाहिजे सगळें. अलीकडे तुमचा अन् त्यांचा परिचयहि बराच झाला आहे.

**गोविंदराव**—अस्सें! ठीक आहे तरमग!

**श्रीपतराव**—पहिल्यापासूनच ह्मणत नव्हतों मी गोविंदराव, कीं, हें चांगलें नव्हे. हा स्वातंत्र्याचा दुरुपयोग आहे! तुह्मी स्वतः होऊन जर बायकांनां नाटकें शिकवूं लागलां, तर काय ह्मणावें तुह्मांला! You must educate your women, but this is not the way to do it!

**निळकंठराव**—नाहीं, त्यांनां पदें शिकवा, त्यांनां नाटकांतले अभिनय करायला शिकवा, आणि त्यांनां नाटकांत नेऊन नाचवा, ह्मणजे तुमच्या सुधारणादेवीचा चांगला जयजयकार होईल! नुसतीं पोरें बिघडलीं आहेत तेवढें बस्स नाहीं तुह्मांला! सुधारणाशकटाचीं दोन्हीं चक्रें सारखीं चाललीं पाहिजेत! कां, असेंच कीं नाहीं?

**श्रीपतराव**—आठआठ दहादहा वर्षांच्या पोरांचे–विक्रमशशिकलेंतल्या झगड्यांचे पाठ कसे चालले असतात, टारगीं पोरें रस्त्यांतून जाणाऱ्यायेणाऱ्या स्त्रियांनां उद्देशून केव्हां केव्हां **'लोपविली बहुत शोभा,'** नाहींतर **'वस्त्रानें देह सारा सुंदरिनें झांकिला,'** नाहींतर **'नगनग पळून जाऊं तूं नारी,'** हीं पदें कशीं निर्लज्जपणानें ह्मणत असतात हेंहि तुमच्या नजरेला मीं पांचदहा वेळ आणून दिलें आहे. इतक्या थरावर गोष्टी आल्या असूनहि हें पसंत आहेका तुह्मांला?

**गोविंदराव**—अशा बीभत्स नाटकांचे हे अनिष्ट परिणाम आहेत खरे! पण ज्यांची बुद्धि प्रगल्भ झाली आहे त्यांनां नाटकें दाखवायला काय हरकत आहे?

**निळकंठराव**—एकंदरींत शाकुंतल, मृच्छकटिक हीं बीभत्स नाटकांत काढलींत आपण! शाबास! कालिदासाला आणि शूद्रकाला हीं नवीन सर्टिफिकीटें मिळालीं ह्मणायचीं तर!

**गोविंदराव**—तसें नव्हे हो माझें ह्मणणें. त्यांतील फाजील शृंगारिक भागाला अनुलक्षून माझें बोलणें होतें.

**निळकंठराव**—अस्सें! तरी लौकरच सुधारून घेतलेंत ह्मणायचें!

**गोविंदराव**—यांत सुधारून तें काय घेतलें?

**निळकंठराव**—तरमग तीं नाटकें बीभत्स नाहींत?

**गोविंदराव**—तशीं बीभत्स नाहींत तीं; पण त्यांतील फाजील शृंगारिक भागासंबंधानें मात्र तीं तशीं आहेत.

**निळकंठराव**—तरमग तीं बीभत्स आहेत!

**गोविंदराव**—असा अर्थविपर्यास करूं नका. माझ्या बोलण्याचा उद्देश आणि कटाक्ष काय होता त्याच्याकडे लक्ष द्या. तीं बीभत्स आहेत असें ह्मणण्याचा जर माझा उद्देश असता तर, ज्यांची बुद्धि प्रगल्भ झाली आहे त्यांनां तीं दाखवायाला काय हरकत आहे, असे उद्गार मीं कधींच काढले नसते.

**निळकंठराव**—पण असें तुह्मांला खरोखरीच वाटतें का?

**गोविंदराव**—खरोखरी वाटतें का ह्मणजे? खरोखर वाटतें ह्मणूनच ह्मणतों.

**निळकंठराव**—असें असेल तर तिथेंच चुकतें आहे तुमचें. There is your pit-fall!

**गोविंदराव**—(श्रीपतरावास) ठीक आहे, येतोंतर मी! श्रीपतराव, I thank you for your kind advice in the matter. (जातो व जातां जातां स्वगत) Ah! He kissed my wife! But she was not conscious of it! तिला दोष लावून काय उपयोग! हा दोष माझ्या मूर्खपणाला आणि अविचारालाच लावला पाहिजे! श्रीपतरावांनीं सांगितल्याप्रमाणें आतां अगोदर त्या माधवरावांच्या इथेंच जातों, ह्मणजे शहानिशा होईल सगळा! [ जातो.

**श्रीपतराव**—माधवरावाला यांनीं खुलिवला ह्मणजे तो सगळें सांगेल यांनां. आणि यांची बालंबाल खात्री जाईल होऊन. सत्यभामा झालेल्या बाईचें अन् मोहनेचें माधवरावांनीं चुंबन घेतलें ह्मणून त्यांनां आपण सांगितल्याबरोबर त्यांचा चेहेरा खरकन उतरला!

**निळकंठराव**—हो, उतरला ह्मणजे? बायकांनां नाटकें दाखविण्याचे–आणि त्यांनां नाटकें करायला उत्तेजन देण्याचे दुष्परिणाम आत्तां त्यांचे लक्ष्यांत आले.

**श्रीपतराव**—तें उघडच आहे. पण हें तुमचें एकसहा विधान मात्र नाहीं आपल्याला पसंत! बायकांनां नाटकें दाखविल्यानें हटकून वाईटच परिणाम होतात ही गोष्ट नाहीं आपल्याला कबूल. कारण, मला नेहमीं दोनचारतरी फुकट तिकिटें मिळतात आणि आमच्या इथल्या बायका नाटकालाहि पण जातात वरचेवर; पण त्याचे कांहीं वाईट परिणाम झाल्याचें माझ्यातरी नाहीं दृष्टोत्पत्तीला आलें. अहो, बायका सुजाण, विचारी आणि प्रबुद्ध असल्यावर त्यांच्या मनावर वाईट परिणाम होणें संभवतच नाहीं. आतां तुह्मीं ह्मणतां ती गोष्ट अप्रबुद्ध, अविचारी आणि स्वच्छंदी स्त्रियांनां मात्र लागू आहे. नाहीं असें नाहीं. तरीपण त्यांच्यावरदेखील घरांतल्या पुरुषांचा जर योग्य दाब असेल तरमग काय बिशाद आहे?

**निळकंठराव**—तुह्मी ह्मणतां तें खरें. दाबानें थोडेंबहुत कार्य होईल हें खरें आहे. पण हें पहा, ह्या बाह्य दाबाचा कितीवेळ टिकाव लागणार? गढूळ मनोवृत्तींची भयंकर वाफ आंतल्या आंत सांचून सळसळूं लागली म्हणजे वरचें दडपण केव्हां आणि कसें उडून जाईल हें कांहीं सांगतां येणार नाहीं. आतां, नाटकें पाहून तत्काळ वाईट परिणाम घडल्याचें जरी स्पष्टपणें दिसून आलें नाहीं, तरी त्या दिशेनें थोडथोडें कार्य—मग तें अदृश्य कां असेना—होत असलेंच पाहिजे!

**श्रीपतराव**—तात्विकदृष्ट्या तुमचें ह्मणणें बरोबर आहे. पण व्यवहारांतला प्रत्यक्ष अनुभव मात्र तसाच केवळ नाहीं. हें यादवरावांचेंच उदाहरण पहाना. ते आपल्या घरच्या सगळ्या मंडळीला घेऊन जातात नाटकांनां केव्हांकेव्हां; पण त्यांच्या इथली मंडळी कशी आहे? अहाहा! किती बाळबोध घराणें! वाईट परिणाम जे व्हायचे ते नेहमीं उल्लु मंडळीवर. There are bad reports about your वसंतरावा's wife. You must put him on his guard.

**निळकंठराव**—Yes, that I shall do. येतोंतर.

**श्रीपतराव**—चला, मलाहि यायचेंच आहे बाहेर.

[ दोघेहि जातात.

---

## प्रवेश २ रा.

[ **स्थल**—माधवरावाचें घर. माधवराव व गोविंदराव बोलत बसले आहेत असा प्रवेश. ]

**गोविंदराव**—एकंदरींत अशी बहार झाली म्हणतां एकून !

**माधवराव**—तें काय सांगूं? त्या दिवशीं तो वसंतराव का न येता म्हणजे बहारच बहार झाली असती ! त्या दिवशींच्या नाटकाला इतका कांहीं रंग आला होता कीं, ज्याचें नांव तें ! आणखी आमचा मुकुंदरावहि मोठा गमती ! त्यानें नारदाचें काम हुबेहुब अगदीं बाळा नाटेकरासारखें केलें. आणि त्या मोहनेनें सत्यभामेचें काम केलेंन तें इतकें सुरेख केलें कीं, त्यापुढें किर्लोस्करांतला भावड्या काय करील ! त्या ताना—तो आवाज–अन् ते हावभाव–कांहीं विचारूं नका!

**गोविंदराव**—अन् राधेचें काम कुणीं केलें?

**माधवराव**—ती कोण होती हें नाहीं मला ठाऊक. पण मोठी नखरेबाज बायको होती ती!

**गोविंदराव**—( ओंठ चावून ) नखरेबाज होती अं!

**माधवराव**—होती काळीसांवळीच, पण नाकाडोळ्यांनीं फार सुरेख आणि मोठी ठसकेदार होती ! तिनें एकदोनच पदें ह्मटलीन पण किर्लोसकरांतल्या त्या चिंल्यासारखीं अगदीं जिथल्या तिथें ठेक्यांत ! मोहनेचे डोळे झांकून मीं जेव्हां तिचें चुंबन घेतलें तेव्हां ती जरा शहारल्यासारखी दिसली. अन् मलाहि पण त्यावेळीं कसेंसेंच वाटलें! परस्त्रीला स्पर्श करणें एकंदरींत मोठें भयंकर!

**गोविंदराव**—एकंदरींत तुह्मीं तिचें चुंबन घेतलेंत! आणि तें दुसऱ्याच्या स्त्रीचें!

**माधवराव**—हो, पण नाटकांतच जर असे प्रसंग आले तर असें करायला कांहीं हरकत नाहीं, असें तुम्हींच ह्मणालां होतांना? हें पहा गोविंदराव, एकंदरींत त्या दोघी तिघींचे ते हावभाव, ते अभिनय, आणि ते मधुर कंठ पाहून मला असें वाटलें कीं, बायका असाव्यात तर अशा रसिक असाव्या ! नाहींतर काय!

[ **चाल**—या विधिचा अंत न लागे. ]

**या जगतीं सौख्य न कांहीं लाभत नाहीं मनुजां पाहीं,**
**रसिक जरी ती भार्या नाहीं;**
**सकलहि जीवित मग तें भारचि वाही ! । ध्रु० ।**

**अन्या युवती मंजुरवांहीं, ताना घेती आलापांहीं,**
**परिसुनि त्यां मन मोहुनि जाई, चांचल्यें मति-विभ्रम होई! ॥ १ ॥**
**नाट्य अभिनया त्यांचे ठायीं, देखुनि वाढत उत्कंठा ही;**
**वाटे लाभत अशि ज्या सखि ही, धन्य तोचि नर जगतीं पाहीं! ॥२॥**

**गोविंदराव**—मग तुमची स्त्री काय अशी नाहीं रसिक ह्मणतां?

**माधवराव**—छेः छेः, तिचें नांवसुद्धां काढूं नका! तिच्यांत नाट्य नाहीं, अभिनय नाहीं, रसिकता नाहीं, कांहीं नाहीं!

(इतक्यांत एका बाजूनें मुकुंदराव येतो.)

**मुकुंदराव**—(स्वगत) तो भिकंभट फार लावालावी करणारा आहे. त्याचें माधवरावांच्या इथें जाणेंयेणें बंद करून टाकलें कीं एक मोठेंच काम उरकलें! निरीलातर त्या यादवरावांच्या इथें जायची बंद केलीच! कालच्या निनांवी पत्रांनीं भिकंभटाच्या वाईटचालीसंबंधानें माधवरावांचें मन जास्त कलुषित झालेंच पाहिजे. तेवढें झालें कीं आपलें काम फत्ते झालें! पहिल्यानें या दोन्ही कुत्र्यांचीं तोंडें अगोदर बंद केलीं पाहिजेत. (गोविंदरावास पाहून स्वगत) आज ही स्वारी कुणीकडे इकडे? कांहीं समजत नाहीं! (जवळ येतो.)

**गोविंदराव**—(मुकुंदरावास पाहून) बरें आहे. मी येतोंतर आतां. मला जेवून कॉलेजांत जायचें आहे. तुह्मांला काय?

**मुकुंदराव**—(अगदीं जवळ येऊन) बसा हो, जाल म्हणे. आपण आतांशा चुकूनसुद्धां आमच्या इंद्रभुवनाकडे फिरकत नाहीं? येत जा केव्हांतरी एखादवेळ फुरसतीनें.

**गोविंदराव**—परीक्षा जवळ आल्यामुळें वेळ नाहीं मिळत. नाहींतर यायला काय? (माधवरावांस) बरें आहे, येतोंचतर (जातांजातां स्वगत) एकून Kissing संबंधानें इंग्लंडांत चाललेल्या चर्चेबद्दल मीच याचेजवळ बोललों होतों! [जातो.

**माधवराव**—या. (मुकुंदरावास) मुकुंदराव, त्या गुलाबाच्या फुलाचें काय झालें? तयार झालें कीं नाहीं तें अजून?

**मुकुंदराव**—हो, तयार झालें असेल तर. आणि तेवढ्याचकरितां तर मी मुद्दाम आलों. ह्मटलें, त्या रत्नमाला आणल्या, त्याची उरलेली बाकीहि जातांजातां त्या बाळूभाईकडे पोंचवावी अन् येतांना फूल घेऊन यावें. कुणाचें देणें असलें ह्मणजे मग त्याच्या घरावरून जाणेंदेखील मोठें ओशाळें वाटतें. त्याला तोंड दाखविणें ह्मणजे मोठी चोरी; आणि प्रत्यक्ष भेटतर मरणाहून मरण!

**माधवराव**—हो, तें बरोबर आहे हो. आणि तेवढ्याचकरितां कालच मीं रक्कम ब्यांकेंतून काढून आणून ठेवली आहे. चला, एकदा देऊन टाका जिकडच्यातिकडे ह्मणजे बरें. मग तुह्मांला ओशाळें व्हायला नको कुणाचें, आणि मलाहि पण हें नसतें लचांड जवळ बाळगायला नको. नाहींतर त्या नोटींच्या सारखें व्हायचें आणखी!

**मुकुंदराव**—एकून अजून त्यांचा पत्ता नाहीं! मोठेंच आश्चर्य ह्मणायचें! बरें, पण तें पत्रतरी मिळालें का कुठें शेवटीं?

**माधवराव**—छेः हो! त्यामुळेंतर मी अगदीं वेड्यासारखा झालों आहें.

**मुकुंदराव**—अजून मिळालें नाहीं? ह्मणजे मोठाच चमत्कार! तरमग निःसंशय तें त्यांच्याच हातीं लागलें आहे.

**माधवराव**—पहिल्यानें मला नुसता संशय आला होता; पण आतां त्यासंबंधानें माझी जास्तजास्त खात्री होत चालली आहे. तें पत्र आणि त्या नोटी एकाच्याच हातीं लागल्या असल्या पाहिजेत! आणि यादवराव तुम्हांला तें पत्र दाखवून जें बोलले ह्मणालांत तें ऐकल्यापासूनतर माझ्या डोक्यांत चांगलाच प्रकाश पडला!

**मुकुंदराव**—काय असेल हरि जाणे! मनुष्याला कोणच्या वेळीं कशी बुद्धि होईल याचा कांहीं नेम नाहीं सांगवत!

**माधवराव**—अहो, त्या नोटी गेल्याचें नाहीं मला इतकें वाईट वाटत. पण त्याबरोबर तें पत्र गेलें ह्मणून मी फार फिकीरींत आहे! थांबा. मी हा आलोंच इतक्यांत—

[आंत जातो.

**मुकुंदराव**—हो, फिकीरींत म्हणजे! (स्वगत) तुला असें फिकीरींत पाडल्याशिवाय माझी पैशाची जिकीर कशी नाहींशी होणार! तेवढ्याचकरितांतर हा सारा घाट! यादवराव मला भेटतो कशाला आणि भेटला तरी मी त्याला तोंड दाखवितों कशाला! हा म्हणतो कीं, त्या नोटा आणि तें पत्र एकाच्याच हातीं लागलें असलें पाहिजे. हा याचा तर्क अगदीं खरा आहे. पण त्या माझ्या हातीं लागल्याबद्दल याचा तर्क चालत नाहीं, एवढ्यानें बरें आहे.

(इतक्यांत माधवराव येतो.)

**माधवराव**—ह्या शंभरां शंभरांच्या तीन नोटी आहेत. रक्कम जिकडच्या तिकडे देऊन मोकळे व्हा.

(इतक्यांत चेंडू उडवित किशा येतो.)

**किशा**—लावसाहेब, च्हा झालाय, येताना आत?

(इतक्यांत टपालवाला येतो व पत्रें देतो.)

**मुकुंदराव**—मी येतोंतर.

**माधवराव**—चहा घेऊन चला.

**मुकुंदराव**—छे; चहाविहा कांहीं नको. मी हा आतांच घेऊन आलों आहें घरून. आतां मुळींच इच्छा नाहीं, येतों मीं.

(मुकुंदराव जातो व माधवराव पत्रें फोडूं लागतो.)

**किशा**—लावसाहेब, च्हा निऊन जाईल, चला, आत जाऊ.

**माधवराव**—चल, चल.

[दोघेहि आंत जातात.

**मुकुंदराव**—(जातांजातां नोटांकडे पाहून) आजकाल जगांत ह्याची चहा आहे! ह्या चहापुढें त्या सळसळलेल्या पाण्याची काय किंमत! हे रुपयेतर पडलेच पदरांत! आतां क्लबाकडे जावें! आजच्या ह्या पत्रांत मोहनेचें पत्र त्याला मिळणारच! तो वसंतरावाचा पोषाख अन् यांनीं सांगितलेलें गुलाबाचें फूल अशीं दोन्ही देऊं दुपारीं याच्याकडे पाठवून! आणि मग असें संध्याकाळीं भेटूं याला. अगोदर क्लबाकडे जावें अन् मंडळीला गांठावें. एक त्या गोपाळराव लुकतुक्याला गांठलें ह्मणजे सगळें काम होईल! ही स्वारी तिथें गेल्याची खबर ठेवून आमची क्लबाची मंडळी तिथें पोलिसच्या शिपायांचे पोषाख करून गेली, कीं या माधवरावाकडून आणि त्या मोहनेकडून पैसे काढायला किती उशीर! थोडा धाक-दपटशा दाखिवला कीं झालें! आणि ही गोपाळराव वगैरे मंडळी तिकडे गुंतली म्हणजे आपण मोहनेच्या दागिन्यांच्या पेटीवर डल्ला मारावा ह्मणजे जन्माचें कोटकल्याण होईल! बस्स, हीच युक्तीतर! त्या पांडू शिपायाला गांठून त्याच्या तोंडावर कांहीं फेंकलें ह्मणजे हवेतितके ड्रेसेस आणून देईल तो! (इतक्यांत घरांतून भिकंभट येतो त्यास पाहून) ये ह्मणावें लेका! माझ्या जिथेंतिथें नालस्त्या करतोस नाहीं! माधवरावांच्याजवळ माझ्या पत्रांनीं छान बार भरून ठेवला आहे. ते आतां तुला उभेदेखील नाहीं करणार इथें! जावेंच तर आतां. यापुढें इथें उभें रहाण्यांत अर्थ नाहीं.

**भिकंभट**—(घरांतून बाहेर पडत असतां) हः हः हः हः! मला वाटलें, ब्राह्मणाला तांबूलदान करण्याचा बेत आहे वाटतें! (बाहेर येऊन स्वगत) वहिनी-साहेबांनीं सांगितलेलें तेवढें विड्याचें सामान आणि कुंची घ्यावी आणि द्यावी मंगळ्याजवळ. मंगळ, मंगळ! [ हांका मारित जातो.

**मुकुंदराव**—अरेरे! याची अन् माधवरावांची गांठ नाहीं पडली! ती पडायला पाहिजे होती! तर याला बाजारांत गांठतों आणि तुह्मांला रावसाहेबांनीं बोलिवलें आहे म्हणून देतों सांगून कुणाकडूनतरी. ह्मणजे आपला गोळीबार बरोबर लागू पडेल! आणि जें व्हायला पाहिजे तें आपोआप होईल. या जगांत—

[ **चाल**—प्रधानाच्या घरीं जातों. ]

**शिध्या मार्गें न कांहींही। सुयंत्रित तें घडत पाहीं।**
**कुटिल कार्या कुटिल रीती। जगाची हे अशी नीती! ॥ १ ॥**

[ जातो.

---

## प्रवेश ३ रा.

[ **स्थल**—माधवरावाचें घर. माधवराव व सुंदराबाई प्रवेश करितात. ]

**माधवराव**—बोल, त्या भिकंभटाशीं काय बोलत होतीस?

**सुंदराबाई**—(स्फुंदत) काय बोलत होत्यें बाई मी त्यांच्याशीं?

**माधवराव**—आणखी—'काय बोलत होत्यें'? इतकी निर्लज्ज होशील असें वाटलें नव्हतें मला! त्याच्याशीं पानसुपारीच्या अन् विड्याच्या गोष्टी? (एकीकडे) ही त्याला तांबूलदान करणार!

**सुंदराबाई**—पानसुपारीच्या गोष्टी? ह्मणजे!

**माधवराव**—हो हो, पानसुपारीच्या! 'ह्मणजे' ह्मणे आणखी!

**सुंदराबाई**—हो, दादाला नवानवसानें मुलगा झाला, आज बारावा दिवस; तेव्हां खणकुंची आणि बाळंतविडा नको का न्यायला? ह्मणून त्यांनां तेवढं विड्याचं सामान आणि एक कुंची असं आणून द्या ह्मणून सांगितलं.

**माधवराव**—त्या यादवरावाशीं संबंध ठेवायचा नाहीं, ह्मणून शंभरदा सांगितलें, तरी पुन्हा लुब्र्यासारखी त्याच्या बारशाची तयारी करतेस! निर्लज्ज नाहींतर! एकून, आज बाळंतविडा घेऊन जायची तयारी आहे तर! जा, जा—खुशाल जा अन् त्याचें बारसें अन् बारावा अशीं दोन्हीहि एकदमच उरकून ये!

मनुष्यानें एक लाज सोडली ह्मणजे मग काय! आणि त्या हरामखोराच्या शिकवणीनें मुकुंदरावांवर नाहक कुभांड घेतेस?

**सुंदराबाई**—कुभांड?

**माधवराव**—हो हो, कुभांड! मुकुंदरावानें आमच्या इथें येऊं नये ह्मणून तुझीं आणि त्याचीं हीं कारस्थानें मला कळत नाहींत असें का समजतेस तूं? नोटा आणि रुपये गेले तेहि मुकुंदरावावर बालंट घालण्याकरितांच गेले, हें मी पक्कें जाणून आहें, समजलीस! तुझ्याशिवाय खास नाहीं गेले ते!

**सुंदराबाई**—काय वाटेल तें ह्मणावं! एक त्या देवालाच डोळे! त्यालाच ठाऊक असेल कुणीं घेतले आणि कुणीं नाहीं ते!

**माधवराव**—देवाला डोळे! आणि मनुष्याला चोरटा कारभार करायला हात! उद्यां संध्याकाळच्या आंत माझ्या नोटा, रुपये आणि त्यांत होते ते दुसरे कागदपत्र जिथल्या तिथें जाग्यावर आले पाहिजेत. नाहींतर पहा आपला विचार! भावाला मुलगा झाला ह्मणून त्याच्या बारशाबद्दल त्याला अहेर करायचा होता वाटतें मनांतून! चोर, हरामखोर जात नाहींतर—

**सुंदराबाई**—मी आज पंधरा दिवसांत घर सोडून बाहेरतरी गेल्यें आहे का कधीं!

**माधवराव**—(वेडावून) 'घर सोडून बाहेरतरी गेल्यें आहे का कध्धीं'! बाहेरच कशाला गेलें पाहिजे? ती निरी आणि तो भिकंभट आहे कीं तुझा! (इतक्यांत बाहेरून मुकुंदराव माधवरावास 'रावसाहेब' ह्मणून हांक मारतो.) आलों, आलों, आलों! (सुंदराबाईस) पुन्हा बजावून सांगतों, आज संध्याकाळच्या आंत नोटा, रुपये, अन् सगळे कागदपत्र जागच्या जागीं आले पाहिजेत. नाहींतर आपला विचार पहा!

[ तडक निघून जातो.

**सुंदराबाई**—(आपल्याशीं) देवा, तुलाच बाबा एक डोळे. हे रुपये अन् नोटा कुठल्या आणूं मीं आतां? हिकडची वृत्ति ही अशी कशानं बरं फिरली इतकी! कीं नाटकं पाहिल्यापासून आणि त्या मुकुंदरावांची गांठ पडल्यापासून हें सारं ओढवलं! पोषाख काय करायचा, बोलायचं काय, नाटकांतलीं बोलणीं काय ह्मणत बसायचं, काय एक आणि दोन! अन् भिकंभटाला मीं विड्याचं सामान

आणायला सांगितलं तर त्याच्याशीं बोलल्याबद्दल माझा संशय! काय करावं या कर्माला! अंबाबाई, तुझ्याशिवाय कोण करणार आहे माझं संकट निवारण:—

**अंबिके! जगदंबिके! करुणाकरे!**
**झणिं धाव घे, झणिं धाव घे, झणिं धाव गे!**
**मज पाव गे! मज पाव गे! भव-तारके!। ध्रु०।**
**संसार हा निःसार हा! यांतुनि करिं मज सत्वर पार गे. ॥ १ ॥**
**भक्तांस तूं विश्वास गे! यास्तव धरितें मी तव कांस गे! ॥ २ ॥**

अग, माझ्या हातून असं काय पाप घडलं होतं त्याचं मला हें फळ भोगावं लागत आहे!

(रडूं लागते इतक्यांत किशा रबरी चेंडूशीं खेळतखेळत येतो.)

**किशा**—आई, तूं कांग अशी ललतेस?

**सुंदराबाई**—(त्यास जवळ घेऊन व त्याचे तोंडावरून हात फिरवून) बाळा, रडूं नको तर काय करूं रे? देवानं रडंच लावलं आहेन माझ्या मागं.

**किशा**—(तिचे डोळे पुसतो) आई, ललूं नकोस बाई अशी!

**सुंदराबाई**—बाळ, नाहीं रडत हां! (स्वगत) मी कां रडत्यें हें याला कळत नाहीं हें एका प्रकारानं बरं नव्हे का? नाहींतर माझी ही स्थिति बघून याला किती दुःख झालं असतं बाई! मनुष्याला कांहीं न समजलेलंच बरं, म्हणजे कोणचीहि गोष्ट समजल्यानं त्याला जें दुःख व्हायचं तेंतरी नाहीं होणार मग त्याला! (हुंदके दावते).

**किशा**—आई, तूं हे असे हुंदके कां देतेस? आणि अशी हुश्श् कां कलतेस? मामाच्या घलीं जानालना आज तूं मला बालाच्या बालशाला घेऊन? हे बघ, माधा तो लावसाहेबानीं कलिवलेला पोशाक घाल मला.

**सुंदराबाई**—अग बाई! त्या पोषाखाच्या आठवणीनं माझ्या पोटांत कसं धस्स होतं. अन् हा मोठा झाल्यावर याचीहि तिकडच्यासारखीच स्थिति होईल कीं काय ह्मणून भय वाटतं मला! पण हे कुठच्या कुठचे विचार कां आणल्यें आहें मी मनांत!

**किशा**—मग घालतेसना तो माझा पोषाक—

**सुंदराबाई**—घालत्यें घालत्यें हां बाळ. जा निरीकडून काढवून आण पाहूं तो.

**किशा**—मग घालशील ?

**सुंदराबाई**—हो, घालीन बरं. (किशा जातो.) हा एवढा जर मागं पाश नसता, तर मीं केव्हांच माझ्या जिवाचं कांहींतरी करून घेतलं असतं. पण ह्या एका पाशामुळं जीव घोटाळतो मेला. (स्फुंदत)

**धावरे यदुराया ! किती अंत पहाशी ?**
**प्राणांत मांडिलासे, नये करुणा कैशी ? ॥ धावरे० ॥**
**संकटिं पडलें भारी, अजुनि न कां येशी ? ॥ धावरे० ॥**

**माधवराव**—(सुंदराबाई पद ह्मणत असतांना माधवराव बाहेरून एकदम येऊन) कां, रडतेस कां अशी ? मी जिवंत आहें अजून. मी मेल्यावर आहेच मग रडायचें ! तुझे माहेरीं जायचे बेत चालले आहेत नाहीं काय ? निरीला पाठवून त्या कारट्याला बोलावणीं आणवतेस ? सगळें कळलेंय मला. तुला माहेरीं जायचें असेल तर माझी ना नाहीं. मुकाट्यानें माझ्या डोळ्यांदेखत चालती हो. इथें एक घटकाभरदेखील राहूं नकोस. अन् तूं जात नसलीस तर मी होऊन घालवून देणार तुला ! (दांतओठ खाऊन) खचित, बायकांची जात काय करील आणि काय नाहीं हें पुरें कळून चुकलें आतां मला ! जा, तिथें भिकंभटहि येत जाईल. कांहीं काळजी नको करूंस !

**सुंदराबाई**—( स्फुंदत ) नको, नको, ऐकायलादिखील नकोत मला हे शब्द ! अंबाबाई, कुणीं मेल्यानं कान भरले आहेत इकडले, एक तुला ठाऊक !

**माधवराव**—तिला, तुला आणि त्याला—सगळ्यांनां ठाऊक आहे ! बोल, तयार आहेस कीं नाहीं तूं जायला ?

**सुंदराबाई**—( आंसवांनीं भरलेले डोळे वर करून ) हें पहा,–घरांतच काय होतंय तें होऊंदे. बाहेर नको आणखी माझी विटंबना अन् हंसं व्हायला !

**माधवराव**—अस्सें ! तर तुला बाहेरच गेलें पाहिजे !

**सुंदराबाई**—( खालीं मान घालून स्फुंदते. )

**माधवराव**—बोल, जातेस कीं नाहीं ? ( तिला लाथ मारतो )

**सुंदराबाई**—हे अंबाबाई, हे धरणीमाते, तुम्हीतरी घ्याग मला आतां आपल्या पोटांत !

**माधवराव**—(तिचें डोकें जमिनीवर आपटून) घे घे, धरणीमाते! घे, लौकर घे हिला आपल्या पोटांत ! काय कांगावेखोरपणा !

**किशा**—( जवळ येऊन स्फुंदत उभा असलेला ) लावसाहेब, आईलाहो कां मालता उगीच?

**माधवराव**—हं! तूं आलासका विचारायला कां मारतों ह्मणून? तर घे-तुलाहि घे एक! (त्याचे तोंडांत फाड्दिशीं मारतो. किशा बेशुद्ध होऊन पडतो.)

**निरी**—( एकदम येऊन ) काय करताया धनीसाब ह्ये? त्या पोरास कशापायी मारता मदल्यामदी.

**माधवराव**—हं! तूं आलीस का आणखी मध्यें लुबरी! ( तिला मारतो ) तो भिकंभट कुठें आहे! त्याला घेऊन ये जा. चोर भांचोद कुंटिण नाहींतर! थांबा, तुह्मांला सगळ्यांनां हांकून देतों!

[ रागानें निघून जातो.

---

## प्रवेश ४ था.

[ **स्थल**—बुधवारबाग. मुकुंदराव बांकावर विचार करित बसला आहे ]

**मुकुंदराव**—रावसाहेब वसंतरावाचा पोषाख करून मोहनेकडे निघून गेले आहेत. रामा पांडूनें लागतील तितके पोलीस शिपायांचे पोषाक घेऊन जा ह्मणून सांगितलें आहेत. त्याच्याकडे जातों आणि शिपायांचे ड्रेसेस घेऊन क्लबाकडे जातों. आहेत त्या मंडळींत एक गोपाळराव लुकलुक्या आणि दुसरा तो सदाशिव-राव बेहेऱ्या, हे दोघेहि चांगले तरबेज आहेत. अर्धकच्चे नाहींत. त्यांनां मथवून ठेवलेंच आहे. त्या बाळप्पालाहि जमादाराचा ड्रेस घालून घेऊन येण्याविषयीं त्यांनां सुचिवलें आहे. कारण ती स्वारी दिसण्यांत चांगली लुटलुटीत आहे आणि त्या वेडसराला पोलिसाचा पोषाख करून नेला ह्मणजे हें सगळें थट्टेंत मोडेल आणि आमच्या भलत्यासलत्या हेतूविषयीं मग कुणाला शंकाहि यावयाची नाहीं. त्याला, बिन्याला आणि इतर मंडळीला नुसती गंमत करायला जायचें आहे ह्मणून सांगून ड्रेस देऊन घेऊन या ह्मणून सांगून ठेवलें आहे मीं त्या दोघांनां. त्या दोघांशिवाय तिसऱ्या कुणाजवळ अमक्याकरितां अमकीकडे जायचें आहे अशी मीं नुसती गोष्टदेखील काढली नाहीं. परस्परच भागिवलें आहे बहुतेक. तेव्हां यांत आपल्या अंगाशीं येण्याजोगी कांहीं भीति नाहीं दिसत. शिवाय त्या दोघांनां हेंहि पण सांगून ठेविल आहे कीं, माधवरावांपुढें आणि मोहनेपुढें आपल्याला स्वताला जातां येत नाहीं. यानें दोन्हीहि डाव साधले. एक माधवरावांला आणि त्या मोहनेला यांत आमलें कांहीं अंग आहे म्हणून संशय यायला नको, आणि दुसरें त्या पोरीच्या

अंगावरच्या दागदागिन्यांवर आणि आंतल्या पेटीवर डल्ला मारला ह्मणजे त्यांत दुसऱ्याची पाती नको. आणखी शिवाय हें आमचें कृत्य उघडकीला येऊन जर यदाकदाचित् किटाळ आलें, तर तेंहि परस्पर गोविंदरावावर आणि सदाशिवरावावर. आपण आपले करूनसवरून नामानिराळेच! त्या लुकतुक्याला मीं मोहनेच्या घरीं नेऊन सोडलें कीं मग मी मोकळा. तो सांगितल्याप्रमाणें अगदीं सुरळीतपणें पार पाडील सगळें. आणि इकडे मी त्या इंदूच्या अंगावरील दागिन्यांवर हात मारून जमल्यास तिला ठारहि करून टाकीन. आणि याचें किटाळ त्या आधुकमाधुकावर घातलें ह्मणजे यांच्याकडून आणखी जास्त पैसे उकळायला संधी सांपडेल! मिळून जिवंत असून अंगांत ताकद असे तोंपर्यंत मनुष्यानें जिकडून पैसा मिळवितां येईल तितका मिळवावा आणि मग ह्मातारपणीं स्वस्थ हरिहरि करित बसावें एखाद्या क्षेत्राच्याठिकाणीं जाऊन! मला अगदीं काळा पोषाख करून गेलें पाहिजे. आणि त्या पोरीला ठार करण्याला माधवरावांच्या इथें हत्यारें आहेत त्यांतलेंच एखादें हत्यार उपटलें पाहिजे. ह्मणजे पुढेंमागें आपल्यावर कांहीं येतेंसें वाटलें तर त्याच्यावर उलटायला आपल्याजवळ हत्यार झालें. तर आतां उशीर कां, त्यांच्याच घरावरून जावें. [ जातो.

---

## प्रवेश ५ वा.

[ **स्थल**—मोहनेचें घर व पुढील बाग. खिडकींत शामदान ठेविलें आहे व मोहना वारंवार बाहेर डोकावून पहात आहे, असा प्रवेश. ]

**मोहना**—माधवराव आले ह्मणजे त्यांनां हा कृष्णाकरितां केलेला पोषाख देईन. आणि मग— पण, ते येणार ह्मणून मी आज मुद्दाम शृंगारल्यें आहे पण त्यांच्या जोडीला मी कांहींतरी शोभेन का? ( आरसा घेऊन पाहूं लागते तों भीतीमुळें येणाऱ्या श्वासांनीं आरसा मलिन होतो व आपलें स्पष्ट प्रतिबिंब त्यांत दिसत नाहीं असें पाहून आरशास उद्देशून )

[ **चाल**—सुलभ मनिं गणा न भूपसुता. ]

**अद्य किति कठोर दर्पण हा!**
**मत्प्रतिबिंब न दावि अहा! । ध्रु० ।**
**वरिलीं वसनें । नव आभरणें,**
**सुमांस गंधवहा । कितितरी! ॥ १ ॥ अद्य० ॥**

हर्षित मन्मनिं । आलें होउनि
मुखाब्ज देखुं पहा । परि वृथा ! ॥ २ ॥ अद्य० ॥
मम निःश्वसितीं । मदीय कुमती
बघूनि शंकित हा । मुकुर[1] कां ? ॥ ३ ॥ अद्य० ॥
अ-सती वदना । प्रतिबिंबवि ना
घडेल पाप महा । ह्मणुनि कां ! ॥ ४ ॥ अद्य० ॥

तर, यांत मी पहातच नाहीं ह्मणजे झालं ! (आरसा टाकून देते.) पण, अजून कां नाहीं बाई यायचं ? मुकुंदरावांनींतर त्या दिवशीं मला अगदीं हातोहात फशिवली ! त्या दिवशीं जर मला कळतं कीं हे माधवराव आहेत ह्मणून तर— पण आतां काय त्याचं ? आज यायचं ठरलं आहेना ? मग मी ही अशी अधीरी आणि उतावीळ कां होत्यें ! माझं मलाच कांहीं कळेनासं झालं आहे. (चाहूल झालीसें वाटून) मला वाटतं कुणी आलं ! (उठून पहाते.) छेः, कुणी नाहीं ! ठरल्याप्रमाणें हें शामदानतर ठेवलंय इथं त्यांनां दिसेसं. (पुनः चाहूल वाटून उठून पहाते.) छेः, कुणी नाहीं ! मी शंभरदा उठल्यें अन् बघल्यें, पण फसल्यें. हें एकेक मिनीट ह्मणजे एकेक तासासारखं वाटतं आहे मला. बरं, पण वाजले तरी किती ! (घड्याळांत पहाते.) अगबाई, दहा वाजायला झाले. अन् अजून यायचं नाहीं ! मलातर आतां इथं मुळींदिखील करमेनासं झालं आहे.

[चाल—सुचिन्ह हें नच दिसे.]

एकटि कंठूं कशी निशा तरि,
एकटिला ही गमत भयंकर
रजनी कठिण कठीण ! विरहहि कठिण कठीण ॥ ध्रु० ॥
अजुनी प्रियकर येति न कैसे,
मदीय अंतर होई कातर;
कृष्ण तुह्मी, मी राधा होउनि
रंग करूं ही आस !
यास्तव सुचवित नव वेषांतर,
परि येइ न कां नकळे प्रियकर ! ॥ १ ॥
विरहहि कठिण कठीण ! रजनी कठिण कठीण !

---

१ आदर्श.

हो, बरी आठवण झाली! मोदी डाक्टरांच्यासारखा पोषाख करवून आणला आहे. ही नळी अन् हें थर्मामेटर का फर्मामेटर तें सगळं इथं या टेबलावर ठेवत्यें. माधवरावांनां येतांना तिकडच्या पोषाखानं यायला सांगितलं आहे. ते इथं आले आणि मग जरी कुणी आलं तरी हा पोषाख करून गेले ह्मणजे झालं. कुणाला काय समजणार? मी आजाऱ्याचं सोंग घेईन आणि हे मोदीसाहेब माझी प्रकृती पाह्यला आले होते ह्मणून सांगेन झालं. ह्मणजे कुणाला संशय यायचा नाहीं कीं कांहीं नाहीं! (घड्याळांत दहांचे ठोके पडतात.) दहा वाजले तरी अजून यायचं नाहीं! आले आणि त्या दिवशींसारखं झालं नाहीं म्हणजे झालं! या वेळीं माझी काय स्थिति झाली आहे पण! खरंच—

**त्या मदन मनोरम रूपीं मन माझें गुंतुनि गेलें!**
**कधिं वाहिन काया त्यासी प्रेमें ही ऐसें झालें!**

(तोंडानें हें पद्य गुणगुणूं लागते व हातानें टेबलावर पोषाख व इतर वस्तू शिस्तीनें मांडूं लागते. इतक्यांत बाहेर बागेशीं माधवराव व मुकुंदराव येतात.)

**माधवराव**—ठरल्याप्रमाणें तिथें शामदानतर दिसतें आहे. पण ती नाहीं दिसत. तेव्हां काय आहे समजत नाहीं!

**मुकुंदराव**—अहो, ती आंत असेल, तुमची वाट पाहूनपाहून दमली असेल. तुह्मी मुकाट्यानें तसे हळूच आंत जा.

**माधवराव**—छेः, आपला नाहीं बुवा धीर होत!

**मुकुंदराव**—तुः, एकून तुह्मी फार भित्रे दिसतां. असें भिऊन काय होतें? थांबा, मी हलकेच जाऊन पाहून येतों. मगतर झालें!

[ जातो.

**माधवराव**—मग हरकत नाहीं. (स्वगत) त्या दिवशीं नाहीं मला इतकी भीति वाटली. पण आज कांहीं माझी विलक्षण स्थिति होऊन गेली आहे!

[चाल—ते कुटिल कपटि काक.]

**हें हृदय उडत धडड भीतिनें!**
**सकल तनुस सुटत कंप, पद न ठरति लेशमात्र; मीहि मजविणें!**
**धरुनि हृदयिं काय आस। प्रवृत्त होत साहसास**
**जात सर्व स्मृति लयास। शून्यचि विस्मरणें. ॥१॥ हें हृदय०॥**

**मुकुंदराव**—(येऊन हलकेच) रावसाहेब, कां, तुह्मीं असे भितां कीं?

भिण्याचें कांहीं कारण नाहीं. तुह्मीं मुकाट्यानें जा. ती अगदीं एकटी आहे तिथें. कांहीं मांडामांड करण्यांत गर्क होऊन गेली आहे. इथें आतां कुणी चीटपांखरूं देखील फिरकण्याची भीति नाहीं. तुह्मी बेधडक आंत जा. मी मात्र जातों आतां.

[ जातो.

( माधवराव हळूच आंत जातो. )

**मोहना**—( चाहूल ऐकून ) कोण तें!

**माधवराव**—( स्वगत ) ह्मणजे!

( दोघेंहि भीतिवश होऊन कांहीं वेळ तटस्थ होतात. )

**मोहना**—( स्वगत ) अगबाई, हा माझा ऊर उडतो आहे कां असा ?

**माधवराव**—( स्वगत ) मी धीर करून इथें आलों, पण माझी छाती कां बरें इतकी धडधडूं लागली ?

**मोहना**—(स्वगत) माझ्या सर्वांगाला हें असं थरकांप कापरं काय भरलं आहे ?

**माधवराव**—(स्वगत) माझ्या सर्वांगाला हा दरदरून घाम कां सुटतो आहे ?

**मोहना**—( स्वगत ) मी अशी उभी रहाण्याचा कसाबसा प्रयत्न करित्यें आहें पण माझीं पावलं मला सांवरतां सांवरत नाहींशीं झालीं आहेत.

**माधवराव**—( स्वगत) आणि माझीं पावलें हीं जागच्या जागीं अगदीं खिळून कशीं गेलीं आहेत ? मला वाटतें, पापकर्म करण्यास प्रवृत्त होणारांचीं पावलें अशींच खिळून जातात !

**मोहना**—( स्वगत ) एकदम हें असं कां व्हावं, हें माझं मला कांहीं कळेनासं झालं आहे !

**माधवराव**—( स्वगत ) हें असें कां व्हावें याचा मी विचार करितों आहें, पण अद्याप याचें कारण माझ्या लक्ष्यांत येत नाहीं !

**मोहना**—( स्वगत) मी वर दृष्टी करून पहाण्याचा प्रयत्न करित्यें आहें पण तें माझ्याच्यानं होत नाहीं!

**माधवराव**—( स्वगत ) मी जरी कुठेंतरी बघतों आहें तरी तें शून्यदृष्टी होऊन पहातों आहें. मी काय पहातों याचें मला मुळींच ज्ञान नाहीं !

**मोहना**—( स्वगत ) मी बोलण्याचा किती धीर करित्यें आहें पण माझ्या तोंडून एक अवाक्षरहि उच्चारवत नाहीं !

**माधवराव**—( स्वगत ) तेव्हां हा सारा प्रकार निद्रावस्थेंत घडत आहे कीं जागृतींतच !

**मोहना**—( स्वगत ) यावरून मी अशी भ्रमांत पडल्यें कीं, मी जागी आहें कीं झोंपेंत आहें !

**माधवराव**—(स्वगत) निद्रावस्थेंत ह्मणावें तर या अपरिचित स्थलीं मी कसा !

**मोहना**—( इकडेतिकडे पाहून माधवरावाकडे चोरून पाहून त्यास ऐकूं येई अशा आवाजानें ) छेः, झोंपल्यें ह्मणावें तर एकदम हा सूर्योदय कसा व्हावा बरं !

**माधवराव**—(कांहीं ऐकूं आल्यामुळें चंचलदृष्टीनें इकडेतिकडे पाहून स्वगत) काय सूर्योदय ! सूर्योदय ह्मणून कुणीं ह्मटलें ? इथें चंद्रिकेचा दिव्य प्रकाश मी प्रत्यक्ष पहात असतां सूर्योदय झाल्याचें जर मी ऐकतों तर खचित मी झोंपेंत असून खरोखर कांहींतरी स्वप्नच पहात आहें !

**मोहना**—( स्वगत ) मला वाटतं, इतका वेळ मी झोंपेंत होत्यें, पण या सूर्योदयामुळं एकदम खडबडून जागी झाल्यें.

**माधवराव**—( स्वगत ) एरवीं सूर्योदय आणि चंद्रिकाप्रकाश हीं एकदम कशीं संभवावींत !

**मोहना**—( स्वगत ) पण जागी झाल्यें ह्मणावं तर मी आहेंतरी कुठं ? माझं मलाच कांहीं समजेनासं होऊन मी अगदीं गोंधळून गेल्यें आहें !

**माधवराव**—( स्वगत ) खचित, मी एखाद्या स्वप्नांत–जसा कांहीं जागा असून–कुठल्यातरी विलक्षण गोंधळांत सांपडलों आहें !

**मोहना**—(किंचित् मोठ्यानें ) पण इथं ह्या दिव्याच्या प्रकाशांत हे चित्रपट जर मी स्पष्ट बघत्यें आहें तर मग मी झोंपेंत कशी असेन !

**माधवराव**—( किंचित् मोठ्यानें) पण या दीपप्रकाशांत मी जर प्रत्यक्ष ही रतीची रमणीय आणि मनोहर मूर्ति पहात आहें तर ही स्वप्नसृष्टीतरी कशी ? मी झोंपेंत असून स्वप्नांतच कशावरून पहात नसेन हें !

**मोहना**—मला वाटतं, मी मयसभेंत असून हे दिव्य चित्रपट बघत्यें आहें !

**माधवराव**—मला वाटतें, मी गंधर्वलोकीं आहें आणि ही कुणीतरी दिव्य अप्सरा बघतों आहें !

**मोहना**—अहाहा ! हा मदालसाऋतुध्वजाचा चित्रपट किती गोड आहे !

**माधवराव**—त्यांत तिसरी दासी असल्यामुळें जरा बेरंग झाला आहे !

त्यापेक्षां हा किरातभिल्लिणीच्या वेषांत असलेल्या शंकरपार्वतीचा चित्रपट किती तरी मनोहर आहे !

**मोहना**—पातालकेतू राक्षसाच्या तावडींतून मदालसेची मुक्तता करून तिला भेटायला हा ऋतुध्वज आला आहे, तशी माझी या चित्तविभ्रमराक्षसाच्या तावडींतून मुक्तता करायला कुणी येईल का ?

**माधवराव**—आपल्या मोहनास्त्रानें ही भिल्लीण या किराताला आपल्याकडे ओढून आणित आहे त्यांतून जर अगोदर त्याची कुणीं सुटका केली तर मला वाटतें तो घेईल त्या दुष्ट राक्षसाचा समाचार !

**मोहना**—( स्वगत ) काय ? मोहनास्त्र ! माझं नांव यांनीं मोठ्या खुबीनं उच्चारलं ! आणि या चित्तविभ्रमराक्षसाच्या तावडींतून माझी मुक्तता करण्याचं मला यांनीं आश्वासनहि दिलं आहे ! तरी पण हें सारं आडूनआडून चाललं आहे ! प्रत्यक्ष असं मुळींच बोलायचं नाहीं ! तर आतां असंच ! ( किंचित् मोठ्यानें ) आपण होऊनच अगोदर बोलावं ह्मणून मी केव्हांपासून आपल्या मनाशीं कित्ती तरी धीर करत्यें आहें, पण तसं करायला मला धीरच होत नाहीं कसा तो ! कसा तें माझं मलाच कळेनासं झालं आहे ! अगदीं ओठाजवळ येतं, परंतु बाहेर पडत नाहीं ! ( जास्त मोठ्यानें ) यावरून मी झोंपेंत नाहीं खास ! पण मला वाटतं, माझ्यावर खास कुणीतरी जादूटोणा, मंत्रतंत्र नाहींतर चेटूक करून मला अगदीं भारून टाकलं आहे !

**माधवराव**—आणि माझ्यावर मोहनीमंत्राचा प्रयोग करून नाहींतर मोहनास्त्र टाकून मला अगदीं पाशबद्ध करून इथें कुणींतरी खेंचून आणलें आहे !

**मोहना**—असेल ! पण माधवाच्या–श्रीकृष्णाच्या–सुदर्शनचक्रापुढं त्या मोहनास्त्राचं काय चालणार !

**माधवराव**—( चपापून स्वगत ) मला वाटतें, भामाप्रकोपांत मी श्रीकृष्ण झालों त्याची ही ओळख ! ( उघड ) पण मोहनास्त्राच्या मोहनींत सांपडलेल्या माधवाला सुदर्शनाचा प्रयोग करण्याचें सुचेल तरना !

**मोहना**—( एकीकडे त्यास ऐकूं येई असें ) एकंदरींत माधवाला ठकविद्या मात्र चांगली साधली आहे ! पहिल्यापासून फसवणुकीनंच सुरुवात केली; आणि आतांहि तोच प्रकार चालिवला आहे ! ( उघड ) पण गडे, हें असं दुसऱ्याला फसवून अगदीं कळूं न देतां केव्हां यायचं ?

**माधवराव**—( चपापतो ) काय!

**मोहना**—कां? असं चपापायला काय झालं?

**माधवराव**—मनांत भीति वाटत असली ह्मणजे कोण चपापणार नाहीं!

**मोहना**—पण इथंतर भीति वाटण्यासारखं कांहीं नाहीं!

**माधवराव**—नसेल! पण मनांतल्या भीतीला कोण काय करणार?

**मोहना**—मग, त्या दिवशीं तालमीच्या वेळीं कुठं गेली होती ही भीति?

**माधवराव**—तें एक देवास ठाऊक!

**मोहना**—मीतरी त्या देवासच विचारित्यें आहें. पण देव मनुष्याला अंत लागूं देतील तरना! ते बहुरूपी आहेत!

**माधवराव**—देव काय मनुष्यासारखेच मायाबद्ध. जसें रूप घ्यावें तसें घेतात!

**मोहना**—तरमग ज्या वेषांत मला ही रत्नमाला प्रेमानं अर्पण केली त्याच मदनसुंदर माधवाच्या–श्रीकृष्णाच्या–वेषांत मला देवाचं दर्शन व्हावं!

**माधवराव**—मग प्रथमतः मला हा असा बहुरूपी कां बनवला?

**मोहना**—कां? जसं कांहीं कळतच नसेल!

**माधवराव**—कळतें, पण वळत नाहीं! कारण, मला जरी सगळें समजतें आहे तरी मी मोहनास्त्राच्या तावडींत सांपडल्यामुळें मला कांहीं उमजत नाहींसें झालें आहे!

**मोहना**—तें मोहनास्त्र काढून टाकण्याचातर मघांपासून मीप्रयत्न करित्यें आहें.

**माधवराव**—पण मलातर तें दुरूनहि जास्तच बद्ध करून टाकित आहे!

**मोहना**—मला वाटतं तें (पागोट्याकडे बोट दाखवून) या चक्राला भीत आहे! ह्याचेकडे नाहीं बाई माझ्यानं बघवत! (तोंड फिरवून दोन्ही हात आड धरते.)

**माधवराव**—( स्वगत ) हा चित्रपट मात्र त्या विश्वामित्रमेनकेच्या चित्रपटाहून फार मनोहर दिसतो आहे! मेनकेनें दाखविलेलें अपत्य पाहून विश्वामित्र तोंड फिरवितो आहे आणि ही हें पागोटें पाहून तोंड फिरविते आहे. एकून हिचा आशय मीं हा पोषाख काढून ठेवावा असा आहे. (उघड) सुभद्रेनें अर्जुनाला संन्याशाच्या वेषांत यायला लावलेंन; पार्वतीनें शंकराला किराताचा वेष घ्यायला लावलान—

**मोहना**—आणि मीं या बहुरूप्याच्या वेषांत यायला लावलं! असंचना? ह्मणूनच मी ह्मणत्यें कीं, तो वेष काढून हा कृष्णाकरितां करविलेला पोषाख घालावा

गडे! आतां, अर्जुनानंसुद्धां सुभद्रेचं जें पाणिग्रहण केलंन तेंतरी आपला यतिवेष टाकून पूर्ववेष घेऊनच!

**माधवराव**—पण हें सारें तिनेंच त्याच्याकडून करविलेंन.

**मोहना**—( स्वगत ) एकून हा पोषाख मीं अंगावर चढवावा असं मनांत आहे तर! ( कृष्णाचे कपडे आणून उघड ) पण त्या कपड्यांनां मात्र, मी हातदिखील नाहीं लावायची!

**माधवराव**— असेंच असेल तर मीच काढून टाकतों हे. (कपडे काढतो.) असले कपडे पाहिजेत कुणाला? ( स्वगत ) हिची दृष्टी भयानें किती चंचळ झाली आहे!

[ चाल.—भय हें नवें. ]

**अवलोकनीं। भय ये दिसोनी ।**
**जणु स्पर्धिलें । युग लोचनीं । ध्रु० ।**
**भय-तोलनाचे । नव यंत्र साचे ।**
**नयनीं रचे । विधि कौतुकांनीं. ॥ १ ॥**
**जड कोणतें हें । नकळेचि पाहे ।**
**सम तोल हें । दृशि ये दिसोनी. ॥ २ ॥**
**स्वपदा त्यजोनी । मन ये भ्रमोनी ।**
**सखि लोचनीं । स्फुट ईक्षणांनीं. ॥ ३ ॥**
**पद भ्रष्ट होतां । भ्रम येइ चित्ता ।**
**करि शंकिता । मति विभ्रमांनीं. ॥ ४ ॥**

तेव्हां या वेळीं हिची जी स्थिति झाली आहे ती साहजिकच आहे.

**मोहना**—( जवळ येऊन कपडे घालण्यास सरसावते व स्वगत ) मी कसाबसा धीर करून हा पोषाख चढवायला आल्यें खरी, पण माझी स्थिति कांहीं चमत्कारिकच होऊन जात आहे!

[ चाल—अर्पिलें सुमन तें. ]

**स्पर्श हा सुखद जरि भिववितसे किति मजला**
**किति कंप सुटे मम तनुला!**
**तुचलतें वसनहि मजला!**
**जहालें अहा मी अनाथा! भयाकुला. ॥ १ ॥**

**माधवराव**—( स्वगत )

अनुरक्त किती ही शशिवदना
मजवरि अतितर मधुरा अधरा. । ध्रु० ।
करधृत वसनें गळति करांतुन
भयातं सखिचें जरि अवलोकन
टाकित हृदयाप्रति हें भेदुन
स्पर्श परी हा करि भीरु मना. ॥ १ ॥

**मोहना**—( धीर करून सगळा पोषाख घालते ) सुभद्रेसारखा धीर करून हा पोषाख मीं कसाबसा घातला.

**माधवराव**—मग आतां काय उरलें?

**मोहना**—पाणिग्रहण.

**माधवराव**—( सभय )

धरावया कर त्वदीय स्वकरें उचलत जरि स्वकरातें,
अदृश्य शक्ती येउनि कोणी घट्टचि धरि परि त्यातें!
शक्ति न उचलाया। जाई धैर्यहि तें विलया! ॥ १ ॥

**मोहना**—( त्याचा हात धरून त्याचे हातीं आपलें मनगट देते ) इथं कसली बाई भीति? कोण आहे इथं दुसरंतिसरं!

**माधवराव**—हें पहाः—

[ चाल—अनिवार मनुज. ]

किति कंप सुटत असे। धरितां परकांताकर हातीं!
भीतिवशें उर धडधड करि किति, पडत मना भ्रांती!
पुलकित हो तनु अंगें थरथरुनि घर्में डंवडंवती!

आणखी हें बघः—

"पाप कर्म हें!" ह्मणुनी कोणी श्रुति-पुटिं ओरडती ॥ १ ॥

**मोहना**—मी वरवर धीर धरत्यें पण माझीहि अगदीं अशीच स्थिति होतआहेः—

[ चाल—अर्पिलें सुमन तें. ]

स्पर्श हा सुखद जरि भिववितसे किति मजला
परि धीर नसे मुळिं उरला!

**प्रियकरा! धरुनि हृदिं इला**
**करावी सनाथा अनाथा अभागिला. ॥ १ ॥**

**माधवराव**—( कांहीं चाहूल ऐकून ) थांब, कुणाचीतरी चाहूल ऐकूं येते आहे. तुह्मांला नाहीं आली ऐकूं?

**मोहना**—मलासुद्धां आली ऐकूं. ( लक्ष्य देऊन ) पण हा निव्वळ भास आणखी दुसरं काय ! ह्यावेळीं इथं कोण येणार?

[ चाल—अनिवार मनुज करी. ]

**किति भास, होति मना अंतरिं जरि संचरते भीती !**
**पापकर्म तें गुप्तहि कितितरि भिवविं जना जगतीं !**

**माधवराव**—

**कुणि आलें । वाटतसे । परि बघतां । कुणि न दिसे !**

**मोहना**—

**निज मन भासवि भास असे हे; भासें जन फसती !**

ह्मणून ह्मणत्यें, इतकं भ्यायला नको आहे कांहीं इथं! अशा वेळीं कोण, येणार कोण इथं?

[ चाल—दया करा मजवरी. ]

**भिउं नका, मम करा करिं धरा**
**व्यर्थ भीति ही काय बाइ उगि,**
**शंकितसां कां उगी प्रियकरा !**
**चंचल दृष्टी काय अशी ही,**
**खास असे तो भास प्रियकरा!**
**अधीर झालें कितितरि अंतरिं,**
**धीर न धरवे दयित ! मज जरा. ॥ १ ॥**

**माधवराव**—( कांहीं ऐकल्यासारखें करून ) आग लागली ह्मणून ओरडताहेत कुणी !

( इतक्यांत बाहेर 'आग लागली. दरवाजा उघडा!' ह्मणून एकच गलबला होतो. )

**मोहना**—अगबाई आग! हें पहा—तुह्मीं तो दाक्तरचा पोषाख करा अगोदर. अन् मी आजाऱ्याचं सोंग घेत्यें. ह्मणजे कुणाला संशय नाहीं यायचा.

(माधवराव डाक्टरचा पोषाख करतो व मोहना आजाऱ्याचें सोंग घेऊन निजते. माधवराव बाटल्या टेबलावर मांडून हलकेच जाऊन दाराची कडी उघडून परत येऊन ताप पहाण्याचें मिष करितो.)

**माधवराव**—( दरवाजाकडे पहात ) अरे किदर लगा आग?

( टवाळक्कबाची पोलिसांचे वेष घेतलेली मंडळी आंत घुसते, व मुकुंदराव गोपाळराव लुकतुक्यास इशारत करतो. गोपाळराव पुढें होतो.)

**गोपाळराव**—आग नहिं नी कुच नहि. तूनेहि इदर लगाया!

**माधवराव**—मैने लगाया? (स्वगत) खास हें सारें अंगावर येणार एकून!

**गोपाळराव**—मला तुह्मीं ओळखलें नाहींत? मी इथल्या डिटेक्टिव्ह पोलिसाचा फौजदार आहें. माझें नांव श्रीपतराव. डाक्टरसाहेब, मीं तुह्मांला ओळखलें!

**मोहना**—अग बाई!

**माधवराव**—( भीतीनें कांपू लागतो. ) म-म-मी-

**गोपाळराव**—भिऊं नका असे. तुमची इज्जत घेण्याची आमची इच्छा नाहीं. तुमचें नांव माधवराव इनामदार नव्हे काय? तुह्मी इथें आलांत ते वसंतरावांच्या सारखा पोषाख करून आलांतना? हा मोदीडाक्टरसारखा पोषाख कुणीं आणि कधीं केला त्याची, अन् इथें तुमच्या येण्याजाण्याची सगळी नोंद आहे माझ्या डायरींत! घाबरूं नका तुह्मीं असे! जातां कुठें? माझे शिपाई आहेत बाहेर उभे. माझें ह्मणणें ऐकल्याशिवाय तुह्मांला साफ जातां येणार नाहीं इथून. हं घाबरूं नका असे!! मी तुह्मांला पहिल्यानेंच सांगितलें आहे कीं, मी कांहीं तुमची इज्जत घ्यायला आलों नाहीं ह्मणून.

**माधवराव**—मग काय, ह्मणणें काय आहे तुमचें?

**गोपाळराव**—या घटकेला दोन हजार रुपयांचा तोडा जर इथें मोजित असाल तर आह्मीं आलों तसे चालते होऊं मुकाट्यानें. नाहींतर शिरस्त्याप्रमाणें हा तुमचा सारा खटला चव्हाट्यावर आणावा लागेल!

**माधवराव**—एवढेंच ना तुमचें ह्मणणें? ( आपले गळ्यांतील कंठी व हातांतील सलकडीं काढून देतो ) हे घ्या. हा सुमार पांचसहाशेंचा माल आहे. उद्यां आमच्या घरीं या आणि बाकीचे रुपये घेऊन जा.

**गोपाळराव**—तें तसलें कांहींएक चालायचें नाहीं. ह्या जागेला दोन हजार सुर्त्तीं पटवित असाल तर ठीक आहे, नाहींतर—

**मोहना**—( दागिने काढून ) हे माझे गोटतोडे आणि हा माझा चंद्रहार हे दोन्ही मिळूनच दीडदोन हजारांचा माल आहे. हे घ्या अन् मुकाट्यानं चालते व्हा. मात्र यांतलं एक अक्षरदिखील फुटतां कामा नये.

**गोपाळराव**—(घेऊन ) आतां फुटायची बिलकूल भीति नको तुम्हांला.

**माधवराव**—दागिनेच कशाला पाहिजेत तुम्हांला? उद्यां तुम्हांला रोख पटवीन.

**गोपाळराव**—त्यालाहि आमची हरकत नाहीं. रोख सुर्ती दिल्यावर हे दागिने आह्मी तुह्मांला परत करूं. मगतर हरकत नाहीं कांहीं?

**माधवराव**—तरमग असे दुपारीं या आमच्या इथें हे दागिने घेऊन. म्हणजे तुमचे रुपये पटवीन आणि हे ठेवून घेईन.

**सदाशिवराव**—(जमादाराचा वेष घेतलेला हलकेच पुढें येऊन) आमाला काई चिरीमिरी—

**माधवराव**—फौजदारसाहेब, तुह्मी आपल्या शिपायांत पंचवीस रुपये वांटून द्या. मी देईन ते तुह्मांला उद्यांच.

**गोपाळराव**—ठीक आहे.

**सदाशिवराव**—पचीसानं काय व्हतया रावसाब! काईनाई तर समद्यान्ली मिळून एक शंबरतर खरे! काय समजलां?

**गोपाळराव**—बरें, बरें चला; रावसाहेब कांहीं असेतसे नाहींत, तुम्हांल खुष करतील ते. ( स्वगत ) या मूर्खांचें 'काय समजलां' आलेंच इथें सुद्धां!

(शिपाई माधवरावाला राम राम करतात.
इतक्यांत श्रीपतराव फौजदार शिपायांसह येतो. )

**श्रीपतराव**—( दरवाजावरील बाळप्पास हटकून ) अरे ए, तूं बाळप्पा नव्हेस का? आणि तूं कधींपासून या धंद्यांत शिरलास? निळकंठराव, तुह्मी आणि वसंतराव अंमळ बाजूस उभे रहा.

**बाळप्पा**—( कांपूं लागतो व बोबडी वळते ) गो–गो–गो–गो गोपाळरावांनीं सा–सा–सांगितलें चल हा पोषाख करून, ज–ज–जरा गंमत करूं म्हणून. आणि म्ह–म्ह–म्हणून मी आलों.

**श्रीपतराव**—चल दाखीव कुठें आहे तो गोपाळ लुकतुक्या! (आंत जातात. श्रीपतरावास पाहून गोपाळराव व इतर मंडळी घाबरतात. गोपाळरावास ) वाः

तुह्मी फौजदार कधींपासून झालांत? तो हरामखोर मुकुंदराव कुठें आहे? (आपल्या शिपायांस ) अरे, पकडा यांनां आणि फरासखान्याकडे घेऊन चला. ( गोपाळरावास) फार चांगले धंदे करायला लागलांत! शिपायांचे ड्रेसदेखील पैदा केलेत आँ! शाबास. (हात धरून) हें हातांत काय आहे आपल्या! दागिने! शाबास! पोलिसखात्यांत असतां तर फार उत्तम काम केलें असतेंत. ( शिपायांस ) पांडु, हा मुद्देमाल तुझ्या ताब्यांत घे. नाईक, या सगळ्यांनां घेऊन तुह्मीं फरासखान्याकडे जा. मी हा आलोंच तुमच्या मागोमाग! (गोपाळरावास) तो हरामखोर मुकुंदराव कुठें आहे? बोला बोला—

**गोपाळराव**—इतक्यांत होता तो. कुठें गेला तें पाहिलें नाहीं आह्मीं फौजदारसाहेब!

**श्रीपतराव**—ठीक आहे. आह्मीं लावतों त्याचा पत्ता. नाईक, दरवाजावर दोन शिपाई ठेवा. अन् तुह्मी पोलिसचा पोषाख केलेल्या या सगळ्या लोकांनां घेऊन जा. ( माधवरावास उद्देशून ) माधवराव—

( नाईक सर्व कृत्रिम पोलिसांनां धक्के देत घेऊन जातात. )

**मोहना**—( साश्चर्य ) माधवराव! अगबाई, ह्मणजे! हे दाक्तर नव्हेत तर? मुकुंदरावानं तर मोदीदाक्तरांनां घेऊन येतों ह्मणून सांगितलंन! अरे देवा, तर हे मोदीदाक्तर नव्हेत! फौजदारसाहेब, त्या मुकुंदरावानं माझा गळा कापलान हो, सर्वस्वी गळा कापलान!

**माधवराव**—( सभय स्वगत ) ह्मणजे! हिनेंतर सगळेंच मुकुंदरावावर ढकलून मलाहि ही आतां तोंडघशीं देते आहे! असो आतां काय त्याचें! पापकर्म करायला जो तयार झाला त्यानें त्याचीं फळें भोगायलाहि तयारच असलें पाहिजे!

**श्रीपतराव**—( माधवरावास ) भलत्याचा वेष घेऊन तुह्मी दुसऱ्यांच्या बायकांची इज्जत घेतां? शरम नाहीं वाटत तुम्हांला? (शिपायांस) अरे, यांच्याहि मुसक्या बांधा अन् यांला फरासखान्याकडे घेऊन चला.

**माधवराव**—हें पहा फौजदारसाहेब, तुम्हांला माझी हात जोडून विनंति आहे. यावेळीं एवढी माझी अब्रू बचावा. ती बचावणें तुमच्या हातांत आहे! तुमचे उपकार मी कधीं विसरणार नाहीं! तुह्मीं काय ह्मणाल त्याला मी कबूल आहें—दोन हजार, पांच हजार, काय वाटेल तें मागा, पण अब्रू बचावा!

**श्रीपतराव**—हं, मला आणखी लांच खायाला शिकवितां? आणि एक पाप छपविण्याकरितां दुसरें करूं पहातां? लांच खाणारे दुसरे कुणी फौजदार असतील! मी त्यांतला नाहीं, हें पक्कें ओळखून असा! समजलें? माझ्याशीं जितकी जास्त लुच्चेगिरी कराल तितके जास्त गोत्यांत याल, याची नीट याद राखून असा. याच पोषाखांत उद्यां तुमच्या हातापायांत बेड्या ठोकून तुम्हांला माजिस्ट्रेटापुढें नेऊन उभें करतों! माधवराव, तुम्हांला ठाऊक आहे या अपराधाला पीनलकोडांत काय शिक्षा सांगितली आहे ती? (स्वगत) आतां याला चांगलीच दहशत घातली पाहिजे. (उघड) दुसऱ्यांच्या बायकांची अशी इज्जत घेणारांनां दहा वर्षें सक्त-मजुरीची शिक्षा आहे-आणि अशा कैद्याकडून मैलाच्या गाड्या ओढवून भररस्त्यांतून त्यांची रोज धिंड निघत असते! याची कांहींतरी कल्पना आहे का तुम्हांला?

**माधवराव**—(डोळ्यांत अश्रू येऊन) हाय हाय! फौजदारसाहेब, मी सर्वस्वी अपराधी आहें.

(फौजदारांचे पायां पडून, अगदीं गयावया करून त्यांचे तोंडाकडे पहातो.)

[चाल—चरणिं करिच्या बद्ध करुनी.]

**शरण तुमच्या येत चरणीं। पापि, दुर्जन, खलचि समजुनि**
**कंठ तोडा मदिय या क्षणिं। खड्ग उचलोनी. ॥ १ ॥**
**शृंखलांहीं बद्ध करुनी। नेत असतां वीथिमधुनी।**
**पाहती तरि प्राणहानी। होय मजला ते. ॥ २ ॥**
**लौकिका जरि होय हानी। मरण मनुजा प्रियचि त्याहुनी।**
**ह्मणुनि याचित खड्ग उचलुनि। कंठ तोडा हा. ॥ ३ ॥**

फौजदारसाहेब, माझ्या हातून आज असें अनन्वित, घोर आणि भयंकर पाप घडणार होतें—कीं त्याला तुम्ही सांगतां ही शिक्षा कधींच पुरे होती ना! पण तें ह्या सगळ्या घडलेल्या प्रकारानें टळलें! तुम्ही आलां नसतां तर खचित आज माझ्या हातून तें भयंकर पापकर्म घडलें असतें!

**श्रीपतराव**—माधवराव, तें सगळें मला कळतें आहे! पण अजूनतरी खरें बोला! तुमच्या हातून कांहींदेखील पापकर्म घडलें नाहीं अजून?

**माधवराव**—(सद्गदित कंठानें,) नाहीं—खचित नाहीं!

**श्रीपतराव**—खचित नाहीं?

**माधवराव**—खचित, खचित नाहीं! मात्र आज तुम्हीं न येतां तर मात्र—

**श्रीपतराव**—( स्वगत ) ही एवढी गोष्टतरी एक बरी आहे. ( उघड ) पण तसें जरी नसलें तरीदेखील तुमचें या पोषाखांत यावेळीं इथें गुन्हा करण्याकरितां येणें, एवढेंच बस्स आहे तुह्मांला शिक्षा ठोठवायला!

**माधवराव**—त्यापेक्षां तुह्मीं आपल्या हातच्या तरवारीनेंच जर इथल्याइथें तोडून माझे तुकडे केलेत तरी पुरवेल पण खटला होऊन शिक्षा नको!

**श्रीपतराव**—पण तसें कायद्यानें करतां येत नाहीं मला.

**माधवराव**—कायद्यानें नको करतां येऊंदे. पण समजा, प्रत्यक्ष तुमच्या धाकट्या भावाच्या हातून जर हा असा गुन्हा होता तर त्याचे नसतेत तुम्हीं दोन तुकडे केलेत? ( सद्गदित होऊन ) अहो! अब्रू–अब्रू–अब्रू!

**श्रीपतराव**—(स्वगत) मनुष्य कसें आंधळें होतें पहा! (उघड) माधवराव, काय ह्मणावें तुम्हांला? तुम्हांला आपल्या बायका नाहींत!

**माधवराव**—फौजदारसाहेब, ( हुंदके देत ) ती गोष्ट आतां काढूं नका!

**श्रीपतराव**—कां? ती गोष्ट कां काढूं नका? तुम्ही मोठे भाग्यवान् कीं तुम्हांला अशी साध्वी आणि सुंदर स्त्री मिळाली आहे.

**माधवराव**—( साश्चर्य ) साध्वी!

**श्रीपतराव**—ह्मणजे! तिच्या साध्वीपणाबद्दल तुम्हांला शंका?

**माधवराव**—शंका ह्मणजे? त्या मुकुंदरावावर कुभांड घेण्याकरितां त्यानें आपला हात धरला ह्मणून जिनें खोटेंच सांगितलें, आणि त्या लघाळ भिकंभटाशीं–

**श्रीपतराव**—बस्स बस्स पुरे करा. त्या हरामखोर मुकुंदरावाचें नांवसुद्धां काढूं नका. त्याच्यावर ती कुभांड घेते! माधवराव, तुमच्या बुद्धीला भयंकर भ्रंश झाला आहे! तुम्हांला तुमच्या साध्वी स्त्रीची योग्यता अद्याप कळली नाहीं! त्या मुकुंदरावानें तुमच्या कानांत कसें जहर विष ओतलें आहे तें सर्व मी जाणून आहें. मुकुंदरावानें तुमच्या स्त्रीची इज्जत घेण्याचा प्रयत्न करून तुम्हांला तें उलट कसें भाशिवलेंन तें सारें तुमच्या मंगळकडून आम्हांला कळून चुकलें आहे. त्यानें तें सारें आड्न ऐकून आम्हांला सांगितलें.

**माधवराव**—मंगळनें?

**श्रीपतराव**—हो हो, मंगळनें!

**माधवराव**—हो, तो होता खरा त्या वेळेस तिथें. पण तो कसा सांगणार?

**श्रीपतराव**—माधवराव, तुम्ही फार भोळसट आहांत. तुम्हांला जगाचा अद्याप कांहीं अनुभव नाहीं. तुम्ही काय करितां अन् काय नाहीं, यावर नजर ठेवण्याकरितां यादवरावांनीं त्याला मुक्याचें सोंग देऊन तुमच्याजवळ ठेविलें आहे.

**माधवराव**—( साश्चर्य ) ह्मणजे !

**श्रीपतराव**—ह्मणजे काय ? तुम्ही त्या पाजी मुकुंदरावाच्या संगतीला लागल्यामुळें त्यांनां माझ्याच सल्ल्यावरून हें मुद्दाम करावें लागलें. तुह्मी ह्या मुकुंदरावाला अजून ओळखला नाहींत. त्यानें आपल्या मेव्हण्याला औषध ह्मणून विष देऊन ठार केलें आहे आणि खोटें मृत्युपत्र करून त्याची जिंदगी गिळंकृत केली आहे. प्रत्येक व्यवहारांत तुमच्याकडून तो पैसा ओढतो आहे. तुम्ही बायसिकल घेतलीत त्यांत त्यानें तुम्हांला शंभर रुपयांचा गंडा घातला आहेन. आठपंधरा दिवसांत, त्यानें तुम्हांला दोन खोट्या रत्नमाला करवून आणून दिल्यान, आणि कालपरवां इतक्यांत एक गुलाबाचें –सोन्याचा मुलामा दिलेलें–खोटें फूल करवून आणून दिलेंन, त्यांत त्यानें तुमच्याकडून किती पैसे उपटले तें तुमचें तुम्हांला ठाऊक !

**माधवराव**—काय–तरमग तीं सारीं बनावट आणि मुलाम्याचीं ?

**श्रीपतराव**—ह्मणजे, याबद्दल तुम्हांला संशय कीं काय ? आह्मी त्याच्या पुरे पाळतीवर आहों. माझ्या डायरींत त्याच्या प्रत्येक हालचालीबद्दल नोंद आहे. आजचा प्रकार घडवून आणायलासुद्धां तोच हरामखोर कारण आहे. तुम्हा दोघांकडून पैसे काढण्याकरितां हे त्याचे डावपेंच होते. इंद्रभुवनांतल्या मंडळीला पोलिसाचा पोषाख देऊन इथें आणण्याची क्लृप्ती त्याची आहे, आणि ते पोषाखहि त्याला मीं होऊनच मुद्दाम देऊं दिले. मला पहिल्यापासून सगळी खबर होती ! त्यानें अव्वलपासून तुमच्यावर भुरळ घालून तुमचा बुद्धिभ्रंश केला ! माधवराव, तुम्हीं अथेल्लो नाटक पाहिलें आहे. त्यांतला प्रति आयागो आहे हा ! तुह्मांला त्याचे कावे समजले नाहींत. तुह्मांला अशी सुंदर आणि साध्वी बायको लाभली असून तुह्मीं केवढें भयंकर पापकर्म करण्याला प्रवृत्त होऊन इथें आलांत ? या—

**माधवराव**—फौजदारसाहेब, तुमच्या बोलण्यानें माझ्या डोक्यांत आतां चक्कन् प्रकाश पडला. इतके दिवस मला डोळे असूनहि मी आंधळा झालों होतों. आज मला तुह्मीं हे डोळे दिलेत !

[ चाल—वदुं काय तुला. ]

अपराध किती, अपराध किती
नाहिं तयां मुळि गणती !
सुंदर साध्वी कांता असुनी,
या अधमानें तिज धिःकारुनि,
दिधलें दुःखार्णविं कीं लोटुनि,
योग्य न तिज हा पति खल दुर्मति ! ॥ १ ॥

ह्मणून ह्मणतों, तिची तुह्मी मला आतां आठवणसुद्धां नका देऊं ! यापुढें तिला आणि सगळ्या जगाला हें माझें काळें ठिक्कर तोंड दाखविण्याचीदेखील मला शरम वाटते ! ह्मणून ह्मणतों, मला एक ठारतरी करा, अथवा तें तुमच्या हातून होत नसेल तर एवढेंतरी कराः—

झट द्या मज विष जहर जलाल !
मानिन त्यांतचि सुख चिरकाल ! । ध्रु० ।
जगण्याहुनि मज मरण्यांतचि सुख,
दाखवुं कैसें जगतास असें मुख,
वनिता-आप्ता-मित्रा-पुत्रा-सकलां
दाखविण्या हें धृति नच मजला !
मृत्यु बरा । पापि नरा । सौख्यकरा । असिधारा ।
तीहि गमे । जरि टाकी । घोर नितांत । कालकृतांत ।
तीक्ष्णतरा । निज करवाल. ॥ झट द्या मज विष० ॥ १ ॥

( इंदू दागिने घालून निजली असतांना, मुकुंदराव मारेकऱ्यांच्या काळ्या पोषाखांत जाऊन तिचा खून करतो; इंदू भयंकर किंकाळी ठोकते; ती ऐकून मोहना, माधवराव, श्रीपतराव व निळकंठराव धावून जाऊं लागतात; तों खून चढला आहे असा मुकुंदराव हातांत रक्तानें लाल झालेलें शस्त्र घेऊन येतो. )

मुकुंदराव—( खून चढलेला )

[ चाल—चापा स्मर धरी. ]

आतां धुउं कुठें रक्त हस्ता ! । ध्रु०

**हस्तपद छेदुनी, भूषणें कादुनी,**
**प्राण विध्वंसिले कंठ तड्डपुनी,**
**जाहलों आज मी घोर हंता. ॥ १ ॥ आतां धुउं० ॥**
**रक्त हें पाहतों मी धुवायास तों**
**तनुस मम रक्त हें वाटतें माखतों,**
**रक्तमय भासतें, जगत स्वांता. ॥२॥ आतां धुउं० ॥**

**मोहना**—( खोलींत ) अगबाई, हा चांडाळ या खोलींतून बाहेर पडला. आणि तिथंतर माझी इंदू निजली होती !

**श्रीपतराव**—हा हाच तो नराधम मुकुंदराव! तरी ह्मटलें हा एकदम कुठें गडप झाला! दागिन्यांकरितां यानें त्या मुलीचा खून केलेला दिसतो. आणि मला वाटतें, तोच खून आतां ह्याला चढला आहे. ( तरवार उपसून ) हरामखोरा, चल खालीं ठेव हत्यार !

**माधवराव**—( त्वेषानें ) अरे—

[ चाल—वरुनि मलिन वसना. ]

**करुनि हनन, अधमा !**
**फिरशि रक्तार्णवीं जणुं निर्घृण यमअनुचर,**
**काळ कीं रक्तमय कृपाण असिधर ।**
**मरण अकरुण तुज गमत हितकर. । ध्रु० ।**
**रक्त रुधिर खड्ग गमशि यमचि !**
**तयासि कर कर-विमुक्त,**
**नच तरि दुरात्मना ! स्मशान हें तुझें समज मनिं. ॥ १ ॥**

( मुकुंदराव माधवरावावर शस्त्र उगारतो. )

**श्रीपतराव**—माधवराव, तुह्मी बाजूस व्हा. ( शिटी वाजवितो. त्याबरोबर शिपाई येऊन मुकुंदरावास घेरा घालून धरतात. )

**मोहना**—( इंदूचे जवळ जाऊन ) अगबाई, हें काय ! अरे देवा ! ( तिचें प्रेत पाहून थरथर कांपूं लागते ) हिचे हातपाय तोडले आहेत अन् ही रक्तबंबाळ होऊन डोळे पांढरे करून पडली आहे इथें ! धावा हो धावा ! खून ! खून !

( मोहना बेशुद्ध होऊन पडते व वसंतराव व निळकंठराव तिला सावध करण्याचा प्रयत्न करितात. )

**माधवराव**—( त्वेषानें ) फौजदारसाहेब, तुमचें हें हत्यार द्या.

[ चाल—सफलेच्छा ती करिन सुरांची. ]

**तुकडे करुनी या अधमाचे,**
**पाट वाहवुनि अजि रक्ताचे,**
**मांसखंड हे उदंड साचे**
**गृध्रांना देतों । आतां !**
**भूत, पिशाच्चा, वेताळातें**
**खाद्य पहा देतों । आतां !**
**मांसखंड हे उदंड देउनि**
**तुष्ट पहा करितों । आतां !**

**श्रीपतराव**—( शिपायांस ) खेंचा खेंचा त्याला ! बघतां काय असे ? जखडून टाकून ! एकदम बेड्या ठोका त्याच्या हातांत आणि त्याचा आंगझाडा घेऊन सगळा मुद्देमाल बाहेर काढा. ( शिपाई तसें करितात व दागिने, नोटा व पत्र बाहेर काढतात. ) ( माधवरावांस) माधवराव, ह्या अधमावर शस्त्र उचलायला आपल्याला अधिकार नाहीं. कायदाच चालवील तें त्याच्यावर. अशा नीच मनुष्याच्या संगतीनें तुह्मी काय करायला उद्युक्त झालां होतां ? या चोरानें तुमच्या साध्वी स्त्रीवर पापवासना धरून हात टाकलान आणि त्या बिचाऱ्या भिकंभटावर नसती आग पाखडलीन. पण तुमच्यासारख्या आंधळ्यांना हें दिसणार कसें ? हें पाह्यलेंत याच्या झाड्यांत काय काय निघालें तें ?

**माधवराव**—( आश्चर्यानें ) माझें जें पत्र गेलें होतें तेंच हें आणि ह्या नोटाहि माझ्याच दिसतात. एकून असा प्रकार आहे तर !

[ चाल—विलासिनी गेली. ]

**निद्रित स्थिति मम सकलहि गेली !**
**पुनरपि जागृति मजला आली ! । ध्रु० ।**
**विश्वासुनि या अधमावरती**
**अवगणुनी मम भार्या सुदती**
**अभिलाषियली परकिय युवती !**
**किततरि पापें याच्या पुढतीं**
**मदीय हस्तें असतीं घडलीं ! ॥ १ ॥ निद्रित० ॥**

**श्रीपतराव**—( शिपाई मुकुंदरावास रशीनें जखडून चतुर्भुज करितात.) चोराच्या हातांत बेड्या ठोका अगोदर! याला नुसतें रशीनें बांधून नाहीं चालणार. हा खुनी इसम आहे. याला फांसावरच चढिवलें पाहिजे. चोरा, हा खून करायची आणखी कुठची तुला बुद्धि झाली ?

**मुकुंदराव**—बेड्या ठोका, नाहींतर फांशीं द्या. पण मीं जो हा खून केला तो त्या जारिणीच्या आणि ह्या जाराच्या सांगण्यावरून केला ! यांचें पापकर्म त्या पोरीनें पाहिलेंन; आणि ती वसंतरावाला सगळें सांगेल, आणि आपलें सगळें पापकर्म बाहेर फोडील, ह्मणून या दोघांनीं तिला ठार मारून टाक ह्मणून मला सांगितलें, त्यावरून मीं हा खून केला ! दुसरे लक्षावधि लोकांचे खून करून राज्याचीं राज्यें घशाखालीं उतरून पचिवतात आणि मला हा एवढा एक खून पचविता येऊं नये !

**श्रीपतराव**—(साश्चर्य ) माधवराव, काय घोर पापकर्म हें! हा ह्मणतो असें असेल तर ह्या खुनाबद्दल तुह्मां तिघांनांहि फांशीच्या नाहींतर काळे पाण्याच्या शिक्षेहून दुसरी शिक्षा नाहीं !

**मंगळ**—( एकीकडे उभा राहून सर्व प्रकार पहात असलेला आपल्याशीं ) अरे बाप ! ह्यो समदा परकार अक्शी खराब दिसतुया. ह्येची बातमी अदुगर यादवरावाह्ली येतों, ह्मंजे त्ये करतील काईबी विलाज; मला सुचतबी न्हे काई. आन् माजी पावल बी न्हे उचलत मला ! पर कसंबी ग्येलं पाहिजे.

[ जातो.

**माधवराव**—

[ चाल.—मधुवच पुनरपि. ]

**शिव शिव शिव शिव काय हें !**
**तिळहि सत्य नसत यांत**
**अनृत वचन वदुनि शठ । मजवरि करि निंद्य घाय हे ! । ध्रु० ।**
**वध असा हा धनाभिलाषें ।**
**अधम असा करितो हें । दिसताहे ।**
**परि हा । वदताहे । कुटिल वचन पाहें !**
**तिळभरही नच शंकी वदतो काय हें ! ॥१॥ शिवशिव०॥**

फौजदारसाहेब, हे रक्तानें भरलेले दागिने पहा. ही एकच गोष्ट बस्स आहे याच्या पापाची साक्ष द्यायला ! जगांत जें जें ह्मणून कांहीं पवित्र आहे त्याची पाहिजे तरी मी शपथ घेऊन सांगतों कीं, हें सारें या नीचाचें कुभांड आहे माझ्यावर! यांत मी जर एक अक्षर खोटें बोलत असेन तर—

[ चाल—नळराजाचे आणा वारू. ]

कडाडुनी ती वीज पडोनी अथवा पृथ्वी भंगोनी
टाको मजला भग्नचि करुनी किंवा भूतलिं गाढोनी. ॥ १ ॥
धूमकेतु नव उद्भवुनी नभिं जाळुत खदिरांगारानें !
रौरव नरकीं पूर्वज पडतिल दूषित जरि मी पापानें. ॥ २ ॥
अनृत वच जरि, छेदुनि जिव्हा कंठा तोडुनि खड्गानें
लोटुनि द्या मज अघोर नरकीं भक्ष्यचि समजुनि कीटांचें. ॥३॥

**श्रीपतराव**—बस्स बस्स ! ( स्वगत ) माधवरावांचा यांत बिलकूल हात दिसत नाहीं. ह्या हरामखोराचें हें सारें कुभांड दिसतें आहे! ( शिपायांस ) ह्या चोरानें हें सारें पैसा मिळविण्याकरितां केलें आहेन हें स्पष्ट दिसत आहे; तर या हरामखोराला चाप लावून, फटके मारून, चांगली समजूत द्या ! समजुतीशिवाय हा हरामखोर कबूल होणार नाहीं. ( शिपायांस खुणावतो व ते त्यास समजूत देतात. मुकुंदरावास ) याबदलच्या शिक्षेची ही नुस्ती प्रस्तावना आहे.

**मुकुंदराव**—( विव्हळत स्वगत ) ह्या यमयातना सहन करण्यापेक्षां इथें मुकाट्यानें कबूल करून पुढें नाकबूल जायला काय हरकत आहे ? ( काकुळतीस येऊन उघड ) अरे, मला असे मारूं नका उगीच. मी सगळें कबूल करतों—

[ चाल—सार्थचि ते वदती. ]

घडलें मजकडुनी । सारें
द्रव्यास्तव इज टाकिली वधुनी. । ध्रु० ।
द्रव्यास्तवची या मूढातें
वंचुनियां मीं ऐशा स्थितितें
आणियलें; परि सर्वहि फसुनी
गेलें सारें अजि ढांसळुनी! ॥ १ ॥ घडलें० ॥

**द्रव्यास्तवची हें वेषांतर,**
**द्रव्यास्तवची सारें काहुर,**
**द्रव्यास्तवची रक्ताचा पुर**
**वाहविला त्या रक्त असींनीं. ॥ २ ॥ घडलें० ॥**

**श्रीपतराव**—( शिपायांस ) ह्या हरामखोराला मुद्देमालासकट फरासखान्याकडे घेऊन चला. ( शिपाई त्यास घेऊन जातात. ) माधवराव, तुम्ही कुलीन आणि इभ्रतदार असून कसल्या माणसाशीं स्नेह केलात? तुमच्यासंबंधानें तुमचे मेव्हणे यादवराव यांनीं तुमची सगळी स्थिति मला सांगितली असल्यामुळें मी तुह्मांला आज सोडतों. पण यापुढें असल्या फंदांत पडूं नका, समजलां? अशानें अब्रू आणि त्याबरोबर प्राण हे दोन्हीहि गमावून बसाल, समजलांत? आतां घरीं जा आणि तुमच्या ह्या फंदी स्वभावामुळें झुरत असलेल्या सुंदरची-आपल्या साध्वी स्त्रीची माफी मागा! यादवरावांची जी बहीण ती माझी बहीण असें मी मानित आलों आजपर्यंत. आणि ह्मणूनच मी तुह्मांला आज सोडतों. तिची तुमच्या ह्या वर्तनानें काय स्थिति झाली असेल याची तुम्हांला कांहीं कल्पनातरी आहे का?

**माधवराव**—श्रीपतराव, काय सांगूं!

[ चाल—सखे शशिवदने. ]

**महा अपराधी!**
**मम हृदय, हाय किति अदय, हाय! करूं काय! । ध्रु. ।**
**अविचारें मीं मत्कांतेला**
**छळिलें भारी वाटत मजला;**
**सतिला पतिच वधी. ॥ १ ॥ महा अपराधी! ॥**
**विनयवती जरि माझी कांता**
**विपरित भासत मति विभ्रांता!**
**जात लया बुद्धी. ॥ २ ॥ महा अपराधी! ॥**

**श्रीपतराव**—माधवराव, तुम्हांला खरा पश्चात्ताप झालेला दिसतो. तर आधीं घरीं जा अन् तिची क्षमा मागा.

**माधवराव**—क्षमा मागेन पण—

[ चाल—संशययुत. ]

**सतिस वदन दाउं कसें। नीच कृत्य करुनि असें?**
**निंद्यकृती पापि पती। सतिस मुळिंहि योग्य नसे!**

**स्पर्शि जरी पापि करें। तो सतितें दूषितसे !**
**दाउं केंवि कृष्ण वदन। धीर मला होत नसे !**

**श्रीपतराव**—माधवराव, तुह्मांला जर हा इतका पश्चात्ताप होत आहे, अन् तुमच्या हातून तें भयंकर पापाचरणहि घडलें नाहीं, तर या पश्चात्तापानेंच तुह्मी शुद्ध आहांत. तर आतां घरीं जाऊन त्या साध्वीची क्षमा मागा अगोदर.

**माधवराव**—( त्यांचे पाय धरून ) अगोदर तुमची अन् मग तिची.

**श्रीपतराव**— जा जा, आतां वेळ घालवूं नका.

[माधवराव जातो.

( मोहना एकदम उठते व भ्रमिष्टपणें 'जमुनि युवति युवति' हें पद ह्मणते. )

**श्रीपतराव**—हा काय प्रकार आहे! हिला भ्रमतर झाला नाहीं?

**मोहना**—(भ्रमिष्टपणें ) काय ह्मटलंस? सूत्रधाराची स्वारी आज कुठं नाहीं? अग खुळे, इथं सूत्रधाराचं काम काय आहे? सगळ्या बायकाबायका मिळून नाटक करायचं ना? अग, मुकुंदरावांनीं नारदाचं सोंग घेतलं का पहा—आणि त्या माधवरावांची बहीण ती रमाबाई कृष्ण होऊन येणार होती ना? आलीका ती? अगबाई, कितीतरी उशीर झाला पण !

**निळकंठराव**—अरेरे ! ह्या नाटकाच्या नादामुळें हिला भयंकर वेड लागल्यासारखें दिसतें ! वसंतराव, तुह्मी ताईचा हात धरून तिला आंत घेऊन चला. श्रीपतराव, पाह्यलेंत, हें सगळें नाटकाचें वेड बरें !

**श्रीपतराव**—मला पहिल्यानेंच वाटलें तसें. पण अशाचा परिणाम असाच व्हायचा! बरें आहे, मी येतों आतां. मला फरासखान्याकडे गेलें पाहिजे लौकर.

**निळकंठराव**—तुह्मांला सांगायला नकोच, इथें अब्रूचा प्रश्न आहे !

**श्रीपतराव**— त्याबद्दल तुह्मी अगदीं निश्चिंत असा.

[जातो.

**मोहना**—( भ्रमिष्टपणें ) खरंच, पण मी झोंपेंत आहें का जागी आहें !

**वसंतराव**—( तिचा हात धरूं लागतो )

**मोहना**—(भ्रमिष्टपणांतच) प्रिया, या पोषाखानं कां आलांत? (दूर होऊन) या पोषाखानं नाहीं गडे मी हात धरूं द्यायची ! हा काढून ठेवून तो कृष्णाचा पोषाख घाला ! इतका वेळ मला असं झालं होतं कीं—

**एकटि कंठूं कशी निशातरि।**
**एकटिलाहि गमत भयंकर ।**
**रजनी कठिण कठीण ! विरहहि कठिण कठीण !**

( वसंतरावाचा हात धरून त्याचे अंगावर पोषाख चढवूं लागल्यासारखें करून ) थांबा, मी आतां पोषाख घालत्यें हां ! अगबाई !

[ चाल—अर्पिलें सुमन तें. ]

**स्पर्श हा सुखद जरि भिववितसे किति मजला !**
**किति कंप सुटे मम तनुला;**
**नुचलतें वसनहि मजला;**
**जहालें पहा मी अनाथा भयाकुला !**

बरं, पण आतां काय बरं उरलं? हो, आतां माझं पाणिग्रहण करायचं ना? काय ह्मटलंत? कांहीं चाहूल झाली ! छेः छे छे, गडे, तो भास निव्वळ भास तो !

[ चाल—अनिवार मनुज करी. ]

**किति भास होति मना अंतरिं जरि संचरते भीती**
**पापकर्म तें गुप्तहि कितितरि भिवविं जना जगतीं**

काय ह्मटलंत ?—

**" कुणि आलें ! वाटतसे। परि बघतां कुणि न दिसे ! "**

अहो—

**निज मन भासवि भास असे हे, भासें जन फसती !**

ह्मणून ह्मणत्यें, इतकं भ्यायला नको कांहीं ! ( एकदम दचकून ) अगबाई, काय ह्मटलंत ? 'हें पापकर्म आहे, ह्मणून कानाशीं कुणी ओरडताहे ?' हो, मलादिखील थरकांप कांपरं भरलं आहे! काय ह्मटलंत–बाहेर आग लागली? ( इकडेतिकडे कावऱ्याबावऱ्या दृष्टीनें पहाते तों इंदूस पाहून ) अगबाई, माझी इंदू का निजली आहे इथं ! रुसली आहे वाटतं? हो विसरल्यें गडे मी. विसरल्येंच विसरल्यें ! तुझी वेणीफणी केली अन् तुला दागिने घातले, पण तुला काजळ घालायला विसरल्यें नाहीं का? ( घाईघाईनें जाऊन, कोनाड्यांतील फणी व काजळाची डबी घेऊन ) थांब हां, हें घट्ट झालंय फार ( पातळ केल्यासारखें करून काजळाचे ठिपके दोन्हीं हातांनीं आपल्या गालावर व सर्व तोंडावर देते) थांब हां, हें पातळ झालंय कीं नाहीं तें बघत्यें ( आरसा घेऊन तोंड पाहून ) अगबाई, हें काय केलं

मीं हें ! ( काजळ तोंडाला फांसून घेते. ) अग बाई ! शिपाई आले ! दाक्तराचा पोषाख करा. अहो खून खून ! त्या मुकुंदरावानं माझ्या पोरीचा खून केला हो ! धावा धावा ! खून ! खून !

[ धावऱ्याधावऱ्या धावत जाते.

**निळकंठराव**—(स्वगत)पापबुद्धीनें हिचें अंतःकरण जितकें काळें झालें आहे तितकेंच हिचें तोंड या काजळानें काळें केलें आहे! (उघड) वसंतराव, हिला भयंकर मस्तकभ्रम होऊन वेड लागलें आहे. हिचें डोकें आतां थाऱ्यावर नाहीं. हिला कुठें जाऊं देऊं नका. मी कोणातरी डाक्तरला घेऊन येतों. तोंपर्यंत हिच्या डोक्यावर पाण्याची धार धरा.

**वसंतराव**— पण तुम्ही लौकर येतांना ?

**निळकंठराव**— हो हो, अगदीं लौकर येतों. ( बाहेर येऊन. ) एकंदरींत हें या थराला येऊन पोंचलें ! श्रीपतरावांच्या सूचनेवरून मी अगोदरच सावध झालों, हें एक बरें झालें. नाहींतर आणखी काय काय प्रकार ओढवता याचा कांहीं नेम नाहीं सांगतां येत. मोहनाताईच्या नाटकाच्या वेडाचें पर्यवसान असें होईल ह्मणून मला कल्पनाहि नव्हती! अप्रबुद्ध मनुष्याच्या मनावर—मग ती स्त्री असो अथवा पुरुष असो– नाटकें पाहून हे असेच अनिष्ट परिणाम व्हावयाचे! पण मला वाटतें, अशा अप्रबुद्ध लोकांनां नाटकापासून अनिष्ट परिणाम घडून येणारेंच एखादें नाटक रचून जर करून दाखविलें तर असे अत्याचार करायला प्रवृत्त होण्यापूर्वीं ते जरातरी दचकून माघार घेतील! माझ्या एका नाटककार मित्राला ही माधवरावांची आणि मोहनेची इत्थंभूत हकीगत सांगून त्याला याच्यावर एखादी ट्रॅजेडी लिहायला सांगितली तर तो ती उत्तम लिहील! आणि असें नाटक लिहवून त्याचा प्रयोग 'शाहूनगरवासी'सारख्या नाट्याभिनयकुशल नाटकमंडळीकडून करविला तर मला वाटतें अशा अविचारी आणि अप्रबुद्ध मनुष्यांच्या मनावरदेखील त्याचे हितकारक असेच परिणाम होतील! पण ही कल्पनासृष्टी यावेळीं काय माझ्या मनापुढें उभी रहाते आहे! मला अगोदर कुठल्यातरी डाक्तराकडे गेलें पाहिजे. पण कुणाकडे जावें बरें? ( अमळ विचार करून ) हो, त्यांनांच घेऊन येऊं.

[ जातो.

---

## प्रवेश ९ वा.

[ स्थल—माधवरावाचें घर. मंगळनिरीचा चाललेला संवाद सुंदराबाई आडून ऐकते आहे असा प्रवेश. ]

**मंगळ**—( माधवरावांला फांशीं देणार असें खुणेनें सांगूं लागतो. )

**निरी**—हत दुसरतिसर कुनीबी न्हे मानूस, आन् मंग कशापाई ह्ये अस मुक्यान?

**मंगळ**—( साश्चर्य ) कुन्नीबी न्हे? आन् मंग फाकट कुनीकडल वाजल? कुनी भूतबीत येऊनशेनी कवाड खडाडल्याती का काय?

**निरी**—कुन्नी चीटपाकरूबी न्हे हत. वैनीसाब बा असत्याल. लई झुरत्याती बिचाऱ्या!

**मंगळ**—तर मंग न्हे सांगाव, त्येच चकोट!

**निरी**—तरी पन इकत्या रातीच, काय, झालयातरी काय अस?

**मंगळ**—( हळू सांगतो ) त्या मुकुंदरावान रावसाबांच्या आन् त्या अवकळा ह्मोनच्या शिकवनीवरन– त्येंच दोगांच पाप भाईर फुटूं न्हे म्हूनशेनी ह्मोनची भाची ती इंदू का फिंदू न्हवका तिचा खून केला है ह्मन. आन् शिरपतराव फौजदारान समद्याह्मी मुद्दमालासकट पकडलया आन् सगळयाह्मी इक्त्यामंदी फरासखान्यामंदीबी न्ह्येल असल. आन् त्येंच्यावर खटला करूनशेनी तिगानांबी फांसावर चडवनार ह्मन!

**निरी**—( गांगरून ) अगबया! तर ह्येची वर्दी यादवरावदादाह्मी द्या अदुगर जाऊनशेनी! त्ये झोपत असल तरीबी उटवा. आन् मग ह्मोर अंबाबाई काय करील त्यें खर! जा तर अदुगर. बिगीबिगी जा!

[ मंगळ जातो.

( सुंदराबाई आंतून येते. )

**सुंदराबाई**—निरे, कायग ह्मणत होता मंगळ?

**निरी**—(गोंधळून) कोन? कंदी? ( स्वगत) ह्येना सांगूनशेनी कराच काय?

**सुंदराबाई**—अग माझ्यापासून का चोरतेस अशी? मीं सगळं आडून ऐकलं तुमचं बोलणं! पण त्याला दादाकडे कशाला पाठविलास? तो काय करणार? त्यांना तोंड दाखवायलादिखील जागा नाहीं मला आतां!

**निरी**—वैनीसाब, तुमी असा धीर नगा सोडू. तुमास्नी ठाव हायना कीं त्यो शिरपतराव फौजदार त्येंचा लई दिसाचा सोबती हाये. आन् तो तुमास्नीबी आपली भैईन मानतुया. तवा त्येन्नी सांगूनशेनी त्ये कसबी मिटवत्याल समद!

**सुंदराबाई**—( कांहीं वेळ विचारांत स्तब्ध राहून स्वगत ) अथवा हिलाच इथून पाठिवली तर ! हो असंच ! ( उघड ) हें बघ निरे, त्याच्यापेक्षां तूंच जाईनास दादाकडे ? तूं गेलीस ह्मणजे त्याला नीट समजावून सांगशील. ( दुसरा विचार मनांत येऊन ) अथवा असं करीनास; मंगळ गेलाच आहे दादाकडे. तूं त्या श्रीपतराव फौजदारांच्या इथं जाऊन त्यांनां गांठ. अन् त्यांनां ह्मणावं 'आपल्या बहिणीची लाज राखणं आतां तुमच्याकडे आहे !'

**निरी**—(एकदम) व्हय व्हय, मलाबी हीच युगत अक्शी पसंत हाये वैनीसाब ! तर तडक त्येंच्याच घरीं जात्यें अदुगर !

[ जाऊं लागते.

**सुंदराबाई**—अग निरे, हें बघ, मंगळाची ती कोयती कुठं आहे, आण पाहूं जरा इकडे. किशाच्या काळ्याच्या गुळवेलीचे मला तुकडे करायचे आहेत.

**निरी**—देत्ये आनूनशानी.

[ आणावयास जाते.

**सुंदराबाई**—( स्वगत ) अगबाई ! त्या मुकुंदरावानं इकडच्या अन् त्या अवकळेच्या सांगण्यावरून त्या दोघांचं पाप बाहेर पडूं नये ह्मणून तिच्या भाचीचा खून केला, असंच ह्मणाला नाहीं मंगळ ! अन् उद्यां खटला होऊन तिघांनांहि फांसावर चढविणार ! (सद्गदित होऊन ) देवा, कुठवर मजल आणलीस ही ! आतां उद्यां उजाडायच्यादिखील अगोदर ही सारी बातमी सगळ्या गांवभर पसरेल! मग मी हें तोंड कसं दाखवूं! (विचारयुक्त) हो असंच ! उद्यांचं उजाडूं देऊनच उपयोगी नाहीं ! (इतक्यांत निरी आंतून कोयती घेऊन येते) आणलीस का? आण इकडे. आतां तूं जा. पण लवकर ये हां. मी अगदीं वाट पहात बसत्यें तुझ्या येण्याची. दाराला बाहेरूनच घे कडी लावून ! ( निरी तसें करिते व सुंदराबाई कोयती हातांत घेऊन ) ही कोयती उरांत भोंसकतां येऊन मला जर आपले प्राण बाहेर काढतां आले असते, तर किती बरं छान झालं असतं ! पण नको बाई, अशानं मेल्यावरदिखील धिंडवडे व्हायचे ! तर पहिलाच विचार बरा!

लखंभट आजारी पडले होते तेव्हां ठकूताईनीं कण्हेरींच्या मुळ्यांचा रस घेऊनच त्यांच्या अगोदर हळदीकुंकवानं प्राण दिले नाहींत का? तर त्याच काढून आणाव्यात. अनायासं आपल्या अंगणांतच कण्हेरीचीं झाडं आहेत. (शामदान घेऊन झाडाजवळ जाते) पण रात्रीचं झाडांना शिवूं नये ना? हो, पण अशा प्रसंगीं त्याकडे लक्ष्य देऊन काय उपयोग? (मुळ्यांजवळील माती काढून मुळया काढूं लागते) कोण आलं! (दिवा घेऊन पहाते.) छेः, कुणी नाहीं. नुसता भास हा! (मुळ्या पदरांत घेऊन येते व खलबत्ता घेऊन त्या कुटते व त्यांचा रस काढून एका पेल्यांत भरते, आणि हें करित असतां कृष्णाचा धांवा ह्मणते)

**यादवराया, भाई! याहो नका निष्ठुर होऊं**
**निढळावरती हात ठेवुनी किति मी वाट पाहूं? ।ध्रु०।**
**अनाथ झाली बहिण तुझी ही किती रे अंत पहाशी!**
**कैशी निद्रा लागली दयाळा! हीच वेळ कैशी?**
**घोर संकटीं पडत असें मी होउनि परदेशी,**
**धाव धाव बा! घाल उडी रे नको उशिर लावूं! ॥ १ ॥**
**॥ यादवराया० ॥**

**गजेंद्रानें धांवा केला त्यासि सोडवीलें,**
**प्रल्हादाच्या संकटसमयीं स्तंभि प्रगट झाले;**
**ध्रुव बाळ वनीं हिंडत होतें अढळपद दिधलें,**
**माझ्या वेळे मौन धरिलें! कुणा शरण जाऊं?**
**धाव धाव बा घाल उडी रे! नको उशिर लावूं! ॥ २ ॥**
**॥ यादवराया० ॥**

(कण्हेरीच्या मुळ्यांच्या रसानें पेला भरून) मला वाटतं, इतका बस्स होईल. हें जरी विष आहे तरी मला हें आज अमृताप्रमाणं वाटतं आहे. आतां वाट नाहीं पाहून उपयोगी.(पेला ओंठाशीं नेते इतक्यांत किशा उठल्याची चाहूल ऐकून)अगबाई किशा उठला वाटतं! (त्याचेजवळ तो पेला व शामदान घेऊन जाते) हा असा दचकून कां बरं उठला! छेः, याला एकदा अखेरचा डोळाभर पाहून घेत्यें ह्मणजे मग सुखानं जातील माझे प्राण! यालादिखील या नादांत मी विसरल्यें होत्यें अगदीं! (किशास) कां रे बाळ! असा दचकून कां उठलास? (इतक्यांत दचकत दचकत माधवराव प्रवेश करून आड उभा रहातो.)

**किशा**—हे बग किनई आई, स्वप्नांत लावसाहेब तुला मालताहेत अन् मी मधें आलों ह्मनून त्यांनीं माझ्याहि एक तोंडांत दिली, त्यामुळं मी घाबललों. अन् भिऊनें उठलों. हे बग आई, मला किनई तहान लागली आहे बाई! त्या पेल्यांत पाणी आहे का? मला एक घोटभर दे पाहूं. माझा घसा कोरडा पडलाय. दे, दे तें!

**सुंदराबाई**—हें देऊं? छे. किशोर हें पाणी नव्हे! थांब, तिथं पलंगाशीं तो तांब्या आहे त्यांतून देत्यें तुला पाणी आणून. ( पुढें होऊन तांब्या हातानें जवळ घेते व हातांत पाण्याचा चुळका घेऊन त्यास पाजविणार तोंच एकदम हात परत घेऊन ) अग बाई! मी काय करित होत्यें आतां! या माझ्या हाताच्या चुळक्यानं जर मीं याला पाणी पाजिवलं असतं, अन् त्याचा कांहीं भाग जर याच्या पोटांत गेला असता तर माझ्या छबकड्याला मीं होऊन मारलं असं झालं असतं ना! ( हात स्वच्छ धुते ) छेः, हें हात धुऊन जाणार नाहीं! ( नाकाशीं हात नेऊन) याचा हा वासच किती उग्र आणि कडवट आहे! भणकर डोक्यांत भरतो जसा! ( किशा पाणी मागतो त्यास ) थांब, थांब हां किशोर, ( लुगड्यास हात पुसून ) तुला तांब्यानेंच पाणी पाजिवतें हां. हं, उठून बैस पाहूं जरा!

( किशा उठून बसतो व सुंदराबाई त्याला पाणी पाजूं लागते. )

**किशा**—आई! तांब्यानें नकोग. पेल्यानं नाहींतर हातांनींच पाजीव तुझ्या.

**सुंदराबाई**—नकोरे बाळ, माझे हात वाईट आहेत.

**माधवराव**—( एकीकडे ) वाईट आहेत! ह्मणजे! याचा काय बरें अर्थ!

**सुंदराबाई**—( त्यास तांब्यानेंच पाणी पाजून ) किशोर, नीज हां आतां. आतां तुला छान झोंप येईल. ( किशा निजतो व ती किंचित् त्याचेकडे न्याहळत बसते व मध्येंच एकदम) मी वेड्यासारखी याच्याकडे पहात काय बसल्यें अशी! मंगळ दादाकडे गेला आहे अन् निरी त्या श्रीपतराव फौजदारांकडे गेली आहे. त्यांनां जाऊनहि बराच वेळ झाला. इतक्यांत येतीलहि तीं. तर आतां उशीर करून नाहीं उपयोगी. तीं दोघं परत येण्याच्या पूर्वींच टाकावं हें उरकून.

**माधवराव**—( एकीकडे ) काय? उरकून काय टाकायचें ह्मणते ही!

**सुंदराबाई**—उद्यां उजाडल्यावर तोंडतरी कशी दाखवूं मीं हें?

**माधवराव**—( कावराबावरा होतो ) हिनें हा पेला कसला बरें घेतला आहे हातांत? हिला तें सारें कळलें कीं काय?

**सुंदराबाई**—(किशाकडे पहात, हातांत पेला घेऊन ) ह्याला हां हां ह्मणतां झोंप लागली. हें घेण्यापूर्वी मी ह्याचं एकदा अखेरचं चुंबन घेत्यें ! पहिल्यांदा ( चुंबन घेऊन ) अमृत अन् मग विष !

**माधवराव**—( एकीकडे ) खास, वीषच—वीषच हें !

**सुंदराबाई**—( त्याचें चुंबन घेऊन ) अगदीं तिकडच्यासारखा चेहरा! पण यापुढं मी याला अंतरणार ! बाळा, यापुढं तो परमेश्वर तुझा संभाळ करील ! माझा दादा आहे, वहिनीहि आहे तीं नाहीं तुला अंतर देणार ! मला दुसरं कशा-बद्दलहि वाईट वाटत नाहीं, पण अमक्यातमक्यांनां फांशीं दिलं, त्यांचा तूं मुलगा ह्मणून तुझ्याकडे लोक बोट दाखिवतील! या एका गोष्टीमुळं मला फार भडभडून येतं!

**माधवराव**—(दुःखावेगानें ) अरेरे ! हिला कळलेंतर तें सारें एकून !

**सुंदराबाई**—मी बायको माणूस पडल्यें ! तिकडची अखेरची भेट होण्याची दिखील मला आतां आशा नाहीं ! तर तुझंच आणखी एकदा चुंबन घेत्यें. ह्मणजे सगळं भरून पावलंसं होईल मला ! (चुंबन घेते) आतां मात्र सुखानं मरेन मी ! ( पेला तोंडाजवळ नेऊन ) अंबाबाई, माझ्या मागं माझ्या शरीराचे मात्र धिंडवडे नको होऊं देऊंस !

( इतक्यांत माधवराव पुढें होऊन तिचा हात धरून पेला काढून घेतो. )

**माधवराव**—हें काय करते आहेस ?

[ चाल—जरि अधलव मम नव्हतें. ]

**अनुचित विष तुज सुंदरी !**
**मींच प्राशणें युक्त असे हें, पापि असें मी किती तरी ! ।ध्रु०।**
**सुधावल्लि मज लाभुनि तोडिलि कल्पुनि विषमयि वल्लरी ! ॥ १ ॥**
**पात्र नसें मी जगिं जगण्याला, हें विष दे तरि लौकरी ! ॥ २ ॥**
**वंद्य साध्वि तूं, पतित पती मी, क्षमाकरी ! करुणा करीं. ॥ ३ ॥**
**'क्षमा' असें मज मधुवच वदुनी पापांतुनि मज उद्धरीं ! ॥ ४ ॥**
**वंद्य तुझें पद स्पर्शिन सुंदरि ! तरीच अघ मम संहरी. ! ॥ ५ ॥**

( असें ह्मणून तिचे पायांवर मस्तक ठेवूं लागतो. इतक्यांत यादवराव व श्रीपतराव प्रवेश करून थबकून आड उभे रहातात.)

**सुंदराबाई**—हें काय बाई !

**माधवराव**—दुसरें काय असणार हें! आजवर मीं तुला निष्कारण पुष्कळ छळली? करूं नये तसलें भयंकर पाप करायला प्रवृत्त झालों! मी सर्वस्वी अपराधी आहें! तुलाच काय, पण सगळ्या जगालादेखील तोंड दाखवायला मला आतां लाज वाटते! तर तूं मला एकदा अखेरची 'क्षमा केली' असें ह्मण, ह्मणजे मग मी सुखानें मरेन हें प्राशन करून!

**सुंदराबाई**—अगबाई, हें काय! तो पेला टाकायचा अगोदर! (माधवराव एका हातानें तिचे दोन्ही हात धरतो व एका हातांत पेला घेतो).

**माधवराव**—कां? त्यांत विष आहेना? मग, बोल कसलें विष आहे हें? सोमल–का बचनाग–का आणखी कांहीं? आज मला हें अमृताहूनदेखील जास्त गोड लागेल! परमेश्वरानेंच तुला हें आज माझ्याकरितां तयार करून ठेवण्याची बुद्धी दिलीन. ज्या अधमानें आजवर तुझा छळ, आणि तुझ्या भावाचा—त्या यादवरावांचा—वाटेल तसा अपमान केला, तो अधम अशा पुण्यजनांच्या सहवासांत राह्यला, अथवा त्यांनां यापुढें आपलें हें काळें तोंड दाखवायला जगण्यांत अर्थ नाहीं! यादवरावांशीं मी असा वागलों तरीदेखील त्यांच्याच उपकारामुळें आज मला इथें येतां आलें! नाहींतर—पण नकोच ते विचार! हें घेण्यापूर्वीं मीं यादवरावांची अनन्यभावानें क्षमा मागितली होती ह्मणून सांग त्यांनां! आणि तूंहि मला क्षमा आहे ह्मणून ह्मण एकदा—

**सुंदराबाई**—अग बाई, हें काय असं! हातदिखील धरायचे माझे! (सद्गदितकंठानें) अंबाबाई, यावेळीं तूंच धावग! काय, करूंतरी काय मी आतां! तें कण्हेरीच्या मुळांचं विष आहे बाई!

**माधवराव**—आणि तेंच पाहिजे मला! (पेला वर उचलतो) हं क्षमा ह्मणतेसना? का अजूनदेखील नाहीं ह्मणत? बरें, मर्जी तुझी! तूं 'क्षमा आहे' ह्मणून नाहीं ह्मटलेंस तर माझे प्राण घोटाळत रहातील इथें—ह्मणून ह्मणतों—'क्षमा आहे' ह्मणून ह्मण एकदा! (पेला अगदीं तोंडाशीं नेतो) अजून ह्मण—(इतक्यांत यादवराव एकदम येऊन माधवरावाचे हातांतील पेला पाडिवतो) अरे अरे, हा कुणीं घात केला!

**यादवराव**—माधवराव, तुह्मी हें काय करायला उद्युक्त झालां होतां?

**माधवराव**—कोण तें-यादवराव! (त्याचे घट्ट पाय धरतो) यादवराव! तुह्मीतरी कराल काहो माझ्या अपराधांची क्षमा!—हे कोण, श्रीपतरावहि आले

आहेत! बरें झालें. तुह्मी अगदीं वेळेवर आलांत. क्षमा मागतों मी तुमची. मरणापूर्वीं मला तुमची दोघांचीहि क्षमा मागायची होती! आतां यापुढें जगण्याची मला बिलकूल इच्छा नाहीं. मीं आजवर केलेले सगळे निंद्य प्रकार माझ्या डोळ्यांपुढें उभे राहून मला जीवित नकोसें करून सोडतील! मी माझ्या आणि यांच्या कुलाला भयंकर कलंक लावला. तेव्हां आतां जगण्यापेक्षां मरणच फार उत्तम!

**यादवराव**—माधवराव, तुह्मांला इतका पश्चात्ताप झाल्यावर कोण क्षमा करणार नाहीं?

**माधवराव**—काय! क्षमा आहे ह्मटलेंत!

[ **चाल**—न होना चाहिये राजा. ]

**जगीं पाप्या क्षमा कैंची! । तया देहान्त ठरलाची ।**
**न मज आशा जगायाची । अघ—स्मृति ते मना जाची. ।ध्रु०।**
**जगोनीही सुशांती ते । कधीं लाभे न पाप्यातें ।**
**तरी काला! करुणमूर्ते! । फेंकि खड्गा; दया हेंची. ॥ १ ॥**
**धूमकेतो! चण्ड वन्हे! । तडित् ज्वलने जगद्दाहे!**
**प्रखर रश्मे रवे! वर्षा । उग्र अंगार प्रलयाचा. ॥ २ ॥**
**हाय! परि हीं पुण्यतत्वें । पापियाच्या स्पर्शमात्रें ।**
**‘मलूं’ ऐशाचि भीरुत्वें । मति न धरिती निपातांची. ॥ ३ ॥**

तर मला आतां एखाद्या विषाचाच आश्रय केला पाहिजे. कारण—

**पापियाच्या कृष्णकृत्या । समचि विषतें कृष्ण जात्या ।**
**सहाय्यानें तरी त्याच्या । करिन रक्षा स्वदेहाची! ॥ ४ ॥**

ह्मणून ह्मणतों, यादवराव—

**द्या द्या मज विष जहर जलाल!**
**मानिन त्यांतचि सुख चिरकाल! । ध्रु० ।**
**जगण्याहुनि मज मरण्यांतचि सुख!**
**दाखवुं कैसें जगतास असें मुख,**
**वनिता-पुत्रा-आप्तां-मित्रां-सकलां!**
**दाखविण्या हें धृति नच मजला**
**मृत्यु बरा । पापि नरा । सौख्यकरा । असिधारा ।**

**तीहि गमें । जरि टाकी । घोर नितांत । काल कृतांत ।**
**तीक्ष्णतरा निज करवाल.॥ १ ॥ द्या द्या मज विष० ॥**

मी परस्पर संगमावर जाणार होतों पण हिची क्षमा मागितल्याशिवाय मला तसें करवेना !

**श्रीपतराव**—छेः छेः, माधवराव, हे मरणाचे भयंकर विचार तुम्हीं सोडून द्या. आत्महत्या करणेंसुद्धां तितकेंच भयंकर पाप आहे. एका पापाचें निराकरण दुसऱ्या पापानें कधींहि होणारें नाहीं. खरा पश्चात्ताप होणें हीच पापाची शुद्धि आहे. आणि मनुष्याला खरा पश्चात्ताप झाल्यावर त्याच्या हातून पुन्हा पापकर्म घडण्याची मग भीतिहि पण नाहीं. करितां झालेल्या सर्व गोष्टी तुह्मीं आतां विसरून जा.

**माधवराव**—झालेल्या गोष्टी विसरून जाऊं! त्या विसरणें तर शक्यच नाहीं! निदान या जन्मांततरी शक्य नाहीं !

**यादवराव**—माधवराव, ह्या गोष्टी आह्मी मुळींदेखील बाहेर पडूं देणार नाहीं. श्रीपतरावांनीं त्याबद्दल सगळी व्यवस्था करायचें आश्वासन दिलें आहे. आणि त्यांतून—

**श्रीपतराव**—हो ! तुमच्याकडून कांहीं भयंकर पापहि घडलें नाहीं.

**माधवराव**—( गहिंवरून ) नाहीं, खचित नाहीं ! तें न घडून यावें ह्मणून प्रत्यक्ष परमेश्वरच तुमच्या ठिकाणीं निःसंशय उभा राहिला असें वाटतें मला ! तर, क्षमा करा. तुह्मांलाच मी हें दंडवत घालतों ह्मणजे तें परमेश्वराला पोंचेल !

[ चाल—तरुण कुलिना. ]

**नमुनि हरितें । दृश्य हरि सुजनिं ।**
**मम प्रणति ही । त्वदीय विमल चरणिं करुनी. । ध्रु०।**
**समल तरल मति । निंद्य कुटिल कृति ।**
**जाउ सकल अजि विलया । हेंचि मन्मनीं ॥ १ ॥**

**भरतवाक्य.**

**अनुतापें तीं पापें विलयातें जाउनियां जनमन निर्मलतर होवो !**
**सुवर्ण जसें अंगारें दाहुनियां पावतसे अतितर निर्मल कांतीतें,**
**जातां तीं घनखंडें चंद्र जसा स्पष्ट दिसे परिहरुनि सकल भ्रांतीतें**
**दुष्ट कपटबंधातें छेदुनियां सुमति तेंवि सत्पथ मूढजना दावो !**

[ पडदा पडतो. ]

# प्रार्थना.

[ चाल—जयति जय सुरसरित्. ]

प्रणति मम तव पदीं **सुमति**-भुवनेश्वरी ! । ध्रु० ।
ध्वांत तिमिरांतुनी चंचला चमकुनी
दावि सत्पथ वनीं, अखिल तम संहरी. ॥ १ ॥ प्रणति० ॥
तेंवि मम मानसा गाढ तमिं मग्नशा
प्रेरुनी निज यशा, दाविं पथ सत्वरीं. ॥ २ ॥ प्रणति० ॥
ज्ञान-रवि मावळुनि दुष्टमति-जाल मनिं
जाय अति विस्तरुनि, छिन्न त्यातें करीं. ॥ ३ ॥ प्रणति० ॥
कुमति ही सर्पिणी चंडविषदंशिनी
भिवविते दंशनीं; यांतुनी उद्धरीं. ॥ ४ ॥ प्रणति० ॥
ऐंद्रजालिक महा कंकणध्वनि पहा
काढुनी मंजु हा पळविं तीतें दुरी. ॥ ५ ॥ प्रणति० ॥
शांति, भक्ती, दया, धर्म, पुण्या, नया,
प्रसव कुशि तूझिया; सुकृत–तरु–वल्लरी. ॥ ६ ॥ प्रणति ॥
देव देवांगना **सुमति** ! तव सद्गुणा
घेउनी सुरपणा पावले सुरपुरी. ॥ ७ ॥ प्रणति० ॥
साधुजनमानसीं सतत संचारिसी
तेथुनी फेंकि मशिं एक गुण–मञ्जरी ॥ ८ ॥ प्रणति० ॥
तीच शिरिं घेउनी नमिन लोटांगणीं
लाभ नच याहुनी देवदेवेश्वरी! ॥ ९ ॥ प्रणति० ॥
प्रकट हो कविमनीं, नटमनीं, जनमनीं
अभिनवा परिमला सद्गुणे ! विस्तरीं. ॥ १० ॥

